# शारदाश्रम वार्षिक

## विषयसूचि



---

# चित्र सूची.

—*—



---

# FORE-WORD

In writing the foreword to this first annual of the Sharadashram, I feel confident that the handy volume now presented to the reading public, will serve to give some idea of the extensive range of the field of activities which it is the ambition of the Ashram to carry on systematically. It is now recognised on all hands that a reliable history of a nation or a people can be written only after all the materials for the same are unearthed and rendered available through the laborious researches of scholars for a number of years and then carefully sifted, classified and studied by an equally large number of experts. The science of Historic and Antiquerrian research is a branch of Literary study which has very recently attracted the attention of the scholars in India. In the learned Preface to this volume written in Marathi by Mr. Y. K. Deshpande who is in fact the soul and guiding spirit of the Sharadashram, he has given in brief the history of research work in India in general and the C. P. and Berar in particular.

2. This province came under the British Rule only in the latter half of the 19th century. Till the begining of the present century Western Education made but slight progress in the province. Nagpur University is one of the Youngest Universities in British India. It is not therefore a matter of surprise that the educated people in the province should have been late in realising the significance of the research work and the pursuit of the systematic study of Archeaology and other allied branches of knowledge.

3. Even in more advanced provinces of British India, till lately research work was more in the nature of sporadic efforts of individual scholars than a joint work carried on approved lines of study by a band of experts in coordination with one another. Although Government now and then recognised the merits of individual efforts made in this direction by Indian scholars like late Dr. Bhandarkar and others, still for a long time there was no official organisation continuously preparing plans, exploring new fields and pursuing the

study methodically in order to create and foster the spirit of research among the educated people in regard to their own historic antiquities and to coordinate the work done by different scholars scattered over the various provinces in differeut branches of its extensive field as well as to endeavour to secure for such work, necessary facilities, principally of financial nature without which no research work can be systematically and continuously carried on. Research demands patience and constant monetary assistance. It is a process of slow and steady building of a super structure exhibiting past glories of a nation on foundations as abiding and sure as the age-old rocks. The scholars have therefore to sink these foundations deep and broad, In absence of state-help, any systematic effort on a large scale in this direction is considerably handicapped and bound to meet with difficulties which the resources of private individual can not easily overcome.

4. It was chiefly during the Viceroyalty of late Lord Curzon that the subject of the preservation of Ancient monuments attracted the attention of the Government and an official department was then organised to carry on a systematic study in all the directions that can help to throw light on the glorious past of Hind. Recently the Indian Archealogical department has-excavated the sites of Harappa and Mohenjodaro. The antique articles brought to light and the extensive ruins of cities now exposed to the view of expert scholars are being critically studied and the observations being carefully sifted and the results gradually rendered available to the readers. The Archeaological department has also laid out an extensive programme of excavations in Northern India and certain parts of Bengal and Orissa. Central India and the C. P. and Berar in particular have not yet attracted the attention of the departmental experts which owing to its past history it undoubtedly deserves. But the axe of retrenchment owing to financial stringency of the Govt. of India has fallen heavily and the department is.compelled to hold up a considerable part of its programme for the present. Still the striking results of the excavations hitherto made by the department, have already given an impetus to the study of Indian Antiquities and I have no hesitation to say that much of the interest shown by a large number of the educated people at present in the study of their past glories is due to the strenuous efforts of this department to popularise their achievements

and interpret the same with their bearing on the existing conceptions relating to the Ancient history of the country. It is a welcome change and I am glad to find that a large number of intelligent and brilliant graduates in this province are being affected by it and are taking more intelligent interest in this kind of literary pursuit. For a long time men like R. B. Hiralal, Mr. Y. K. Deshpande and Mr. Y. M. Kale were patiently plodding on this tiresome road of research unaided by any one and without a companion or co-worker even to talk to by their side. But the situation is being gradually changed for the better. I knew of a few cases of young men who were prepared to ignore their convenience, comforts and even their careers, if necessary, in their zeal and enthusiasm to labour in this field for the pleasure of having a peep into the hidden glorious past of their Motherland.

5. The present volume, I venture to say, will give sufficient ground to hope that there is a brighter and glorious future for research in some of the branches of this laborious study in this province. I hope and trust that the publication of this little volume will prove only a beginning of a great intellectual activity in the future in this direction under the auspices of Sharadashram and other literary societies in the provinces which have either already come or will be coming into existence in the near future. It should also prove to be a salutary reminder to the Local Government and the Govt, of India of their obligation in regard to this matter towards this much neglected province.

6. I am sure that the members of the Sharadashram will regard all their labours and pecuniary expenses incurred in bringing out this volume as more than amply repaid, if it will serve to give a fresh stimulus in the province to the systematic study of its past history.

7. At any rate in concluding this little foreword I wish to cite the following lines of Sir Walter Scott which breath a spirit of robust optimism.

"If one heart throbs higher at its sway,
The wizard note has not been touched in vain."

**M. S. Aney**
( President,
SHARADASHRAM )

Yeotmal,
D/-28th April 33,

# संपादकीय निवेदन.



**१ प्रास्ताविक**

शारदाश्रम वार्षिक ( सके १८५५ ) या प्रथम वार्षिकाच्या निमित्तानें शारदाश्रमाशीं जिव्हाळ्याचा संबंध असलेल्या मध्यप्रान्त आणि वऱ्हाड मधील कांहीं प्रमुख विद्वान संशोधकांचे शोधनिबंध, पुराणवस्तुसंशोधन, इतिहास आणि वाङ्मय या विषयांची आवड असणाऱ्या रसिकांपुढें सादर करीत आहे. या ग्रंथांत वरील तिन्ही विषयांवरील शोधनिबंधांचा त्रिवेणी संगम झालेला पहावयास मिळेल.

पुराणवस्तु संशोधन, प्राचीन व अर्वाचीन इतिहास आणि प्राचीन व अर्वाचीन वाङ्मय या तिन्ही विषयासंबंधानें थोडा बहुत प्रयत्न वऱ्हाड आणि मध्यप्रांत या प्रांतांत झालेला आहे. तथापि इतर प्रांतांच्या मानानें आणि या प्रांतांत अद्याप अस्पृष्ट असलेल्या साधनसामुग्रीच्या मानानें तें कार्य फारच थोडें झालेलें आहे व अद्याप पुष्कळसें कार्य व्हावयाचें आहे.

**२ पुराणवस्तु संशोधन**

पुराणवस्तु संशोधनासंबंधानें पाहतां सरकारी प्राचीनवस्तुसंशोधनखातें निर्माण झाल्यापासून या विषयाकडे या खात्याचें म्हणावें तसें कार्य झालें नाहीं. तत्पूर्वी डॉ. कनिंगहाम साहेब हे वऱ्हाडांत तर मुळींच आले नाहींत. मध्यप्रांतांचा भांदक वगैरे भाग त्यांनीं पाहिला होता, असें त्यांच्या पुराणवस्तु संशोधनाच्या सरकारी रिपोर्टांवरून आणि ग्रंथावरून दिसून येतें. संशोधनखातें निर्माण झाल्यानंतर, वऱ्हाड प्रथम मुंबई इलाख्यांतील संशोधन विभागास संलग्न होतें. त्यावेळीं तेथील संशोधन विभागाचे सुपरिटेंडेंट डॉ. कुझन्स यांनीं वऱ्हाडांतील कांहीं प्राचीन स्थळांसंबंधीं रिपोर्ट तयार केला होता. कांहीं शिलालेखांचे छापही घेण्यांत आले होते. पण ते अद्याप पूर्णपणें वाचले गेले नाहींत. अद्याप ते तसेच सरकारी एपिग्राफिस्टच्या कचेरींत पडले आहेत. वऱ्हाडप्रांत मध्यप्रान्तास जोडल्यानन्तर हे दोन्ही

जोड प्रान्त संशोधन खात्याच्या मध्यविभागास जोडण्यांत आलें आहे; परन्तु या विभागाची मुख्य कचेरी बिहार प्रान्तांत पाटणा येथें असल्यामुळें, या प्रान्ताच्या संशोधनाकडे जवळ जवळ दुर्लक्षच झालें, असें ह्मणावयास हरकत नाहीं. आजपर्यंत सरकारी परिश्रमानें जें कार्य झालें त्याचा आढावा आपणास सरकारी रिपोर्टावरून काढतां येतो. तसेंच रा. ब. हिरालाल यांचे Descriptive list of Inscriptions in C. P. & Berar) 'प्राचीन लेखांच्या वर्णनाची यादी आणि श्री. ऐय्यर यांचें ( History of C. P. and Berar, ) सी. पी आणि वऱ्हाड यांचा इतिहास या सरकारी पुस्तकांवरून दिसून येईल. रायपूर आणि नागपूर येतील वस्तुसंग्रहालय यांवरूनही सरकारी कार्याची थोडी कल्पना येईल. सरकारी खात्याकडून मध्यप्रांत व वऱ्हाडमध्यें उत्खननाचा मुळींच प्रयत्न झाला नाहीं. सन १९३१ च्या मार्चमध्यें पुराणवस्तुसंशोधन-खात्याचें तत्कालीन डेप्युटी डायरेक्टर जनरल श्री. का. ना. दिक्षीत एम्. ए. यांनीं उत्खननाकरितां प्राचीन योग्य जागा तपासून पाहण्याकरितां मध्यप्रांत व वऱ्हाडमध्यें दौरा काढला होता. आह्मासही त्यांच्याबरोबर प्राचीन स्थळें पाहण्याचा योग आला होता. त्यांनीं रामटेक जवळील मनसार यथील प्राचीन टेकड्या उत्खननाकरितां पसंत केल्या होत्या व तेथें कार्य लवकरच सुरूं करावयाचें ठरलें होतें. परंतु आर्थिकपरिस्थितीमुळें सरकार-कडून पैशाची सोय न झाल्यामुळें तें कार्य तसेंच राहिलें.

या विषयासंबंधानें खाजगी प्रयत्न नांव घेण्यासारखे झाले नाहींत. प्रांतांचें केन्द्र जें नागपुर शहर, येथें रॉयल एशिआटिक सोसैटीची शाखा अथवा एखादी स्वतंत्र संशोधक संस्था सरकारी आश्रयाखालीं व्हावयास पाहिजे होती. तशा तऱ्हेचा थोडा प्रयत्न सन १९२८ सालीं इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमीशनच्या वेळेला करण्यांत आला होता. तात्पुरती कमीटीहि निर्माण झाली होती; पण तें कार्य तसेंच पडून राहिलें. छत्तीसगड-मध्य पंडित लोचनप्रसाद पांडेय यांनीं महाकोसल हिस्टॉरिकल सोसैटी ह्मणून नुकतीच २ वर्षांपूर्वी एक संस्था स्थापन केली आहे. छत्तीसगडमध्यें पंडितजी यांनीं या विषयासंबंधानें बरेंच कार्य केलें आहे. मराठी मध्यप्रांत

आणि वऱ्हाड या प्रान्तांत अद्याप असा संघटित प्रयत्न पुराणवस्तु संशोधनासाठीं मुळींच झाला नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. यवतमाळच्या शारदाश्रमाच्या कार्याच्या कक्षेंत पुराणवस्तु संशोधनही आहे. या विषयांत द्रव्याभावामुळ ह्मणण्यासारखें कार्य होणार नाहीं, तरी या विषयासंबंधानें जे विद्वान संशोधक वैयक्तिक प्रयत्न वऱ्हाड आणि मध्यप्रांतांत करीत आहेत त्या प्रयत्नांना संघटित स्वरूप देण्याचें तरी कार्य शारदाश्रम करील अशी आह्मास उमेद आहे.

सुदैवानें असल्या प्रकारचें पुराणवस्तुसंशोधनाचें वैयक्तिक कार्य कांहीं विद्वान करीत आहेत. रा. ब. हीरालाल, पं. लोचनप्रसाद पांडेय, डॉ. हंटर, प्रो. हीरालाल जैन इत्यादि विद्वानांचीं नावें या विषयासंबंधानें या प्रांतांत प्रामुख्यानें नजरेसमोर येतात. वरील विद्वान गृहस्थांनीं शारदाश्रमाचे सभासद होऊन शारदाश्रमाच्या कार्यांत सहकार्य करण्याचें अभिवचन दिलें आहे.

**३ प्राचीन व अर्वाचीन इतिहास**

पुराणवस्तुसंशोधनापेक्षां प्राचीन आणि अर्वाचीन इतिहासाच्या संशोधनाकडे या प्रांतांतील विद्वानांचें थोडें जास्त लक्ष लागलें आहे. तथापि या विषयासंबंधानेंही अद्याप संघटित प्रयत्न झालेला नाहीं. जो थोडा बहुत प्रयत्न झाला आहे, तो वैयक्तिक स्वरूपाचा आहे. सुमारें ५० वर्षांपूर्वी एलिचपूरचे खतीब खा. ब. अजमत साहेब यांच्या वडिलांनीं तवारिख इ अमजदी नांवाचें वऱ्हाडच्या इतिहासाचें एक पर्शिअनमध्यें पुस्तक लिहिलें होतें. त्याच्या केवळ ५०।६० प्रति काढल्या होत्या. श्री. सील नांवाच्या बंगाली गृहस्थानें History of C. P. Berar नांवाचें एक इंग्रजी पुस्तक १०-१२ वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें आहे. श्री. या. मा. काळे यांचा वऱ्हाडचा इतिहास या दृष्टीनें फार महत्वाचा ग्रंथ आहे. हा ग्रंथ ह्मणजे त्यांच्या २०।२५ वर्षांच्या इतिहाससंबंधीं प्रयत्नाचें दृश्यफळ होय. श्री. काळे यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेली प्रकाशित माहिती एकत्रित करून हा अमोल

ग्रंथ रचिला आहे. श्री. काळे यांच्या परिश्रमानें वऱ्हाडांतील आणि मराठी मध्यप्रांतांतील अनेक विद्वान आणि होतकरू तरुणांत इतिहासाची आवड उत्पन्न केली आहे. इतिहास आणि ऐतिहासिक चरित्र लेखकांत श्री. ना. के. बेहेरे एम्. ए. बी. एससी. यांचेंहि नांव प्रमुख आहे. त्यांचें १८५७ साल हें पुस्तक आणि बाजीरावांचें चरित्र हीं पुस्तकें इतिहासलेखकांत यांचें नांव अढळ ठेवितील.

प्राचीन व अर्वाचीन इतिहाससंशोधनकार्याचाच विचार करावयाचा झाला तर, वऱ्हाड आणि मध्यप्रांतांत वै. सत्पुरुष आपाजी महाराज यांचे वडील क. निळकंठराव सरमोकदम यांचें नांव शिरोभागीं येईल. कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं महाराष्ट्रांत इतिहाससंशोधनाचा पाया घातला त्यापूर्वी ३०।३५ वर्षे यांनीं इतिहाससंशोधन केलें होतें. त्यांनीं लिहिलेल्या वणीच्या इतिहासाची एक हस्तलिखित प्रत यवतमाळ शारदाश्रमांत आहे. तो इतिहास त्यांनीं अनेक बखरी, सनदा, पोवाडे आणि ऐतिहासिक कागदपत्र यांच्या आधारें सन १८६७ मध्यें लिहिला होता. त्यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासावर श्रीकृष्णलीलामृत नांवाचा एक ग्रंथ छापून प्रसिद्ध केला होता. कै. वामन दाजी ओक यांचा, काव्येतिहाससंग्रहमासिकाशीं, संपादक या नात्यानें असलेला संबंध प्रसिद्धच आहे. त्यांनीं प्रसिद्ध केलेलें नागपुरकर भोसल्यांची बखर आणि कागदपत्रें हें पुस्तक त्यांच्या संशोधनकार्याचें हस्तफल आहे. मधल्या पिढींत श्री. लक्ष्मण रेणको डोळे वकील यांनीं इतिहाससामुग्री जुळविण्याचे बरेच प्रयत्न केलें होते. ती सामुग्री हल्लीं शारदाश्रमांत आहे. यांचे सरसालार जंग वगैरे इतिहासावरील लेख उमरावतीच्या ज्ञानसंग्रह मासिकांत आले आहेत. हल्लींच्या काळीं प्राचीन व अर्वाचीन इतिहाससंशोधनकार्यात गुंतलेल्या विद्वान गृहस्थांत प्रो. मिराशी, प्रो. हिरालाल जैन, श्री या. मा. काळे आणि श्री द. बा. महाजन यांचीं नांवें प्रामुख्यानें सांगता येतील. श्री. द. बा. महाजन या तरुण विद्वान गृहस्थांचें लक्ष प्राचीन आणि अर्वाचीन इतिहासाच्या संशोधनाकडे वळलें आहे. हे तरुण उत्साही गृहस्थ सरकारी अधिकारावर असून त्यांच्या

कडून प्राचीन व अर्वाचीन इतिहास आणि वाङ्मय यांच्या संशोधनाच्या क्षेत्रांत बरेंच कार्य होईल असा अंदाज आहे. सरकारी अधिकारावर राहून प्राचीन इतिहास आणि पुराणवस्तु संशोधन या क्षेत्रामध्यें आपलें नांव चिरस्थायी करून ठेविलें, याच एकमात्र उदाहरण (रा. ब. हीरालाल) मध्यप्रांतांत आहे. श्री. महाजन यांचाही या कार्यासंबंधीं उत्साह आणि चिकाटी अवर्णनीय आहे. मध्यप्रांत आणि वऱ्हाडमध्यें शिलालेख, ताम्रपट आणि ऐतिहासिक कागदपत्र अनेक ठिकाणीं विखुरलेले पडले आहेत. त्यांचा संग्रह व त्याचें संरक्षण आणि वाचन न झाल्यास तें सर्व साधन—साहित्य काळाच्या भक्ष्यस्थानीं पडण्याचा संभव आहे विद्वान होतकरू आणि उत्साही तरुणांचें लक्ष या कार्याकडे वेधलें पाहिजे. शारदाश्रम यवतमाळ ही एकच संस्था वऱ्हाड व मध्यप्रांतांत आहे; जेथें असल्या ऐतिहासिक साधनांचा संग्रह केल्या जात आहे. आम्ही वैयक्तिक रीतीनें जो आजपर्यंत अशा साधनांचा संग्रह केला आहे; तो या संस्थेंत ठेविला आहे. प्रांतांतील ऐतिहासिक घराण्यांतील पुरुषांनीं आणि होतकरू तरुण विद्वानांनीं असें साधन—साहित्य कोठें उपलब्द झाल्यास, तें एकत्रित करण्याकरितां शारदाश्रमाशीं सहकार्य करण्यानें या कार्यास फार उत्तेजन येईल.

**४ प्राचीन वाङ्मय**

वरील विवेचनांत पुराणवस्तुसंशोधन आणि प्राचीन व अर्वाचिन इतिहास त्यांच्या संबंधानें वऱ्हाड व मध्यप्रांतांत काय प्रयत्न झाला व होत आहे या संबंधानें विचार झाला, आतां प्राचीन आणि अर्वाचीन वाङ्मयासंबंधानें आजवर काय कार्य झालें व हल्ली होत आहे, याकडे विहंगम दृष्ट्या पहावयाचें आहे. संशोधनाचा प्रश्न प्राचीन अथवा पूर्वरचित वाङ्मयासंबंधानें येतो. या विवचनांत संस्कृत प्राकृत अपभ्रंश आणि मराठी वाङ्मयासंबंधानेंच बोलावयाचें आहे. प्रांतांतील अन्य प्रचलित भाषा हिंदी आणि उर्दु या नूतें आपण आपल्या कक्षेबाहेर ठेऊं. मुंबई इलाख्यामध्यें संस्कृत आणि प्राकृत हस्त-लिखित ग्रंथांचें संशोधन करण्याचा पद्धतशीर प्रयत्न सरकारी रीतीनें करण्यांत

आला आहे, त्याचें दृश्य फक्त डेक्कन कॉलेजमध्यें ठेवण्यांत आलेला हस्त-लिखित ग्रंथांचा संग्रह जो हल्लीं भांडारकर रीसर्च सोसायटीच्या ताब्यांत देण्यांत आला तो आणि गवर्मेंट ओरिअंटल सिरीज ही प्रकाशित ग्रंथमाला होय. याच प्रयत्नाचा भाग ह्मणून प्रो. श्रीधरपंत भांडारकर यांना सी. पी. आणि वऱ्हाडमध्यें ग्रंथांचा शोध करण्याचें कार्य दिलें होतें. पण या प्रांतांत ग्रंथ सांपडतील कीं नाहीं या संशयानें त्यांनीं मुळीं शोधाचा प्रयत्नच केला नाहीं. ग्रंथ संशोधनाचा आणि संग्रहाचा जो थोडाबहुत प्रयत्न आह्मी केला त्यावरून या दिशेनें प्रयत्न करण्यास या प्रांतांत बराच वाव आहे असें आमचें मत आहे. अनेक जुन्या विद्वान घराण्यांत असले हस्तलिखित संग्रह आहेत. आणि या घराण्यांतील बहुतेक विद्यमान पुरुषांना या संग्रहाची कदर नसल्या-मुळें ते धूळ खात पडले आहेत. त्याकडे लक्ष देऊन जर त्यांचें संरक्षण आणि संग्रह करण्याचा लवकर प्रयत्न न झाला, तर ते काळाच्या भक्ष्यस्थानीं पडण्याचा संभव आहे. या प्रांतांतील तरुण आणि उत्साही विद्वानांनीं यांकडे अवश्य लक्ष द्यावें. या संबंधानें अद्याप मुळींच प्रयत्न झाला नाहीं. थोड्या परिश्रमानें आह्मी जवळ जवळ एकहजार हस्तलिखित ग्रंथ मिळवूं शकलों. प्रयत्न केला असतां कसें यश येतें याचें उदाहरणच सांगावयाचें झालें तर डॉ. यादव श्रीहरि अणे यांनीं हस्तलिखित ग्रंथसंग्रहित करण्याचा एकस्या वणी गांवांतच प्रयत्न केला असतां ५००—६०० ग्रंथ ते थोड्या काळांतच जमवूं शकले. या प्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं असलेले ग्रंथ किती विविध विषयावरचे आणि कसे महत्वाचे असतात, हें रा. ब. हीरालाल यांनीं लिहिलेलें Descriptive list of Manuscripts in C. P. & Berar. हें पुस्तक मध्यप्रांत सरकारनें २—३ वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें ह्यावरून कळून येईल. रा. ब. हीरालाल यांनीं जें हें पुस्तक लिहिलें तें सरकारी अधिकाऱ्यांच्या मदतीनें माहिती गोळा करून लिहिलें आहे. खाजगी प्रयत्न करण्यांत आला तर याहून ही जास्त यश येण्याचा संभव आहे. वरील इंग्रजी सूचि, संस्कृत, प्राकृत आणि अपभ्रंश भाषेतील ग्रथांची आहे. मराठी संबंधानें अशा प्रकारचा मुळींच प्रयत्न झाला नाहीं. यू. पी पंजाब; इत्यादि प्रांतात हिंदी

ग्रंथांचा शोध करण्याकरितां प्रांतिक सरकारांतून काशीच्या नागरी प्रचारिणी संस्थे सारख्या संस्थांना प्रतिवार्षिक ५००–५०० रुपये ग्र्यांट दिली जातें. मध्यप्रांत सरकारालाही हिंदी आणि मराठी हस्तलिखित ग्रंथांच्या शोधासाठीं, असल्या प्रकारचे प्रयत्न करणें अवश्य आहे. परंतु या कार्यांत सरकारी मदत नसली तरी वैयक्तिक प्रयत्नांनींही पुष्कळ कार्य होण्यासारखें आहे. प्रांतांतील विद्वान तरुणांनीं या कार्याकडे लक्ष दिल्यास शारदाश्रम त्यांच्याशीं हरप्रकारचें सहकार्य करील. प्रो. हीरालाल जैन यांनीं अपभ्रंश भाषेंतील ग्रंथ कारंजा येथील जैनग्रंथभांडारांतून शोधून काढून ते श्री. गोपाळ सावजी चवरे आणि इतर जैनी गृहस्थांच्या सहाय्यानें प्रकाशित करण्याचा उपक्रम केला आहे. या ग्रंथप्रकाशनानें मराठी भाषेच्या इतिहासाच्या अध्ययनास फार उपयोग होईल.

प्राचीन अथवा पूर्व रचित मराठी वाङ्मयाचें संशोधन करून तीं प्रकाशित करण्याचेंही प्रयत्न थोड्या बहूत प्रमाणांत झाले आहेत. काव्येतिहास संग्रहांत कै. वामन दाजी ओक यांनीं कै. कावतकर यांच्या मदतीनें या प्रांतांतील कांहीं पद्यग्रंथ प्रकाशित केले आहेत. कै. अच्युतराव साठे, कै. सुंदरपंत पांडे आणि कै. पांडुरंगपंत अग्निहोत्री या तिघांनीं देवनाथाची आणि दयाळनाथांची कविता जमवून प्रसिद्ध केली. उमरखेड येथील उत्तमश्लोक मंडळानें उत्तमश्लोकांची मराठी सप्तशती संशोधून प्रकाशित केली. याशिवाय शिवकल्याणांची रासपंचाध्यायी, नांदगांव खंडेश्वर येथील नाथपरंपरेंतील मठांतलि सत्पुरुषांचा कवितासंग्रह इत्यादि अप्रकाशितग्रंथ प्रकाशित करण्याचें वैयक्तिक प्रयत्न करण्यांत आले. शारदाश्रमांतून प्राचीन मराठी वाङ्मयाचें संशोधन करून त्यांचें प्रकाशन करण्याचा हा संघटित प्रयत्न करण्यांत आला आहे. या क्षेत्रांत अद्याप बरेच कार्य व्हावयाचें आहे.

**५ अर्वाचीन वाङ्मय**

अर्वाचीन वाङ्मयनिर्मितीसंबंधानें ही बरीच आशा बाळगण्यास जागा आहे. मध्यप्रांत आणि वऱ्हाड या प्रांतांत इंग्रजी शिक्षणाचा आरम्भ झाला, तेव्हां महाराष्ट्रांतून विशेषतः पुण्याकडून शिक्षणखात्यांत आणि इतर खात्यांत तिक-

डील बरीच विद्वान मंडळी आली. मध्यप्रांत आणि वऱ्हाडांत याच मंडळींनीं ग्रंथ निर्मितीचा ओनामा केला. या मंडळीमध्यें हरीपंत पंडीत, विष्णु मोरेश्वर महाजनी, बजाबा रामचंद्र प्रधान, पारखी शास्त्री हे प्रमुख होत. हल्लींच्या विद्यमान पिढींत श्री. कृ. कोल्हटकर, या मा. काळे, ना. के. बेहेरे, ग. त्र्यं. माडखोलकर प्रो. पेंडसे बनहट्टी इत्यादि अनेक प्रसिद्ध ग्रंथकार आहेत. कवि या दृष्टीनेंच विचार केला तर श्री. गुप्ते ( Bee ) श्री. कृ. कोल्हटकर, आनंदराव टेकाडे, श्री. बेहेरे, श्री. उपाध्ये वऱ्हाडांतील प्रसिद्ध देशपांडे कविपंचक, प्रो. कोलते, वकील, पंडित इत्यादि अनेक कवि आणि सौ. शांताबाई परांजपे इत्यादि कवयित्री यांनीं मराठी काव्य-वाङ्मयांत अपूर्व भर टाकिली आहे. शारदाश्रमानें प्रसिद्ध केलेली विदर्भवीणा ग्रंथ, श्री. बेहेरे यांची मोत्यांची माळ, श्री. आनंदरावांचीं आनंदगीतें, श्री. पाध्यांची पोपटपंची श्री. अनिल यांची फुलवात श्री. देशपांडे पतिपत्नी यांची निर्माल्यमाला श्री. गोरे यांचे बोबडे बोल इत्यादि अनेक पद्यग्रंथांनीं काव्य वाङ्मयांत महत्वाची समृद्धि केली आहे.

श्री. हुद्दार यांची अभिनव भारतमाला, श्री. बनहट्टी यांची नवभारत-माला आणि श्री. वाळके यांच्या उत्साहानें अस्तित्वांत आलेली विदर्भ प्रकाशन संस्था या संस्था नवग्रंथनिर्मितीला पोषक आहेत आणि आपापल्यापरीं वाङ्मय समृद्धीचें भरीव कार्य करीत आहेत.

श्रुति स्मृति पुराणग्रंथांचें अध्ययन करून कालनिर्णय इतिहास, सामाजिक परिस्थिती, शब्दांचा इतिहास इत्यादि बाबी संबंधानेंही शोध लावण्याचे प्रयत्न मध्यप्रांत व वऱ्हाड मध्यें सुरू आहेत. त्यामध्यें विद्वद्रत्न केशवराव दप्तरी श्री. मा. श्री. अणे, वे. शा. सं. कृष्णशास्त्री घुले या मंडळींचे परिश्रम सवश्रुतच आहेत.

या प्रमाणें पुराणवस्तुसंशोधन, श्रुतिस्मृति, पुराणें, प्राचीन व अर्वाचीन इतिहास आणि प्राचीन वाङ्मय इत्यादिकांचें संशोधन आणि अर्वाचीन

वाङ्मयनिर्मिती इत्यादि बाबींसंबंधानें कसकसे प्रयत्न करण्यांत आले व हल्ली काय प्रयत्न चालू आहेत या संबंधानें त्रोटक विवेचन केलें आहे.

**६ प्रांतिक वाङ्मय जागृति**

वाङ्मय ही संपत्ती एका विशिष्ट व्यक्तीची, समाजाची अथवा काळाची नाहीं. तीवर सर्वांचा हक्क आहे. तूर्त आपण अखिल भारताचा प्रश्न सोडून दिला आणि केवळ महाराष्ट्रापुरताच विचार केला तर या संपत्तीचे आपण महाराष्ट्रीय समान हक्कानें मालक आहोंत. एखाद्या विशिष्ट व्यक्तीनें अथवा समाजानें भूत, विद्यमान अथवा भविष्य काळीं या संपत्तीत भर टाकली तर त्याचे आपण सर्व अधिकारी आहोंत. असें जर आहे तर मग एकट्या मध्यप्रांत व वऱ्हाड या प्रांतापुरताच आढावा घेण्याचें काय प्रयोजन आहे? विशिष्ट प्रांतानेंच यासंबंधीं काय प्रयत्न केले आणि कोणते प्रयत्न हल्ली सुरू आहेत या कोत्या दृष्टीनें पाहण्याचें तरी काय प्रयोजन आहे.? असा प्रश्न कोणी सहज उपस्थित करील. याला आमचें हेंच उत्तर आहे की वाङ्मय संपत्ती ही जशी सर्व महाराष्ट्राची आहे तशी तिच्यांत भर टाकून तिला समृद्ध करण्याचेंहि पण कर्तव्य अखिल महाराष्ट्रीयांचें आहे. आज महाराष्ट्राचें वाङ्मयीन केंद्र पुणें आहे हे कोणासही नाकबूल करून चालावयाचें नाहीं. त्या भागांत वाङ्मयवृद्धीचे सर्वांगीण प्रयत्न कसे सुरू आहेत, हेंहि सर्वांच्या समोर आहे. पूर्वकाली एखाद्या पंडितास काशीतील विद्वानांनी मान्यता दिल्याशिवाय त्याच्या विद्वत्तेच्या परिश्रमाची पूर्तता होत नसे. हल्लीच्या काळीं त्याच दृष्टीनें आधुनिक विद्वान पुण्याकडे पाहात असला, तर त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारचे वाङ्मयाभिवृद्धीचे प्रयत्न महाराष्ट्राच्या केन्द्राच्या ठिकाणीं सुरू असतां, महाराष्ट्राच्या इतर भागांनींही आपण यापूर्वी वाङ्मयाभिवृद्धीकरितां काय प्रयत्न केले आणि कोणते प्रयत्न करतां येण्यासारखे आहेत, याचा आढावा काढून आपल्या कर्तव्याची जाणीव करून घेतली तर त्यांत वावगें काय आहे! त्यामुळें आपल्या कर्तव्य–पालनास जागृती येते. असले उपप्रांतिक प्रयत्न महाराष्ट्राच्या

निरनिराळ्या भागांत येवढेंच नव्हे तर बृहन्महाराष्ट्राच्याहि दूरदूरच्या भागांत सुरू आहेत. ही वाङ्मयविषयक जागृती महाराष्ट्राच्या वाङ्मय संपत्तींत निस्संशय भर घालील.

दुसरी एक गोष्ट विशेष प्रामुख्यानें पुढें मांडावयाची आहे. शारदा-देवीच्या मन्दिरांत हा श्रीमंत, हा गरीब, हा ब्राह्मण, हा क्षत्रीय, हा अस्पृश्य, हा राजपुरुष, हा व्यापारी, हा सामान्य जन इत्यादि मनुष्यकृत भेदभावांना वाव नाहीं. तसेंच राजकारणांतील मतमतांतरेंही शारदादेवीच्या मंदिराच्या प्राकाराच्या कक्षेबाहेरचीं आहेत. हल्लींच्या मतमतांतराच्या गलबल्यांत असें एकच स्थान आहे कीं जेथें सर्व दर्जाचे, सर्व धर्मांचे व मतांचे पुरुष भ्रातृ-भावानें एकत्र भेटून सहकार्य करूं शकतात. पंढरपुरच्या महाद्वारासमोरील चंद्रभागेंतील वाळवंटांत हरीच्या नामस्मरणांत तल्लीन झालेल्या वारकरी संप्रदायांतील भगवद्भक्तांचें नयनमनोहर आणि हृदय उचंबळविणारें दृश्य आम्हास आठवतें. वरील भगवत्भक्त मनुष्यकृत भेदभाव विसरून क्षणमात्र तरी पांडुरंगमय होऊन जातात. परमेश्वरकृपेनें शारदादेवीच्या प्रांगणांतही तशीच स्थिति अखंड राहो. प्रस्तुत वार्षिकांतील लेखकांची विविधता याच तत्वास अनुसरून आहे हें वाचकाच्या लक्षांत येईल.

**७ शारदाश्रम आणि वार्षिक**

विदर्भ साहित्यसंघ सुमारें ९–१० वर्षांपूर्वी निर्माण होऊन त्यानें निरनिराळ्या ठिकाणीं सम्मेलनें भरवून, या भागांत वाङ्मय विषयक जागृति उत्पन्न केली आहे. या भागांत नवीन जोमानें निघणारें शाळापत्रक, वागीश्वरी, विश्ववाणी आणि नवनिच जन्मास येणारें विहंगम हीं मासिकें त्याच जागृतीची संतती आहे. वर निर्दिष्ट केलेल्या मालाही पण त्याचाच लेकवळा आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. शारदाश्रम संस्थेचा जन्मही पण या विदर्भ साहित्यसंघाच्या छत्राखालीं झाला आहे. पुराणवस्तुसंशोधन, प्राचीन व अर्वाचीन इतिहास आणि प्राचीन वाङ्मय यांचें संशोधन वैयक्तिक प्रयत्नावर कितपत यशस्वी होणार ? जेथें सरकारनेंहीं लाखो रुपये खर्च करून अद्याप किती तरी कार्य

अवशिष्ट आहे. या सर्व गोष्टींचा विचार करूनच आमच्या सहकारी मित्रांच्या उत्साहानें सांघिक प्रयत्न करण्याचें ठरवून शारदाश्रम संस्थेचा प्रारम्भ केला. उत्साही कार्यकर्ते मिळाले तरी सर्वारम्भास्तण्डुलाः प्रस्थमूलाः हें सत्य डोळ्यापुढें उभें राहतें. या करितां गेल्या वर्षीच संस्थेस नियमबद्ध घटना करण्यांत आली. संस्थेच्या कार्यास अनेक दृष्टीनें सहकार्य मिळावें म्हणून निरनिराळ्या दर्जाच्या सभासदत्वाची योजना करण्यांत आली. या पुढेंही जाऊन संस्थेला चिरस्वरूप येण्याकरितां आणि कायम निधीची योजना करण्याकरितां, ही शारदाश्रम संस्था कायदेशीर रीतीनें लवकरच रजिष्टर करण्याचा चालक मंडळीचा विचार आहे.

गेल्या वर्षाच्या घटनेंतच असें ठरलें कीं, संस्थेनें प्रकाशित केलेले ग्रंथ संस्थेच्या सभासदांना सवलतीनें देण्यांत यावे. त्याच प्रमाणें संस्थेच्या सभासदांपैकीं संशोधकांनीं आणि संस्थेशीं सहकार्य करण्याचा विद्वान संशोधकांनीं वर्षामध्यें जें संशोधनकार्य, संशोधनाच्या निरनिराळ्या शाखांत, केलें असेल त्यावर निबंध लिहवून ते, शारदाश्रम वार्षिक नांवाचा ग्रंथ दरवर्षी प्रकाशित करून, त्याच्या द्वारें जनतेसमोर मांडावे आणि असला ग्रंथ शारदाश्रमाच्या सभासदांना भेट म्हणून देण्यांत यावा. याच योजनेस अनुसरून आजचा हा शारदाश्रमाचा प्रथम वार्षिक ग्रंथ प्रसिद्ध होत आहे.

**प्रस्तुत वार्षिकाची योजना**

या ग्रंथांत प्रसिद्ध होणारे लेख मध्यप्रांत आणि वऱ्हाडांत वाङ्मय क्षेत्राच्या निरनिराळ्या शाखांत संशोधनकार्य करणारे विद्वान गृहस्थांचे आहेत. या शोध–निबंधाबरोबरच प्राचीन मराठी वाङ्मयांतील तेराव्या शतकांतील 'श्री चक्रपाणी चरित्र' नांवाचा एक गद्य ग्रंथ, 'वृद्धाचार' नांवाचा १४ व्या शतकांतील एक गद्य ग्रंथ, १६ व्या शतकांतील एका कवयित्रीचें 'हंसांचा स्वयंवर' नांवाचें एक छोटें काव्य आणि कांहीं महत्वाचा ऐतिहासिक पत्रव्यवहारही द्यावयाचा होता. परंतु नियोजित पृष्ठें शोध.–निबंधांतच गुंतल्यामुळें हा मूळ साहित्यसंग्रह दुसरा एक स्वतंत्र खण्ड म्हणून प्रकाशित

करावयाचा असें ठरविलें आहे. हे मूळ ग्रंथ लिपीमधून उतरून घ्यावयास आणि त्यावर स्फुटें लिहावयास आमचे स्नेही पं. बाळकृष्ण शास्त्री. प्रो. कोलते आणि श्री. वा. ना. देशपांडे यांचें सहकार्य कारणीभूत झालें आहे. हाहि खण्ड लवकरच महाराष्ट्रीय रसिकांच्या हातीं पडेल.

प्रस्तुत वार्षिकांत कांहीं शोध—निबंध इंग्रजींत आले आहेत आणि कांहीं मराठींत आले आहेत. निव्वळ इंग्रजी जाणणारांकरितां मराठी निबंधांचा शेवटीं इंग्रजींत आणि निव्वळ मराठी जाणणारांकरितां इंग्रजी निबंधांचा मराठींत गोषवारा दिला आहे. ही पद्धति स्वीकारण्याचें कारण उघडच आहे. या वार्षिकांतील शोध निबंधांचा मराठी जाणणाराला आणि माहाराष्ट्रांतील अथवा बाहेरील मराठी न जाणणाऱ्या आंग्लभाषाभिज्ञांसही उपयोग व्हावा हा आहे. अशा तऱ्हेचा प्रयत्न रसिक वाचकांस कितपत उपयुक्त वाटतो त्यांवर पुढील वार्षिकांचें धोरण राहील.

प्रस्तुत वार्षिकांत ज्यांचे लेख आले आहेत ते आपआपल्या शाखेंत तज्ञ म्हणून प्रसिद्ध आहेत. तथापि संपादक या नात्यानें कर्तव्य समजून आम्ही त्यांचा येथें अल्प परिचय द्यावयाचें ठरविलें आहे.

**१ वार्षिकांतील लेखकांचा परिचय**

१ रा. ब. हिरालाल बी. ए. हे सेवानिवृत्त डेप्युटी कमीशनर आहेत. हल्लीं मध्यप्रांत कटणी येथें राहतात. यांचें नांव या प्रांतातील पुराणवस्तु संशोधन आणि प्राचीन इतिहास या संबंधानें प्रसिद्ध आहे.
Castes & tribes in C. P. Descriptive list of inscriptions in C. P. & Berar, Descriptive list of manuscripts in C. P. & Berar
वगैरे ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. अनेक ताम्रपटांचा आणि शिलालेखांचा त्यांनीं शोध लावून यांचें वाचन केलें आहे. हे हिंदीचेही विद्वान आहेत. पाटणा येथें सन १९३१ मध्यें Oriental Conference झाली त्याचे हे अध्यक्ष होते. यांचा Prehistoric Berar हा छोटा लेख या वार्षिकांत आला आहे.

२ प्रो. हिरालाल जैन एम्. ए. एलएल्. बी. हे उमरावतीस किंग एडवर्ड कॉलेजमध्यें संस्कृतचे प्रोफेसर आहेत. यांचा संस्कृत, अर्धमागधी आणि

अपभ्रंश या भाषांचा अभ्यास चांगला आहे. हे स्वतः जैनधर्मी असल्यामुळें त्यांचा जैन वाङ्मयाकडे विशेष ओढा आहे. रा. ब. हिरालाल हे Descriptive list of manuscripts हें पुस्तक लिहीत असतांना, यांना कारंजा येथील जैन-ग्रन्थभाण्डार तपासण्याकरितां एक महिना सरकारानें नेमिलें होते. यांच्या परिश्रमानेंच कारंजा येथील जैन ग्रन्थभाण्डारांची उपयुक्तता विद्वानांच्या नजरेस आली. वरील पुस्तकांतील जैन हस्तलिखितांवरील नोट्स यांच्याच आहेत. यांनीं हल्लीं अपभ्रंश भाषेतील ग्रंथप्रकाशनाचें कार्य सुरू केलें आहे. 'यशहर चरिउ,' 'सावयधम्म दोहा' हे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले असून 'करकण्डु चरिउ' आणि 'नायकुमार चरिउ' हे दोन ग्रंथ प्रेसमध्यें आहेत. यांचा पुराणवस्तु संशोधन, ताम्रपट व शिलालेख यांच्या वाचनांचा व प्राचीन स्थळांचें निरीक्षण करण्याचाही बराच व्यासंग आहे. यांनीं वऱ्हाडांतील प्राचीन अवशेषांवर या वार्षिकांत इंग्रजीमध्यें लेख लिहिला आहे.

३ पं. लोचनप्रसाद पांडेय हे विद्वान गृहस्थ हिंदीचे प्रसिद्ध कवि आणि लेखक आहेत. ते बालापुर मध्यप्रांत येथें राहतात. यांनीं छत्तीसगडमध्यें पुराणवस्तुसंशोधनाचें फार मोठें कार्य केलें आहे. यांनीं बरेच ताम्रपट आणि शिलालेख प्रकाशांत आणलें आहेत. यांनीं दोन वर्षांपासून महाकोसल हिस्टॉरिकल सोसायटी स्थापन केली आहे. आम्हास या सोसायटीचे सन्मान्य सभासद व्हावयाचा मान मिळाला आहे. हे नागपुरला भरलेल्या हिस्टॉरिकल रेकर्डस कमीशनच्या अधिवेशनांत सभासद होते. यांनीं Box headed Characters in Mahakosala हा इंग्रजींत या वार्षिकांत लेख लिहिला आहे.

४ डॉ. जी. ए. पी. हंटर एम्. ए. डी. फील आय्. इ. एस्. हे विद्वान गृहस्थ नागपुरास मॉरीस कॉलेजांत इतिहास विषयाचे प्रोफेसर आहेत. यांना पुराणवस्तुसंशोधनाचा बराच व्यासंग आहे. सिंध मधील मोहेंझोडारो येथील उत्खननाचें कार्य स्वतः जाऊन निरीक्षण केलें आहे. मध्यप्रांतांतही यांनीं मनसार, माहुरझिरी इत्यादि प्राचीन अवशेषांचीं स्थळें निरीक्षण करून प्राचीनमुद्रा, गुप्तकालीन विटा आणि प्राचीन प्रस्तरमूर्ति जमाविल्या

आहेत. खडकावरील प्राचीन लेखांचेंही वाचन करण्याचा यांना व्यासंग आहे. यांनीं या वार्षिकांत Antiquities of Mahurzari हा सचित्र इंग्रजी लेख लिहिला आहे.

५ श्री. ए. आर. देशपांडे बी. ए. एल् एल् बी. हे सध्या मध्यप्रांतांत दमो येथें सबजज्ज आहेत. हे अनिल कवि या नांवानें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. यांचा 'फुलवात' या नांवाचा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला आहे. यांना पुराणवस्तुसंशोधनाचाही बराच नाद आहे. यांनीं विदर्भाची प्राचीन राजधानी कुन्डिणपुर येथें स्वत: जाऊन निरीक्षण केलें आहे. तेथें प्राचीन अवशेष सांपडतील अशी त्यांना उमेद आहे. तेथील कांहीं प्राचीन वस्तूही संग्रहांत केल्या आहेत त्या नागपुरास हिस्टारिकल रेकर्डस कमीशनची बैठक झाली, तेव्हा प्रदर्शनांत मांडल्या होत्या .सरकारानें या प्राचीन जागेवर उत्खनन करावें अशी त्यांची फार खटपट आहे. या वार्षिकांत त्यांनीं Kundinpur, the Ancient Capital of Vidarbha हा इंग्रजी लेख लिहिला आहे.

६ सय्यद अबदुर रझाक हे मुसलमान गृहस्थ सेवानिवृत्त क्लार्क आफ कोर्ट आणि ऑ. माजिस्ट्रेट छिंदवाडा येथें असतात. यांचा पार्शिअन भाषेंत लिहिलेल्या इतिहास ग्रंथांचा व्यासंग असून त्या आधारें त्यांनीं इग्रजींत एक वऱ्हाडचा इतिहास लिहिला आहे; तो अद्याप अप्रकाशित आहे. त्यांनीं पार्शिअन ग्रंथांच्या आधारें Division of Berar in Mahomodan times हा लेख या वार्षिकांत इंग्रजी मध्यें लिहिला आहे.

७ वि. केशव लक्ष्मण दफ्तरी बी. ए. एल् एल् बी. हे नागपूरचे विद्वान गृहस्थ आपल्या ज्योतिषविषयक करणग्रंथांमुळें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. यांची राहणी साधी असून विद्वत्ता फार दांडगी आहे. यांचा धर्मरहस्यही ग्रंथ फार उत्कृष्ट आहे. वैद्यकीचाही व्यासंग चांगला आहे. यांचे महाभारत, रामायण इत्यादिकांच्या कालनिर्णयासंबंधींचे लेख प्रसिद्ध आहेत. तसेंच त्यांचा वेदकाळनिर्णयपद्धति या वरील लेखही फार उत्कृष्ट आहे. या वार्षिकांत त्यांनीं वेदकालनिर्णयावर लेख लिहिला आहे'

८ वे. शा. सं. कृष्णशास्त्री घुले हे नागपुर येथील प्रसिद्ध शास्त्री घराण्यांतील एक विद्यमान विद्वान गृहस्थ आहेत. हे पूर्वपरंपरापद्धतीनें शिकले असून यांचा इंग्रजी शास्त्रीय ग्रथांचाही चांगला परिचय आहे. यांचे श्रुति स्मृति इत्यादि शास्त्रीय ग्रंथांवरील लेख फारविद्वत्तापूर्ण असतात. यांनीं या वार्षिकांत ' भ्रातृव्य आणि सपत्न ' या शब्दांवर फार विद्वत्तापूर्ण व्याख्यान केलें आहे.

९ प्रो. वा वी. मिराशी एम्. ए. एल् एल् बी. हे नागपुरास मॉरिस कॉलेजमध्यें संस्कृत भाषेचे प्रोफेसर आहेत. यांचा प्राचीन इतिहासाचा चांगला परिचय आहे. शिलालेख आणि ताम्रपट यांचें वाचन करून त्यावर विचिकीत्सक चर्चा करून ऐतिहासिक नवीन माहिती प्रकाशांत आणण्याचा यांचा व्यासंग चांगला आहे. या वार्षिकांत यांनीं ' रामगुप्ताच्या चरित्रावर नवानें प्रकाश ' हा निबंध लिहिला आहे.

१० कवि मयूर लक्ष्मण शास्त्री गाडगे हे जुन्या पद्धतीनें शिकलेले शास्त्री वाशिम येथें राहतात. हे कथाही करतात, तसेच उत्कृष्ट पुराणिकही आहेत. यांचा संस्कृत वाङ्मयाचा व्यासंग दांडगा आहे. यांना संशोधनाचीही फार आवड आहे. ' नामदेवांची नरशी ' कोणती, या बद्दल यांनीं शोधपूर्वक लेख लिहिला आहे. ' वत्सगुल्म आणि राजशेखर ' या संबंधानेंही शोधपूर्वक निबंध लिहिला आहे. या वार्षिकांत ' वत्सगुल्म आणि गुणाढ्य ' यावर शोध निबंध लिहिला आहे.

२१ श्री. ह. ना. नेने एम्. ए. एल्. टी. हे नागपूर येथें पटवर्धन हायस्कूलमध्यें शिक्षक आहेत. यांनीं आणि नागपुरचे दुसरे विद्वान गृहस्थ श्री. नि. व. भवाळकर यांनीं महानुभावीय लिपीचा आणि वाङ्मयाचा अभ्यास करून गेल्यावर्षी ' श्रीचक्रधरसिद्धान्तसूत्रें ' हा महानुभावीय ग्रंथ प्रकाशित केला. यावरून त्यांची विद्वत्ता आणि उद्योगशीलता दिसून येते. या उभयतांनीं नागपूर येथें महानुभावीय वाङ्मयाच्या संशोधनाचें आणि अभ्यासाचें एक केंन्द्र उघडलें आहे. या वार्षिकांत श्री. नेने यांनीं ' दुर्भगाप्रमेय ' या नांवाच्या एक दृष्टांतावरील प्रमेयावर निबंध लिहिला आहे.

१२ श्री. पं. बाळकृष्ण शास्त्री हे पंजाब युनिव्हर्सिटीचे शास्त्री असून माहूर येथील देवदेवेश्वर संस्थानच्या सुप्रसिद्ध विद्वान महंत दत्तलक्षराज यांचे पट्टशिष्य आहेत. हे स्वतः महानुभाव असल्यामुळें त्यांचा महानुभाव वाङ्मयाचा चांगलाच व्यासंग आहे. यांचे लेख शोधपूर्वक आणि विचिकीत्सक असतात. यांचा श्रुति स्मृति पुराणें इत्यादि ग्रंथांचाही व्यासंग चांगलाच आहे. हे हिंदीचेही लेखक आहेत. यांनीं विविधज्ञानविस्तारांत 'श्री.चक्रधर चरित्र-भूमिकापर ऐतिहासिक दृष्टि' या नांवाचा एक साधार विस्तृत लेख लिहिला आहे. याच लेखाचा सारांश रूपानें अनुवाद या वार्षिकांत 'श्री चक्रधरस्वामीचा कालनिर्णय' या नांवानें त्यांनीं दिला आहे,

१३ श्री. यादव माधव काळे बी. ए. एल् एल्. बी. हे वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध विद्वान गृहस्थ बुलडाणा येथें वकीली करितात. हे नागपूर कौन्सिलचे अध्यक्ष होते. 'वऱ्हाडचा इतिहास' या नांवाचा त्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ आहे. त्या ग्रथामुळें यांचें नांव इतिहासकारांत चिरस्थायी झालें आहे. तो ग्रंथ म्हणजे सतत वीस वर्षांच्या त्यांच्या व्यासंगाचें दृश्यफल होय. यांनीं आणि रा. सा. गोविंदराव सरदेसाई यांनीं मिळून नागपूरकर भोसल्यांचे कागदपत्र सटीप पुर्नमुद्रित केले आहेत. हल्लीं हे नवीन उपलब्ध सामुग्रीच्या आधारानें भोसल्यांचा विस्तृत इतिहास लिहीत आहेत. या वार्षिकांत त्यांनीं त्याच विषयास अनुसरून 'आप्पासाहेब व मनभट' हा लेख लिहिला आहे.

१४ श्री. द. बा. महाजन बी. ए. हे विद्वान आणि उत्साही गृहस्थ मेहकर येथें नायब तहसीलदार आहेत. यांना वाङ्मय आणि इतिहास या विषयावरील संशोधनाची आवड आहे. 'विष्णुदास कवींची कविता' जमवून प्रसिद्ध करण्यामध्यें हे आमचे सहकारी होते. हल्लीं यांनीं गोसावीनंदनाची कविता व कवी संबंधानें माहिती जुळविली आहे. ती प्रकाशित करण्याचा त्यांचा विचार आहे. त्यांनी शिंदखेड घराण्याचे बरेच एतिहासिक कागद जुळविले आहेत, आणि त्यावरून जाधवांचा विस्तृत इतिहास लिहाव-

याचा त्यांचा विचार आहे. शिलालेख आणि ताम्रपट यांच्या शोधाकडेही त्यांचे लक्ष आहे. नुकताच एक शिलालेख लोणार येथे आणि एक ताम्रपट अन्यत्र मिळविला आहे. शिंदखेड येथे स्वतः जाऊन त्यांनी तेथील अवशेषांचे फोटो घेतले आहेत. या वार्षिकांत ' जिजाऊचे माहेर अर्थात शिंदखेड राजा ' हा लेख सचित्र दिला आहे.

१५ लो. ना. माधव श्रीहरी अणे बी. ए. एल्‌ एल्‌. बी. हे विद्वान गृहस्थ राजकारणांतील एका विशिष्ट संप्रदायाचे अखिल भारतांतील पुढारी ह्मणून प्रसिद्ध आहेत. राजकारणांतील त्यांच्या कर्तृत्वाप्रमाणेंच त्यांचें वाङ्मय क्षेत्रांतीलही कार्य महाराष्ट्रांत महशूर आहे. हे ग्वाल्हेर येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष होते. यांच्या विविधविषयावरील अनेक ग्रंथांच्या प्रस्तावना प्रसिद्धच आहेत. गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेले त्यांचे लेख व भाषणें हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांतील वाङ्मयावरील लेख फार उत्कृष्ट आहेत. गेल्या वर्षी राजकारणामध्ये त्यांना कारावास झाला, त्यावेळीं त्यांनीं महाभारताचें विचिकीत्सक पद्धतीनें अध्ययन केलें आहे. त्या अध्ययनाचा निष्कर्ष ह्मणून महाभारतावर एक विचिकीत्सक ग्रंथ ते लिहिणार आहेत. श्री. अणे हे शारदाश्रम संस्थेचे अध्यक्ष आहेत. यांनीं या वार्षिकांत ' महाभारतशतसाहस्त्रीसंहिता बुद्धपूर्वकालीन कीं उत्तर कालीन ' यावर एक साधारण निबंध लिहिला आहे. वास्तविक कालानुक्रमानें हा लेख या वार्षिकांत क्रमांक ३ ह्मणून यावयास पाहिजे; परंतु त्यांच्यावर कांग्रेसचे अध्यक्ष या नात्यानें राजकारणाची जबाबदारी असल्यामुळें, आणि कलकत्ता येथें होणाऱ्या अधिवेशनासंबंधानें ते राजकारणांत व्यग्र असल्यामुळें त्यांना वेळेवर लेख लिहिणें शक्य झालें नाहीं. कांग्रेसच्या अधिवेशनाची तारीख टळल्यावर कारागृहांतून त्यांची मुक्तता झाल्यावर त्यांनीं हा लेख लिहिला त्यामुळें, तो शेवटीं छापावा लागला. राजकारणांतील ऐन गडबडीच्या काळांतही ते साहित्यास विसरले नाहीं, ही त्यांच्या मनाच्या समतोलपणाची साक्ष आहे.

या प्रमाणें प्रस्तुत वार्षिकांत लिहिणाऱ्या विद्वानांचा अल्पसा परिचय आहे. शारदा-श्रमांत सहकार्य करणारे आणि शारदाश्रमाचे आधारस्तंभ श्री. वा. ना. देशपांडे, प्रो. कोलते इत्यादि विद्वानांचे लेख स्थलाभावामुळें इद्दाम मागें ठेवावे लागले.

**१० वार्षिकास ग्रंथ सहाय्य**

या वार्षिकांत संपादक या नात्यानें, आम्ही 'माहूरचे राजे उदाराम घराणें' या इतिहास प्रसिद्ध घराण्याचा इतिहास दिला आहे. मोगलकालापासून वऱ्हाडांत जीं दोन इतिहास-प्रसिद्ध घराणीं आहेत, त्यांतील हें एक होय. हा इतिहास विशेषतः श्री. काळे यांचा वऱ्हाडचा इतिहास, घराण्यांतील सनदा व कागदपत्रें आणि पर्शिअन ग्रंथाच्या आधारें बेनीप्रसाद यांनीं इंग्रजींत लिहिलेल्या 'जहांगीर' या ग्रंथावरून दिला आहे. या प्रमाणेंच प्रत्येक वार्षिकांत एक एका इतिहासप्रसिद्ध घराण्याचा इतिहास आणि विद्यमान कर्त्या पुरुषाचा फोटो देण्याचें योजिलें आहे. प्रस्तुतचा वार्षिक ग्रन्थ प्रकाशित व्हावयास या घराण्यांतील माहूर शाखेचे कर्ते पुरुष श्री. राजे जगजीवनराव बाबासाहेब उदाराम देशमुख आणि राजे व्यंकटराव भाऊसाहेब उदाराम देशमुख या उभयता पितापुत्रांचें औदार्यच कारणीभूत झालें आहे. प्रस्तुत ग्रंथ प्रकाशनास त्यांनीं तीनशे रुपये देणगी देण्याचें अभिवचन दिलें आहे. राजे जगजीवनराव हे लवकरच शारदाश्रमाचे आश्रयदाते होणार आहेत.

**११ मुद्रण कार्य**

संपादकांचा हा अनुभव असतो, कीं संपादक आणि मुद्रणयंत्र हे एकेच ठिकाणीं असल, तरच प्रूफ तपासण्याचें आणि पुस्तक छपाईचें काम मनाजोगें व्हावयाचें. परंतु असली उणीव प्रस्तुत पुस्तक छापविण्यासंबंधानें भासली नाहीं, याचें सर्व श्रेय विदर्भ प्रेसचे विद्वान मालक श्री. कुरकुरे आणि प्रो. विष्णुपंत कोलते यांच्याकडे आहे. उभयता तरुण आणि उत्साही गृहस्थ शारदाश्रमाचे सहकारी सभासद आहेत. या उभयतांच्या निरलस परिश्रमानेंच प्रुफ तपासण्याचें व इतर

जिकीरीचीं कामें पार पडून उत्कृष्ट आणि सर्वांगपूर्ण असा हा ग्रंथ महाराष्ट्र रसिकांच्या हातीं पडत आहे. औपचारिक आभार मानण्यानें त्यांच्या कामगिरीची भरपाई केव्हांही व्हावयाची नाहीं.

शारदाश्रमाचा हा प्रयत्न वाङ्मयमहोदधींत एक पळीभर जल ओतण्यासारखा आहे. तथापि त्या अल्पशा पत्रपुष्पसेवेनें श्रीशारदादेवी संतुष्ट होऊन या शारदाश्रमांत सहकार्य करणाऱ्या निरपेक्ष सेवकांकडून उत्तरोत्तर जास्त सेवा करवून घेवो, अशी नम्र प्रार्थना करून हें संपादकीय निवेदन पुरें करतों.

**१२ अभ्यर्थना**

॥ इतिशम् ॥

शारदाश्रम, यवतमाळ
चैत्र शु॥ १५ शके १८५५

वाङ्मय सेवक
**यशवन्त खुशाल देशपांडे,**
चिटणीस



श्री. राजे जगजीवनराव उर्फ बाबासाहेब उदाराम देशमुख,

जहागीरदार माहूर.

# PREHISTORIC BERAR

( R. B. **Hiralal** B. A. Retired Deputy Commissioner Katri. )

The country known as Berar is a very ancient Aryan colonization going back to the medieval Rigvedic period, when the poet Mandarya Agastya flourished and composed songs in honour of the Vedic gods Indra and the Maruts. In fact he had a very close relation with the country as he was married to Lopamudra, the daughter of the king of the country, which was then known as Vidarbha.

It is said that in course of ages the latter assumed the name of Berar, by what process it is difficult to state. Folk-etymology would relegate it to other Sources, such as Bar or Bad ( Sansk. Vata, a Banyan tree ), as that tree has played, a great part in giving names to places, a prominent example of which may be found in Baroda, a wellknown leading state. Mr. Govind Bhai H. Desai, B. A. LL. B., a quandom Superintendent of Census in that state derives it from the Sanskrit word Vatodara, meaning in the heart of the Vata or Banyan tree. The learned Abul Fazl would make it a variant of wardhatata saying 'wardha rude ast va tata kinar ast' that is the country bordering on the river wardha, from which Rajwade appears to have taken a clue and worked out wardhahara = wardha + ahara as the pesent word giving the same sense and satisfying phonetic and philological exigencies, the gradual transformations being wadhdhahara, wadhar, warhad and finally Berar. A local tradition would make it a corruption of Varahata, meaning a market of bridegrooms, either from the custom of kolams ( a pre-Dravidian tribe found in Berar ), whose females capture men for their husbands or from the detention of Barharis or Baratis, who accompanied Sri Krishna, when he abducted Rukmini. These derivations may be taken for what they are worth but there is no gain saying the fact that Vidarbha occupied the country which is now called Berar. It is one of the two countries which enjoyed prominence in the earliest times, when the Aryans crossed the Vindhyas and settled in what was then

known as Dakshinapatha, the other being Kosala, whose king during Nala's time was Rituparna. The latter, as is supposed by some people, was not the king of Kosala whose capital was Ayodhya, but of the neighbouring country of the same name, sometimes distinguished from the northern one by the addition of Dakshina or the southern. Ancient literature gives it another name, Viz-S'aphala which seemes to have been forgotten altogether.

Nala when he was ousted from Nishadha by his brother Pushkara proceeded to the souh and before starting pointed out the way to Dakshina Patha to his wife in these words --

एते गच्छन्ति बहवः पन्थानो दक्षिणापथम् ।
अवन्तीमृक्षवन्तं च समतिक्रम्य पर्व्वतम् ॥
एष विन्ध्यो महाशैलः पयोष्णी च समुद्रगा ।
आश्रमाश्च महर्षीणां बहुमूलफलान्विताः ॥
एषः पन्था विदर्भाणामसौ गच्छति कौशलान् ।
अतः परंच देशोऽयं दक्षिणो दक्षिणापथ : ॥

The Vindhya Mountain stood just infront of the Nishadha country & the roads across it led to the Vidarbha and Kosala countries. When Nala finally abandoned Damyanti in the forest, he passed through the kingdom of Karakotaka Naga before he reached Rituparna's capital.

The Nagas were spread far and wide but the country we are concerned with was apparently the same of which Nagpur formed the centre. In my article on a visit to Ramtek, which I contributed to the Indian Antiquary of 1908, I gave reasons for my locating the capital of Dakshina Kosala at Bhandak in the Chanda district, at least in the Budhdhistic period. The tradiltion still prevails that its old name was Bhadravati, and that it was once a big city and capital of a country, which is supported by its numerous relics with exquisite carvings and the discovery of an inscription disclosing a line of Kshatriya kings, that ruled there. This place suits very well for Rituparna's capital, to which Nala went and accepted service as a charioteer under him. It is on record that Nala drove Rituparna

from his capital to that of Vidarbha in approximately 11 hours. At that time Kaundinyapur which still exists uuder the same name in Berar, was the capital of Bhishmaka, whom Rituparna went to meet. The distance between Bhandak and Kaundinyapur is about 80 miles as the crow flies.

Allowing 20 miles for the inevitable circuits of a chariot route the speed of the horses would come to about 9 miles an hour, which is plausible and a creditable performance under an expert driver. The other known capitals of Dakshina Kos'ala were Sirpur ( old S'irpur ) of the Raipur district and Tummana and Ratanpur of Bilaspur. The latter two were established by the Haihayas in the tenth century A. D. at the earliest. So they are out of the question so far as Rituparna is concerned. As regards Sirpur it is not known when it became a capital, but the distance between it and Kaundinyapur is so great as to make it impossible for horses to cover the distance in 11 hours, howsoever expert the driver might have been.

Crossing 250 miles in a straight-line would give an incidence of about 23 miles an hour for the chariot's horses to run and if the windings of the road are taken into consideration in the same Proportion as done before in the case of Bhandak, this incidence would go up to about 27 miles an hour, which would execeed the Railway and motor car speed attainable in these days between Sirpur and Kaundinyapur. So it is clear that the capital of Kos'ala was not very far away from that of Vidarbha and the two countries abutted on each other. Both of them were named after their founders Kos'ala took its name from Kus'a, son of Rama and Vidarbha after a king of that name quite in keeping with the names of other places of those times, for instance, Ariga, Chedi, Vis'ata, S'ravasti etc. ie the river Wardha formed the boundaries between the two countries, which have been so confased by archaeologists, as to make one run on the other or lie far apart, with some unknown or unnamed countries between them. In later history some over lapping did take place, but the original position at the time of the earliest Aryan settlement appears to have been what has been pointed out above.

# MATERIALS FOR
# HISTORICAL RESEARCH IN BERAR.

By Prof. **Hiralal Jain** M. A., LL. B.,
King Edward College, Amraoti.

The chief materials of historical research in India consist of literary and historical writings, old tradition and archaeological remains such as stone, copper plate and image inscriptions, coins and architectural monuments. I shall briefly survey here these materials as they exist in Berar.

My acquaintance with the historical materials existing in Berar began in the year 1924 when I examined the Jain manuscript stores at Karanja in the Akola District, in connection with the preparation of the Provincial Catalogue of Sanskrit and Prakrit Mss. During the course of my examination of about two thousand Mss. existing there, I came upon statements of some historical importance. The results of labours there are embodied in the Catalogue published by the Government, supplemented by some independent articles contributed to various journals. I shall recount here a few points of historical importance from them in order to illustrate what sort of historical information can be gleaned even from works mainly dealing with an entirely different subject. Before doing so, however, I just wish to draw the attention of the readers to a momentious discovery which the search of the Karanja Mss. has led to. Up till very recently it was a great problem to the philologist as to how the North Indian vernaculars such as Hindi Marathi, Gujrati, and others originated. There is a vast difference between the construction of these languages and that of their remote ancestors, namely, Sanskrit and Prakrits. A link was missing between the two. From certain passages in Sanskrit and Prakrit works it was known that there was in use, at one time, a language which represented the stage between the modern vernaculars and the classical

Sanskrit and Prakrits. On the authority of certain Prakrit grammars this language was given the name of Apabhramsha, but no work written entirely in this language could be brought to light for a long time. When the famous German professor of the University of Bonn, Dr. Hermann Jacobi visited India in 1914, he made a diligent search for such a work. Fortunately for him and for Indian Philology, he at last succeeded in finding out a work of that language from a Jain Ms. store in Ahamadabad. This was the **Bhavisadattakaha** of **Dhanapala** written entirely in Apabhramsha. The Professor copied it out for himself, and, shortly after his return to Germany he published this work in Roman characters with a long introduction and copious notes in German. The same work, from another Ms., was subsequently published in the Gaekwad Oriental Series of Baroda. This work remained practically alone in the field till my announcement of the existence of several works of this language in the Karanja temple stores. I have dealt with this subject in some detail in a paper on " Apabhramsha Literature " published in the Allahabad University Studies Vol. 1. The discovery of these works opens a new and a very promising line of philological research and it redounds chiefly to the credit of Berar.

I shall now proceed to describe briefly a few historical data elicited from the aforesaid works. The **Mahapurana** of **Pushpadanta** Kavi is a voluminous work completed in 102 chapters. This work is one of the new finds. In it we find frequent mention of a king variously called Shubhatungadeva, Bhairavanarendra, Vallabharaya or Krishnaraya. This king is said to have vanquished and slain a Chola king. The poet profusely sings the praises of his patron Bharat and his son Nanna, both of whom were ministers of this king in succession From these praises much can be made out about the good government of the king. A very important statement is made by the poet at the beginning of the 87th chapter of his epic. In one beautiful verse he says " The city of Manyakheta which was a treasure-house to the needy and the helpless, which was always richly populated, which abounded in flower-gardens, which was, in short, a rival in beauty to the city of the king of gods, that same Manyakheta, so dear to the cultured, has been consumed by the

वर्षारंभनक्षत्र असल्याचे वेदांतील प्रत्यक्षनिर्देश, रोहिणी किंवा कृत्तिका ह्यांविषयींच आहेत; मृगाविषयीं किंवा पुनर्वसुविषयीं नाहींत. ह्यावरून वेद-रचना शकपूर्व ३१८० पासून २००० वर्षेपर्यंत चालू होती असें ठरतें.

ह्या सिद्धांतास पुढील ऐतिहासिक पुराव्यानेंही पुष्टि येते. वायुपुराणांत (अ. ५९) आणि मत्स्यपुराणांत (अ. १४५) मंत्रकर्त्यांची यादी दिली आहे. ह्या यादींतील व्यक्तींचे काळ ठरविणें लोकमान्यांच्या काळीं शक्य नव्हतें; पण आज तें शक्य झालें आहे. मी माझ्या "भारतीय युद्धकाल-निर्णय" आणि "वैदिक कालगणनापद्धति" ह्या निबंधांत जे सिद्धांत स्थापन केले आहेत त्यांच्या सहाय्यानें ह्या यादींतील कांहीं व्यक्तींचे काळ ठरविणें आज शक्य झालें आहे. व त्यावरून वेदरचना काळ जास्त निश्चित-पणें ठरवितां येतो. "वैदिक कालगणनापद्धति"मध्यें ठरविलेल्या गोष्टी पुढील प्रमाणें आहेत.

शकापूर्वी ३१८० वर्षे ह्या काळापासून, वासंतिक विषुवास दोन चांद्रमास होते व सर्व ग्रह अश्विनी नक्षत्रीं जुळले होते तेव्हांपासून आठव्या श्वेतवाराहकल्पास सुरुवात केली गेली. तेव्हांपासून ४०० वर्षांचे कृतयुग, ३०० वर्षांचें त्रेतायुग, २०० चें द्वापारयुग, १०० चें कलियुग घेत. १००० वर्षे गेल्यावर १२ वर्षेपर्यंत द्वादशवार्षिक सत्र करीत. त्यालाच सहस्रवार्षिकसत्र असेंही ह्मणत. पहिल्या द्वादशवार्षिकसत्राच्यावेळीं इलापुत्र पुरूरवा राजा होता; व दुसऱ्या द्वादशवार्षिकसत्राच्या वेळीं पांडवकुलोत्पन्न अधिसीमकृष्ण राजा होता. तृतीय द्वादशवार्षिकसत्र झालें नाहीं.

दरवर्षी तीस दिवसांचा एक महिना ह्याप्रमाणें बारा महिने घेत. परंतु चवथ्या वर्षी मध्यभागीं २१ दिवस अधिक घेत. ह्या ३८१ दिवसांच्या वर्षी अश्वमेध नांवाचा यज्ञ करीत. आणि इंद्रादि देव, सप्तर्षि व मनु हे अधिकारी नवीन नेमीत. चार वर्षांच्या काळालाच मन्वंतर, कल्प, चतुर्युग, किंवा युग ह्मणत. दर चवथ्या वर्षी नवीन मनु व सप्तर्षि नेमत. तरी ज्यांनीं वर्णविभाग केला असे १४ च मनु प्रसिद्ध आहेत. स्वायंभुव मनूचा काळ शकपूर्व

२७४८, चाक्षुषमनूचा काळ शकपूर्व २५००, आणि वैवस्वत मनूचा काळ शकपूर्व २२२८ हा ठरविला आहे. श्रीरामांचा जन्म शकपूर्व १६८७ व भारतीय युद्धकाल शकपूर्व १२७५·३ हा आहे.

प्रवर्तयंति वेदांश्च भुविसप्तर्षयो द्विजाः ॥ ॥२१॥ (अग्निपुराण अ. १५० वा) ह्या निश्चितार्थक वचनावरून सप्तर्षिच वेद स्वतः करून किंवा दुसऱ्यानें केलेले पसंत करून प्रसिद्ध करीत असें ठरतें. (सप्तर्षि प्रत्येक मन्वंतराच्या वेळीं होत.) ह्मणूनच सप्तर्षिपैकीं कित्येक मंत्रकर्त्यांच्या यादींत आहेत, आणि मंत्रकर्त्यांच्या यादीमध्यें नाहींत असेंही कित्येक सप्तर्षि आहेत.

सप्तर्षिच वेद प्रसिद्ध करीत ह्यावरून आणि सप्तर्षि मन्वंतराच्या वेळींच होत ह्यावरून, पहिल्या स्वायंभुव मन्वंतराचा जो काळ तोच वेदरचनारंभ ठरतो. स्वायंभुव मनूचा काळ मी गतवाराहकल्प ४३२ ह्मणजे शकपूर्व २७४८ हा ठरविला आहे (वैदिक कालगणनापद्धति पा. ५४—५५). ह्यावेळीं विषुवबिंदु रोहिणीयोगताऱ्याजवळच होता.

स्वायंभुव मनु व त्या वेळचे सप्तर्षि ह्यांनीं तरी यज्ञपद्धति ब्रह्मदेवापासून चालत होती तीच सांगितली, नवीन सांगितली नाहीं, असें पुढील वचनांवरून दिसतें.

**तत्रत्रेतायुगस्यादौ मनुः सप्तर्षयश्चये ।**
**श्रौतं स्मार्तंच धर्मंच ब्रह्मणा च प्रचोदितं ॥ ३९ ॥**
**दाराग्निहोत्रसंयोगं ऋग्यजुःसामसंज्ञितं ।**
**इत्यादिलक्षणं श्रौतं धर्मं सप्तर्षयोऽब्रुवन् ॥ ४० ॥**

अ. ५७ वायुपुराण

**पूर्वेभ्यो वेदयित्वेह श्रौतं सप्तर्षयोऽब्रुवन् ।**
**ऋचो यजूंषि सामानि ब्रह्मणोऽगानिचश्रुतीः ॥ ३१ ॥**

वायुपुराण अ. ५९ वा

(मत्स्यपुराण अ. १४२ व १४५ ह्यांतही अशींच वचनें आहेत.)

अर्थः—ब्रह्मदेवानें सांगितलेलाच श्रौतस्मार्त धर्म मनु व सप्तर्षि जे होते त्यांनीं त्रेतायुगाच्या आरंभीं सांगितला. ऋग्यजुःसाम नांवाचा स्त्रीसंयोग

आणि अग्निहोत्रसंयोग इत्यादि लक्षणांचा श्रौतधर्म सप्तर्षीनीं सांगितला ॥४०॥

सप्तर्षीनीं पूर्वीच्याच लोकांपासून ऐकून घेऊन श्रौतधर्म सांगितला, ह्मणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि ब्रह्मांच्या ( वेदांच्या ) अंगभूत अशा श्रुति ( ब्राह्मणें ) सांगितल्या.

ह्यावरून स्वायंभुवमन्वंतरीदेखील सप्तर्षीनीं श्रौतधर्म ह्मणजे यज्ञधर्म ब्रह्मदेवापासून चालू होता तोच सांगितला हें ठरतें. पूर्वी जो धर्म तोंडानेंच सांगितला जात होता त्यालाच स्वायंभुवमन्वंतरीं ग्रंथाचें रूप देण्यांत आलें असें यास्काचार्यांच्या पुढील वचनांवरून दिसतें

**"साक्षात्कृतधर्माण ऋषयो बभूवुः। तेऽवरेभ्यो ऽसाक्षात्कृतधर्मभ्यउपदेशेन मंत्रानूसंप्रादुः। उपदेशाय ग्लायंतोऽवरे बिल्मग्रहणायेमं ग्रंथं समाम्नासिर्षुवेदंवेदांगानिच"॥ ५ ॥**

प्रथमाध्याय पाद ६ वा.

आतां हा श्रौतधर्म तरी कसा होता ? दर चौथ्या वर्षी ह्मणजे मन्वंतरीं नवीन मंत्ररचना करून त्या मंत्रांनीं अश्वमेध यज्ञ करावयाचा हा एक श्रौतधर्म होता हें पुढील विचारावरून दिसून येतें.

अश्वमेध यज्ञ दर चौथ्या वर्षी करीत आणि चार वर्षांच्या काळालाच 'युग' आणि 'मन्वंतर' हीं नांवें होतीं असें मी "वैदिककालगणनापद्धति" मध्यें दाखविलें आहे. येथें फक्त दर युगीं नवीन मंत्ररचना करीत असें दाखवावयाचें आहे. तें पुढील दोन वचनांनीं सिद्ध होतें.

"युगेयुगे विदथ्यं गृणद्भ्यो यशसंधेहि नव्यसी" ॥ ऋग्वेद ६।८।५

अर्थः—प्रत्येक युगांत नवीन स्तुति ह्मणणाऱ्या आह्मांस तूं यज्ञोपयोगी धन आणि यश दे.

**संवत्सरो वै प्रजापतिरग्निः। ऋचो व्यौहत्। द्वादशबृहतीसहस्राण्येतावंत्योहर्चोयाप्रजापतिसृष्टाः। अथेतरौ वेदौ व्यौहत्। द्वादशैवबृहतीसहस्राण्यष्टौ यजुषांचत्वारिसाम्नाम् पेतावद्धैतयोर्वेदयोः प्रजापतिसृष्टम् ॥ २४ ॥**

( शतपथ ब्राह्मण कांड १० अ. ४ प्र २ ब्रा. १८ वें )

अर्थ:—संवत्सर हाच प्रजापति व अग्नि होय. त्यानें ऋग्वेदाचा व्यूह केला. तेव्हां ऋग्वेद बारा हजार बृहतीबरोबरच भरला. प्रजापतीनें ह्मणजे संवत्सरानें उत्पन्न केलेल्या ऋचा इतक्याच आहेत. नंतर दुसऱ्या दोन वेदांचा व्यूह केला तेव्हां यजुर्वेद ८००० बृहती व सामवेद ४००० बृहती भरला. दोन्ही मिळून बारा हजार बृहती भरल्या. प्रजापतीनें उत्पन्न केलेले यजुर्वेद व सामवेद इतकेच आहेत.

**नियमानें** दर चौथ्या वर्षी ऋग्यजु:साम मंत्राची रचना करीत, ह्मणूनच संवत्सरानें मंत्र केले असें वर ह्मटलें आहे हें वरील वचनांवरून उघड आहे.

**प्रतिमन्वंतरंचैव श्रुतिरन्याविधीयते ।**
**ऋचो यजूंषि सामानियथाव प्रतिदैवतं ॥ ५० ॥**

वा. पु. अ. ५९ वा

ह्या वचनांत तें स्पष्टच सांगितलें आहे. कारण, मन्वंतर ह्मणजे चार वर्षे किंवा युग हें पुढील वचनांत सांगितलें आहे.

**तेषां सप्तर्षयो धर्मं कथयत्यंतरेषुच ॥ १०६ ॥**
**तातु धर्म व्यवस्थार्थं तिष्ठंतीहायुगक्षयात् ॥ १०८ ॥**

वा. पु. अ. ५८ वा.

स्वायंभुव मनूनें जे धर्म सांगितले ते पूर्वी ब्रह्मदेवानेंच सांगितलेले होते. व ब्रह्मदेवानें धर्म कृतयुगारंभीं सांगितले ( महाभारत शांतिपर्व अ. ५९ श्लो. १३—३० ). ह्यावरून स्वायंभुवमनूच्या पूर्वीच्या कृतयुगारंभापासूनच ह्मणजे शकपूर्व ३१८० पासूनच वेदरचना सुरू झाली असली पाहिजे.

मंत्रकर्त्यांमध्यें पहिल्या मन्वंतरीं झालेले सप्तर्षि अंगिरा, अत्रि, आणि वसिष्ठ हे सांगितलेले आहेत ( ह्यांचा काळ अर्थातच शकपूर्व २७४८ आहे. ) द्वितीय मन्वंतरांतील सप्तर्षि ऊर्व चवथ्या मन्वंतरांतील काव्य, सातव्या वैवस्वत मन्वंतरांतील सप्तर्षि कश्यप, जमदग्नि, भरद्वाज, आणि विश्वामित्र ( ह्यांचा काळ अर्थात् शकपूर्व २२२८ ) सांगितले आहेत. शिवाय वेनपुत्र पृथु ( ह्यांचा काळ तो चाक्षुष मनुचा चवथा वंशज असल्यामुळें सुमारें शकपूर्व

२४२० ), आर्ष्टिषेण ह्मणजे भारतकुलोत्पन्न शंतनुचा भाऊ देवापि ( ऋग्वेद १०।९८ ) येथेंही हा मंत्रकर्ता सांगितला आहे, आणि ह्याचा काळ सुमारें शकपूर्व १४०० ठरतो ) ऐलपुत्र पुरूरवा ( ह्याचा काळ शकपूर्व २१८० ) वैवस्वत मनु ( ह्याचा काळ शकपूर्व २२२८ ) हे प्रसिद्ध पुरुष सांगितले आहेत. ह्या शिवाय अगस्ति ऋषिही मंत्रकर्ता ह्मणून सांगितला आहे. हा दाशरथि-रामचंद्राच्या कालाचाच अगस्ति असल्यास त्याचा काळ सुमारें शकपूर्व १६८० ठरतो ) तसेंच वसिष्ट, शक्ति, आणि पाराशर हे मंत्रकर्ते एकाच ठिकाणीं सांगितले आहेत. हे तर अनुक्रमें वेदांची संहिता करणाऱ्या व्यासाचे अनुक्रमें पणजोबा, आजोबा, आणि वडील असण्याचा फार संभव आहे ( ह्यांचा काळ शकपूर्व १४०० ठरतो ) व्यासानें संहिता केल्या ह्याचा अर्थ असा दिसतो की, व्यासानें वेदांमध्यें नवीन भर घालणें बंद करून त्यांचा विस्तार ठरवून टाकला ह्मणूनच व्यास किंवा त्यापुढील कोणीही व्यक्ति मंत्रकर्त्यांच्या यादींत दिसत नाहीं. एकूण वेदमंत्र शकपूर्व ३१८० पासून शकपूर्व १४०० पर्यंत रचिल्या जात होते असें अनुमान होतें.



# भ्रातृव्य व सपत्न



( लेखकः- वे. शा. सं. **कृष्णशास्त्री घुले**, नागपूर. )

वैदिक वाङ्मयांत आणि लौकिक संस्कृतांतही सपत्न आणि भ्रातृव्य हे शब्द पर्याय असून ते शत्रूचे वाचक आहेत ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. पण भ्रातृव्य या शब्दाचा 'भ्रातुःपुत्र' ह्मणजे भावाचा मुलगा असा अर्थ होत असतां त्याचा शत्रु असा अर्थ कां व कसा झाला, या प्रश्नाचें उत्तर कोठेंच पहावयास मिळत नाहीं. ऋग्वेदांत तर भ्रातृव्य हा शब्दच नाहीं. इतर वेदांत व ब्राह्मणांत तो आढळतो, पण तेथें तो शत्रु या रूढ अर्थानेंच आढळतो; त्याच्या व्युत्पत्त्यर्थानें किंवा अवयवार्थानें आढळत नाहीं. आतां एवढें खरें कीं, भ्रातृव्य हा शब्द ह्या वेदांमध्यें व ब्राह्मणांमध्येंही जेथें आढळतो तेथें तो प्रायः 'अप्रिय, द्विषन्, पाप्मा,' इत्यादि विशेषणांनी युक्त ह्मणजे अप्रियं भ्रातव्यम्, द्विषन्तं भ्रातृव्यम्, पाप्मा भ्रातृव्यः अशा रूपांतच आढळतो. त्यावरून असा एक संशय येतो कीं, त्या कालीं भ्रातृव्य ह्मणजे पुतण्या हा कधी कधीं प्रिय, अद्विषन् ह्मणजे द्वेष न करणारा व हितकारक असाही असावा; आणि पाणिनीनें "भ्रातुर्व्यश्च" (पा. ४।१।१४४) आणि "व्यन्सपत्ने" (४।१।१४५) हीं दोन सूत्रें निर्माण करून, आणि 'व्यत्' आणि 'व्यन्' ह्या दोन निरनिराळ्या प्रत्ययाचें विधान करून, भ्रातृव्य हा शब्द भावाचा मुलगा आणि शत्रु ह्या दोन निरनिराळ्या अर्थी रूढ असल्याचें स्पष्ट दाखविलें असल्यामुळे त्या संशयाला बळकटीही येते. पण भावाचा हितकर मुलगा, हितकर पुत्र या अर्थी भ्रातृव्य असा शब्द वैदिक वाङ्मयांत एकदांही आलेला नाहीं हेंही तितकेंच खरें आहे. इतकेंच नव्हे तर पाणिनीनें भ्रातृ शब्दाहून अपत्यार्थींच 'व्यन्' प्रत्ययाचें विधान करूनही त्याचा समुदायार्थ शत्रु असाच असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. त्यामुळें वैयाकरणांची मोठीच त्रेधा उडाली आहे. महाभाष्यकार पतञ्जलींनीं ह्याच्या अर्थासंबंधानें एकदोन प्रश्नोत्तरें करून असा निर्णय दिला आहे कीं, "अस्तु तावदपत्यं सपत्नश्च" ह्मणजे प्रत्येक शत्रु हा

भावाचाच पुत्र असतो असें जरी नाहीं तरी भावाचा पुत्रदेखील शत्रु असूं शकतो. ह्मणून भ्रातृव्य हा शब्द तशा शत्रूचा वाचक समजावा, ह्मणजे कांणतीच अडचण रहात नाहीं. हाच अर्थ तत्वबोधिनीकारांनीं अधिक स्पष्ट शब्दांत सांगितला आहे. तो असा " भ्रातुरपत्यं यदि शत्रुः तदा भ्रातृव्य-शब्दात् व्यन् एव स्यात्। न व्यच्छौ ( व्यत् छःच ) इत्यर्थः। परंतु भ्रातृव्य हा शब्द सर्वत्र शत्रुरूप अर्थामध्येंच नेहमीं आढळत असल्यामुळें भाष्य-कारांच्या निर्णयानें देखील सर्वांचें समाधान झाल्याचें दिसत नाहीं. कारण, भाष्यविरोध पतकरूनही वृत्तिकार ह्मणतात कीं, " अपत्यार्थोऽत्रनास्त्येव। " भट्टोजी दीक्षितही " नच समुदायार्थः सपत्नः। प्रकृतिप्रत्ययार्थयोस्त्यागप्र-संगात्। " असें कैय्यटानें बजावलें असूनही " भ्रातुव्यन् स्यादपत्ये प्रकृति-प्रत्यय**समुदायेन्** शत्रौ वाच्ये " असेंच सांगतात. दीक्षितांचा हा अर्थ भाष्यकारांच्या अभिप्रायाला धरूनच आहे असें जरी तत्वबोधिनीकारांनीं दर्शविलें आहे तरी तो तसा स्पष्ट नाहीं हें खास. बालमनोरमाकारांनीं तर " प्रत्ययेनापत्यमुच्यते। **भ्रातृशब्दार्थस्तु न विवक्षितः**। " असें स्पष्टच ह्मटलें आहे. नागोजीभट्टानेंही " अपत्य इति। कल्पितनार्थेनान्वाख्या-नमात्रम्। " असें कांहीं तरी लिहून भाष्यकारांच्या अर्थाविषयीं आपली अरु-चिच व्यक्त केली आहे. त्याचें कारणही उघड आहे. तें असें कीं, भाष्यका-रांच्या ह्मणण्याप्रमाणें भावाचा पुत्र ह्मणजे पुतण्या हा कधीं कधीं शत्रुही असूं शकतो हें जरी खरें असलें तरी भ्रातृव्य किंवा पुतण्या ह्याचा शत्रु हा एकच अर्थ वैदिक वाङ्मयांत तरी कां रूढ व्हावा? हें कोडें तसेंच शिल्लक राहतें. सारांश, भ्रातृव्य शब्दाच्या व्युत्पत्त्यर्थाचें हें कोडें वैयाकरणांना सोडवितां आलें नाहीं.

हीच गति सपत्न शब्दाची. सपत्न हा शब्द कसा सिद्ध झाला, त्यांत प्रकृति कोणती, प्रत्यय कोणता, त्याचा व्युत्पत्त्यर्थ काय, वगैरे सांगण्याच्या भानगडींत पाणिनि देखील पडला नाहीं. " व्यन्सपत्ने " ( पा. ४-१-१४५) ह्या सूत्रांत सपत्न या सिद्ध शब्दाचें निपातन करूनच तो मोकळा झाला आहे.

कात्यायनालाही एखादें: वार्तिक करण्याची आवश्यकता वाटली नाहीं. नागोजी भट्टांनीं मात्र "सपत्नशद्वे सह युद्धाय पततीति पतेनैप्रत्ययः सहस्य सादेश इत्याहुः" अशी एक व्युत्पत्ति असल्याचें सांगितलें आहे. पण ही व्युत्पत्ति ह्मणजे प्रत्येक शब्दाला कांहीं तरी व्युत्पत्ति असलीच पाहिजे ह्याकरितांच केवळ निर्माण केलेली आहे हें उघड दिसतें. कारण, त्यांत 'सह' शब्दाच्या अर्थाला स्वारस्यच नाहीं. सायणाचार्यांनीं अथर्ववेदभाष्यांत 'सपत्न' या शब्दाला व्युत्पत्तिच नाहीं असें स्पष्ट सांगूनही त्याची एक व्युत्पत्ति सुचवूनही ठेविली आहे. ते ह्मणतात "सपत्नशब्दःशत्रुपर्यायः। **अव्युत्पन्नं प्रतिपादिकम्**। यद्वा। सपत्नीव सपत्नः व्यन्सपत्ने इति निपातनात् सपत्नीशद्वादिवार्थे अकारप्रत्ययः।" (अथर्व भा. १-९-२). यावरून स्पष्ट दिसतें कीं, वैयाकरणांना सपत्नशब्दाच्याही व्युत्पत्यर्थाचा पत्ता लागला नाहीं. मिळून निरुक्तकारांना किंवा वैयाकरणांना भ्रातृव्य आणि सपत्न या शब्दांचें खरें प्रवृत्तिनिमित्त माहीत नव्हतें हें निर्विवाद आहे. आधुनिक पौरस्त्य पंडितांनीं किंवा पाश्चात्य पंडितांनीं देखील त्याचा शोध लावल्याचें माझ्या कोठें पाहण्यांत नाहीं. ह्मणून त्याचा शोध लावण्याचा प्रस्तुत लेखांत मी प्रयत्न करणार आहे. आतां जेथें मोठमोठे पंडित थकले तेथें माझ्यासारख्या अल्पज्ञानें प्रयत्न करूं पाहणें हें साहसच होय यांत शंका नाहीं. पण तें देखील प्रयत्न या दृष्टीनें क्षम्यच ठरेल असा भरंवसा आहे, ह्मणून मी त्या कामीं प्रवृत्त झालों आहे.

भ्रातृव्य हा शब्द ऋग्वेदांत आढळत नाहीं हें वर सांगण्यांत आलेंच आहे. तसेंच इतर वेदांत जेथें तो शब्द आढळतो तेथें तो भ्रातृव्यः असा व्यन्प्रत्ययान्त आद्युदात्तच ह्मणजे शत्रु या एकाच अर्थांत आढळतो; मित्र या अर्थीं 'भ्रातृव्य' असा व्यत्प्रत्ययान्त अन्त्यस्वरित आढळत नाहीं हेंही वर दाखविण्यात आलें आहे. पण पाणिनीनें ज्या अर्थीं मुद्दाम दोन निरनिराळीं दोन सूत्रें निर्माण करून दोन निरनिराळ्या प्रत्ययांनीं दोन परस्पर विरुद्धार्थाच्या दोन भ्रातृव्यशब्दांची सिद्धी करून दाखविली आहे, त्या अर्थीं त्याच्या काळापूर्वीपासून तसे दोन शब्द भाषेत रूढ होते हें निर्विवाद आहे.

भ्रातृव्य हा शब्द जरी ऋग्वेदांत आलेला नाहीं तरी ' भ्रातुः पुत्राः ' असे शब्द पुढील मंत्रांत आले आहेत.

**दूरे तन्नाम गुह्यं पराचैर्यत्त्वा भीते अह्वयेतां वयोधै ।**
**उदस्तभ्नाः पृथिवीं द्यामभीके भ्रातुःपुत्रान्मघवन्तित्विषाणः ॥**
**ऋ० १०।५५।१**

अर्थ—भयभीत झालेल्या ( द्यावापृथिवी ) सामर्थ्य देण्यासाठीं तुला ज्या नांवानें हांक मारल्या झाल्या तें तुझें गुह्य नांव दूर आहे. हे इन्द्रा ! तूं भावाच्या पुत्रांना प्रदीप्त करून द्यावापृथिवीला जवळ जवळ स्थिर करता झालास.

या मंत्राचा पहिला चरण कांहींसा गूढार्थकच आहे. तरी मंत्राचा एकंदर भावार्थ स्पष्ट आहे. तो असा कीं, द्यावापृथिवी ह्या भयभीत झाल्या होत्या. त्यांनीं इन्द्राचा धांवा केला. तेव्हां इन्द्रानें भावाच्या पुत्रांना प्रदीप्त करून त्यांना एकत्र स्थिर केलें. असा हा भावार्थ जरी स्पष्ट आहे तरी द्यावापृथिवी कशामुळें भयभीत झाल्या होत्या, इन्द्राचा भाऊ कोण, त्याचे पुत्र कोण, आणि त्यांना प्रदीप्त केल्यामुळें द्यावापृथिवींचें भय कसें निवारण झालें, हें त्यांत सांगितलें नसल्यामुळें तेवढ्यापुरता तरी तो संदिग्धार्थकच आहे. त्यामुळेंच त्याच्या अर्थासंबंधानें विद्वान् लोकांमध्यें मतभेद दृष्टीस पडतो. त्यांत द्यावापृथिवीच्या भयाचें कारण वृत्राचें आक्रमण होय असें ग्रिफिथ ह्मणतो तें कांहीं अंशीं खरें आहे. पण इन्द्राचा भाऊ आणि त्याचे पुत्र कोण होत हें त्याला सांगतां आलें नाहीं. डॉ० म्यूरलाही हें कोडें उलगडलें नाहीं.* प्रो० म्याक्डानल्ड तर स्पष्टच ह्मणतो कीं, त्याचा अर्थ काय आहे तें सांगतां येत नाहीं.✤ सायणाचार्यांनीं दोन अर्थ सुचविले आहेत. ते ह्मणतात कीं, येथें इन्द्र ह्मणजे विद्युत् किंवा पर्जन्य होय असें समजलें पाहिजे. पहिल्या ह्मणजे विद्युत् या अर्थात भ्राता ह्मणजे पर्जन्य, आणि त्याचे पुत्र ह्मणजे उदकसमूह ( " उदकसंस्त्याय " ) होत असें, आणि दुसऱ्या ह्मणजे इन्द्र हा पर्जन्य होय या अर्थात भ्राता ह्मणजे

* Muirs Original Sanskrit texts. Vol V. Page 81

✤ 'The sons of Indra's brothers are once mentioned, but who are meant by them is uncertain.' Vedic mythology. page 57.

वायु होय असें समजावें. " हे मघवन् इन्द्र भ्रातुः पर्जन्यस्य पुत्रान् पुत्रस्थानीयान् उदकसंस्त्यायान् तित्विषाणः दीपयन् इति विद्युद्रूपमिन्द्रमाह। विद्युद्रूपेन्द्र इति वाजसनेयकम्। यद्वा पर्जन्यरूपमाह। तदानीं वायुरस्येन्द्रस्य भ्रातावगन्तव्यः।. " पण हे दोन्ही अर्थ असमाधानकारक आहेत. कारण " वयोधै " या पदांतील ' वयः ' या शब्दाचा अन्न हा अर्थ त्यांनीं स्वीकारल्यामुळें त्यांना इन्द्र या शब्दाचा अर्थ विद्युत्, त्याचा भाऊ पर्जन्य, आणि त्याचे पुत्र उदकसमूह होत अशी कल्पना करावी लागली आहे. पण भ्यालेल्या द्यावापृथिवी जगताला अन्न देण्यासाठीं इन्द्राला हाक मारत्या झाल्या (" द्यावापृथिव्यौ भीते सत्यौ अह्वयेताम्। किमर्थम्। वयोधै अन्नस्य निधानार्थं जगतोऽन्नसाधनायेत्यर्थः ") हाच अर्थ आधीं बरोबर वाटत नाहीं. जगतांत अन्नाचा तुटवडा पडला ह्मणून द्यावापृथिवी भ्याल्या ही कल्पनाच मुळीं अवैदिक वाटते. वेदांत अशी कल्पनाच नाहीं. त्यांच्या भीतीचें खरें कारण इन्द्राच्या भावाच्या पुत्रांचें आक्रमणच होय. ह्मणूनच त्यांना प्रदीप्त करून इन्द्राला त्यांचें ( द्यावापृथिवींचें ) भय निवारतां आलें. दुसरें पर्जन्य हा भ्राता आणि उदकसमूह हे त्याचे पुत्र ही कल्पनाही क्लिष्टच आहे. कारण, उदकें किंवा आपः ही पर्जन्याची संतति होय असें कदाचित् ह्मणतां आलें असतें. पण उदकें ही नपुंसकलिंगी आणि आपः स्त्रीलिंगी असल्यामुळें त्यांना पुत्र ह्मणतां येत नाहीं. ही आपत्ति टाळण्याकरितां सायणाचार्यांनीं " उदकें " व " आपः " ह्या शब्दांच्या ऐवजीं ' उदकसंस्त्याय ' असा पुल्लिंगी शब्द उपयोगांत आणला आहे. पण इतकें केलें तरी उदकसमूहांला प्रदीप्त करून (" तित्विषाणः ") द्यावापृथिवींचें भय घालविलें या विधानाला स्वारस्यच रहात नाहीं. ह्मणून त्यांनीं " यद्वा " ह्मणून दुसरा वायु हा अर्थ सुचविला आहे. पण वायूचे पुत्र कोण व त्यांना प्रदीप्त केलें ह्मणजे काय केलें हें सांगण्याचें त्यांनीं सोडून दिलें आहे. ह्या कारणांस्तव सायणाचार्यांचा अर्थ अग्राह्यच ठरतो. माझ्या मतें प्रस्तुत मंत्रांतील इन्द्र हा वृत्रघ्न इन्द्रच असून त्याचा भ्राता ह्मणजे वरुण होय. " स **भ्रातरं वरुणमग्ने** आववृत्स्व देवानच्छ " ( ऋ० ४।१।२ ) या मंत्रांत वरुणाला अग्नीचा भ्राता ह्मटलें आहे हें, आणि " बळित्था महिमा वामिन्द्राग्नी

पनिष्ठ आ । समानो वां जनिता भ्रातरा युवं यमाविहेहमातरा ॥ "
( ऋ० ६।५९।२ ) या मंत्रांत इन्द्र आणि अग्नि ह्यांना जुळे भाऊ ( "यमौ " ) ह्मटलें आहे. हें पाहिलें ह्मणजे प्रस्तुत मंत्रांतील इन्द्राचा भ्राता हा वरुणच होय याविषयीं संशयच रहात नाहीं. ह्मणूनच या ह्मणजे " स भ्रातरं वरुणमग्ने " इत्यादि मंत्रांत वरुणाला आणि वालखिल्यसूक्त ४ मंत्र ७ यांत इन्द्राला 'आदित्य' ह्मटलें आहे. सारांश " भ्रातुःपुत्रान्मघवन् तित्विषाणः " यांतील " भ्रातुःपुत्र " या पदांनीं 'वरुणाचे पुत्र' हाच अर्थ विवक्षित आहे हें निर्विवाद सिद्ध होतें. पण हे वरुणांचे पुत्र कोण होत हा महत्वाचा प्रश्न तसाच शिल्लक राहतो. ह्मणून त्याचा आतां विचार करूं.

भ्रातृशब्दानें येथें वरुणच विवक्षित आहे हें प्रो. लुविग ह्यांनाही मान्य आहे. पण त्याचे पुत्र ह्मणजे नक्षत्रें होत असें ते ह्मणतात. * तें बरोबर नाहीं. कारण, एक तर तें अगदींच निराधार आहे; आणि दुसरें त्यानें मंत्राच्या अर्थावर कांहींच प्रकाश पडत नाहीं. ह्मणून त्याचा दुसरीकडेच शोध केला पाहिजे. आपण आतां पाहिलेंच आहे कीं, अग्नि, इन्द्र आणि वरुण हे भाऊ भाऊ आहेत; ते आदित्य आहेत. मित्र, पूषा, अर्यमा, हे देखील आदित्यच आहेत. ते सर्व सूर्याचींच मूर्त्यन्तरें किंवा रूपान्तरें असल्यामुळें स्वाभाविकच प्रकाशात्मक असावयाचे, आणि त्याप्रमाणें ते आहेतही. वरुण-देखील आदित्यच असल्यामुळें वस्तुतः तोही प्रकाशात्मकच असावयास पाहिजे. पण काय कारण असेल तें असो, वरुणाचें प्रकाशात्मकत्व लोपून त्याला केव्हां तरी अन्धकारात्मकत्व प्राप्त झालें आहे हें खास. त्याचें हें स्वरूप 'मित्रावरुणौ' या द्वद्वांत अधिक उत्कटतेनें दिसून येतें. लो. टिळक ह्मणतात—
" We can now well understand why Mitra and Varuṇa were originally conceived as two corelative deities; for accordling to our theory they would represent half--year--long light and darkness in the Paradise of the Aryan race. and Varuṇa can then be very well described as " embracing the nights, " Kshapah pari shaṣuaje VIII, 41, 3 )." +

---

* " Varuna and his stars are probably intended-Ludwing "--Griffeth.
+ Arctic Home in the Vedas, page 351.

आदित्य वरुणानें रात्रीला आलिंगन कधीं दिलें ( " क्षपः परिष्वजे " ) हें जरी सांगतां येत नाहीं तरी त्यानें तें दिलें हें निर्विवाद आहे. इतकेंच नाहीं तर तें आलिंगन इतकें दृढ होतें कीं तें त्याला कायमचें चिकटून बसलें; इतकें कीं त्यामुळें वरुण स्वतःच रात्रिरूप झाला ! मित्र आणि वरुण हें अहोरात्र होत ( " अहोरात्रौ वै मित्रावरुणौ " ) असें ताण्ड्यब्राह्मणांत ( ता. ब्रा० २५,१०,१० ) आणि मित्र हा दिवस असून वरुण हा रात्र होय ( " अहर्वै मित्रो रात्रिर्वरुणः " ) असें ऐतरेय ब्राह्मणांत ( ऐ. ब्रा. ४।१० ) ह्मटलें आहे. याचा अर्थ असा कीं दिवसाची देवता मित्र आणि रात्रीची देवता वरुण होय, ( " मैत्रं वै अहः वारुणी रात्रिः ") तै. ब्रा. १, ७, १०, १ ). असा विभाग झाल्यानंतर त्यांच्या स्थानाचाही विभाग होणें अपरिहार्यच होतें; आणि त्या प्रमाणें तो विभाग झालाही आहे. " अयं वै लोको मित्रोऽसौ वरुणः " ह्मणजे हा लोक मित्र होय आणि तो ( लोक ) वरुण होय, असें शतपथ ब्राह्मणांत ( १२-९-२-१२ ) सांगितलें आहे. यांतील तो लोक ( ' असौ लोकः ' ) कोणता हें पाहिलें पाहिजे. तो लोक ह्मणजे वरुण लोक, किंवा रात्रिलोक, ह्मणजे ज्या प्रदेशांत वरुण किंवा रात्रि ह्मणजे अंधकार राज्य करतो तो प्रदेश असा अर्थ निष्पन्न होतो. अर्थात् वरुण ह्मणजे रात्रीचा व अंधकारमय प्रदेशाचा स्वामी होय असें सिद्ध होतें. आतां हा वरुणाचा प्रदेश ह्मणजे जेथें वृत्रासुर राज्य करतो, जेथें अथाक अन्धकार ( " अनारम्भणं तमः ) वास करतो, जेथें दीर्घरात्रीच्यावेळी सूर्यादि प्रकाशात्मक देवतांना वृत्रादि असुर अडकवून ठेवतात, आणि उदकें कोंडून ठेवतात, जेथें यम आणि पितम वास करितात, असा जो पृथ्वीच्याखालीं असलेला गोलार्ध तो होय, असें लो० टिळकांनीं आपल्या ' आर्यांचा निवास ' या पुस्तकांत सिद्ध केलें आहे.* अशा या वृत्रादि असुरांच्या प्रदेशांत वास केल्यामुळें आणि असुरांशीं नित्य संबद्ध झाल्यामुळें कालान्तरानें वरुणालाही तद्रूपत्व आलें. ऋ० १०, १२४,६ या मंत्रांतील " हनाव वृत्रंतिरेहि सोम " याचें " Let us two slaughter Vritra forth, o Soma ! " असें भाषान्तर करून वृत्रशब्दावरील टीपेंत प्रो०

* The Arctic Home in the Vedas, cf. 334 351.

ग्रिफिथ ह्मणतो " Vritra: regarded as in league wtih Varuna, the fiendish enemy in the shape of Varuna. " ग्रिफिथचें हें ह्मणणें कितपत बरोबर आहे हें नक्की सांगतां येत नाहीं. तरी एवढें खरें कीं, एका काळीं वरुणाला तें रूप आलें होतें. सायणाचार्यांनीं देखील ऋ० ४, १, २ या मंत्रावरील भाष्यांत " वृणोत्युदकमिति वरुणः " असा वरुण शब्दाचा अर्थ केला असून वृत्र याचा देखील तसाच ह्मणजे ' वृणोति 'वरूनच ' आवरक ' असा अर्थ केला आहे. वरुण जसा उदकांचा आवरक होता, तसाच वृत्रदेखील उदकांचाच आवरक होता हें " अहिं यद् **वृत्रमपःवव्रिवांसं** हन् " (ऋ० ६, २०, २.) या मंत्रांतही स्पष्ट सांगितलें आहे. शिवाय, वरुण हा असुर, तर वृत्रही असुरच. आतां वरुणपक्षांत असुर शब्द चांगल्या अर्थी ह्मणजे देवता या अर्थी असून वृत्रपक्षांत वाईट अर्थी ह्मणजे देवांचा शत्रु या अर्थी आहे हें खरें. पण शब्दसाम्यामुळें तोही पुढें वाईट अर्थीच रूढ झाला. असो.

असा हा वरुणच इन्द्राचा भ्राता होय हें ठरल्यानंतर त्याचे पुत्र हे कोण असतील हें समजणें फारसें कठिण नाहीं. कारण, रात्र जर वारुणी होय, तर तिचे पुत्रदेखील वारुणच ह्मटलें पाहिजे. आणि हे वारुण अथवा रात्रीचे पुत्र अंधकाराशिवाय दुसरे कोण असणार ? अर्थात् हे अंधकारात्मक वारुण ह्मणजेच वरुणाचे पुत्र होत असें सहज ह्मणतां येतें. तसेंच वरुण हा असुर असल्यामुळें त्याचे पुत्रही आसुर ह्मणजे असुरच होत. ऋ० २, ३०, ४ यांतील असुराचे वीर ह्मणजे पुत्र (' असुरस्य वीराः ') देखील तेच होत. वर्ची, पिप्रु, स्वर्भानु वगैरे ह्यांचींच नांवें होत. पारशांच्या अवेस्ताग्रंथांत (फर्गर्ड १०।१४) ह्यानांच ह्मणजे वरुणाच्या ह्या पुत्रांनाच " वरेन्य देव." (" Varenya Daêvas ") असें ह्मटलें आहे. कारण, अवेस्तामधील जो " वरेन ", तोच वेदांतील वरुण होय. हे सर्व ' वरेन्य देव ',* किंवा वरुणाचे पुत्र जे असुर ते प्रकाशात्मक देवांचे अंधकारात्मक शत्रु होत. प्रो०

* " A class of demons perticularly interesting are the Varenya daêvas. "-Darmesteter, S. B. E. Vol IV, p. LXVII

म्याक्डोनल्ड ह्मणतो " In the Brahmans the Asuras are associated with darkness. " ब्राह्मणांतच केवळ नव्हे, तर ऋग्वेदांतदेखील असुर शब्द अन्धकाररूपी दैत्यांचा ( Demons of darkness ) वाचक आहे ही गोष्ट पुष्कळशा पाश्चात्य पंडितांना देखील मान्य आहे.* प्रकाशात्मक देव हे अदितीचे पुत्र ह्मणून आदित्य आणि असुर हे दितीचे पुत्र ह्मणून दैत्य होत. अदिति ही क्षितिजाच्यावर दिसणारें उत्तर गोलार्ध असून दिति ही अधोगोलार्ध होय हें मीं अन्यत्र ऽ दाखविलें आहे. यावरून दिसून येईल कीं, आदित्यांचे शत्रु हेच वरुणाचे पुत्र होत; आणि वरुण हा आदित्यांचा भ्राता असल्यामुळें त्याचे पुत्र अर्थात भ्रातृव्य हेच त्यांचे (आदित्यांचे) कायमचे शत्रु होत हें सिद्ध होतें. अशा प्रकारें भ्रातृव्य हेच आदित्यांचे—देवांचे शत्रु असल्यामुळें भ्रातृव्य हा शब्दच शत्रु या अर्थी रूढ झाला.

भ्रातृव्य ह्मणजे इन्द्राचा किंबहुना इन्द्रोपलक्षित सर्व आदित्यांचा भाऊ जो वरुण त्याचे पुत्र जे असुर, दस्यु, किंवा दास ते होत हें समजलें ह्मणजे सपत्न कोण होत हें समजणें कठिण नाहीं. कारण, जे भ्रातृव्य तेच सपत्न होत हें वर सांगण्यांत आलेंच आहे. शिवाय, " सपत्ना वै द्विषन्तो भ्रातृव्याः " असें ऐतरेय ब्राम्हणांत (८।२६) स्पष्टच सांगितलें आहे. तसेंच ते अन्धकारात्मकच होत हेंही वर आलेंच आहे. तेव्हां हे सपत्नदेखील अन्धकारात्मकच असले पाहिजेत हें उघड आहे. पण ह्यांना सपत्न असें कां म्हटलें आहे? या प्रश्नाचें आतां उत्तर द्यावयाचें आहे. तें उत्तर असें आहे कीं, भावाचे पुत्र म्हणून जसे ते भ्रातृव्य तसे सपत्नीचे पुत्र म्हणून ते सपत्न होत असें समजलें म्हणजे ऋ० १०,१६६,१ या मंत्रावरील भाष्यांत सायणाचार्यांनीं " येऽस्मत्कुलजाता अस्माकमेवानिष्टमाचरन्ति ते सपत्नाः " असा जो अर्थ केला

* " Demons of draught or darkness. " Griffith's. Hymns of the Rigveda Vol. I. p. 680.

ऽ विविधज्ञानविस्तार वर्ष ६३, पान २३१.

आहे त्यालाही स्वारस्य येतें. आतां पाणिनीच्या व्याकरणाप्रमाणें सपत्नीचा पुत्र या अर्थी सपत्न असा प्रयोग होऊं शकत नाहीं हें खरें. पण सपत्न हा फार प्राचीन वैदिक आर्ष प्रयोग असल्यानें पाणिनीच्या नियमांनीं तो बांधला जात नाही. हें ओळखूनच पाणिनीनेंही त्याचें प्रकृतिप्रत्यय सांगण्याचा प्रयत्न केला नाहीं असें दिसतें. आतां, ही सपत्नी कोण व कोणाची ? असा दुसरा प्रश्न उपस्थित होतो. त्याला माझें उत्तर असें आहे कीं, ही उषेची सपत्नी रात्रि होय. ऋग्वेदांत उषा ही " स्वसरस्य पत्नी " ( ऋ. ३,६१,४ ) ह्मणजे सूर्याची पत्नी आणि " सूर्यस्य योषा " ( ऋ. ७,७५,५ ) ह्मणजे सूर्याची भार्या होय असें सांगितलें असून पुन्हां ऋ. १०,१७०,२ या मंत्रांत उषा आणि रात्रि ह्या त्याच्या दोन ' पत्नी ' प्रमाणें असल्याचें ( " पत्नीव... उपासानक्ता " ) दर्शविलें आहे. तेव्हां त्या परस्पर सपत्नी होत हें निर्विवाद आहे. असें असतां " वृष्णे सपत्नी शुचये सबन्धू " ( ऋ. ३,१,१०; ) आणि " आस्के सपत्नी अजरे अमृक्ते " (ऋ. ३,६, ४) यांतील ' सपत्नी ' शब्दाचा सायणाचार्यांनीं " समानः एकः सूर्यः पतिः ययोः ते " असा अवयवार्थ सांगूनही आणि ऋ० ६, ५५, ५ या मंत्रावरील भाष्यांत रात्रि ही पूषाची ह्मणजे पूषानामक सूर्याची पत्नी होय, ( " रात्रेः...पतिं पूषणम् " ] असें स्वतः सांगितलें असूनही त्याचा समुदायार्थ " द्यावा-पृथिव्यौ " असा कां करावा हें कळत नाहीं. वस्तुतः तेथेंही त्या शब्दाचा उषा आणि रात्रि असाच अर्थ करणें योग्य आहे. नाहींतर ऋ० १०, १४५ या सपत्नीनाशन सूक्ताची नीट संगति लागणार नाहीं. कारण, सपत्नी या शब्दानें द्यावापृथिवी अभिप्रेत आहेत असें मानल्यास सपत्नीनाशन सूक्तें द्यावापृथिवि ह्यांपैकीं कोणातरी एकीचा नाश करण्यासाठीं प्रवृत्त झालीं आहेत असें मानावें लागेल. पण तें तर सर्व वैदिक वाङ्मयाच्या अभिप्रायाविरुद्ध आहे. असें पाहूनच बहुधा ग्रिफिथनें सपत्नीशब्दाचा प्रथम " Fellow spouses: Heaven and Earth " असा सायणाचार्योक्त अर्थ देऊनही पुन्हां " or " असें ह्मणून " Night and morning " असा दुसरा अर्थ दिला आहे. तोच

बरोबर आहे. तसा अर्थ घेतला तरच ऋ० १०, १५९ यांतील शचीच्या ह्मणजे सूर्यपत्नी उषेच्या प्रार्थनात्मक सूक्ताचें स्वारस्य कळूं शकतें; एरवी कळत नाहीं. सारांश, जिचा नाश करावयाचा ती उषेची सपत्नी ह्मणजे रात्रिच असून तिचे पुत्र ह्मणजे अन्धकाररूपी असुर हेच सपत्न होत असें सिद्ध होतें. ह्मणूनच सूर्याच्या प्रकाशानें त्यांचा नाश होतो, असें वेदानें पुढील मंत्रांत सांगितलें आहे.

**" अमित्रहा वृत्रहा दस्युहंतमं ज्योतिर्जज्ञे असुरहा सपत्नहा ॥**

ऋ० १०, १७०, २.

# रामगुप्ताच्या चरित्रावर नवीन प्रकाश.



( लेखकः—प्रो. वा. वि. मिराशी एम्. ए. एल्. एल्. बी. नागपुर. )

मगधाच्या गुप्त घराण्याविषयीं सर्व हिंदुलोकांस अत्यंत आदर व अभिमान वाटतो. खिस्ती शकाच्या पहिल्या तीन शतकांत उत्तर हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा सर्वत्र प्रसार होऊन हिंदुधर्म नामशेष होऊं लागला होता. अशा विकट परिस्थितींत ज्यांनी आपल्या बाहुबलानें परकी राजांस जिंकून उत्तर हिंदुस्थानांत हिंदूंचें एकछत्री साम्राज्य स्थापिलें, हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन केलें आणि राष्ट्रांतील शूर, विद्वान व कर्तबगार लोकांच्या गुणांस क्षेत्र मिळवून दिलें त्या गुप्तवंशीय राजांविषयीं सर्व हिंदी इतिहासज्ञांस औत्सुक्य वाटावें व त्यांच्या चरित्राविषयीं जितकी जास्त माहिती मिळेल तितकी मिळविण्याकरितां त्यांनी अविरत प्रयत्न चालू ठेवावा यांत नवल नाहीं, आणि क्वचित् एकादा नवीन शिलालेख, ताम्रपट किंवा नाणें सांपडून, अथवा संस्कृत, प्राकृत, चिनी इत्यादि भाषांतील तत्कालीन परिस्थितिविषयक उल्लेख दृष्टीस पडून त्यांच्या प्रयत्नांस यश येतेंही. या प्रथितयश गुप्तवंशांतील एका राजाच्या चरित्रावर थोडा नवीन प्रकाश पाडण्याचा या लेखांत प्रयत्न केला आहे.

सुमारें ८।१० वर्षांपूर्वींपर्यंत गुप्तराजांची खालील वंशावळ सर्वमान्य झाली होती.




*

चन्द्रगुप्त ( दुसरा ) इ. स. ३७५–४१३

( मुलगा )

कुमारगुप्त इ. स. ४१३–४५५

सन १९२४ मध्यें प. वा. प्रो. राखालदास बॅनर्जी यांनीं काशी विश्वविद्यालयांत व्याख्यानें दिलीं त्यांत त्यांनीं समुद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा रामगुप्त गादीवर बसला असें प्रतिपादिलें. पण तीं व्याख्यानें अद्यापि अप्रकाशित आहेत. त्यानंतर सन १९२८–१९२९ मध्यें डॉ. अ. स. आळतेकर यांनीं जर्नल ऑफ् बिहार अँड ओरिसा या त्रैमासिकांत दोन लेख लिहिले. त्यांत हर्षचरित ( इ. स. चें. ७ वें शतक ) व त्यावरील शंकराचार्य याची टीका, रामचंद्र व गुणचंद्र ( इ. स. चें १२ वें शतक ) यांचा नाट्यदर्पण नामक ग्रंथ, धारानृपति भोज ( इ. स. चें ११ वें शतक ) याचा शृंगारप्रकाश, राजशेखराची ( इ. स. १० वें शतक ) काव्यमीमांसा इत्यादि भिन्न भिन्न काळीं लिहिलेल्या व परस्परस्वतंत्र अशा संस्कृत ग्रंथांतील उतारे, संजान येथें सांपडलेला राष्ट्रकूट नृप अमोघवर्ष याचा ताम्रपट, व मज्मुल् तवारिख ( बारावें शतक ) या ग्रंथांतील दंतकथा इत्यादिकांत उपयोग करून रामगुप्ताविषयीं खालील माहिती जुळविली.

" समुद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा रामगुप्त हा गादीवर आला. तो अत्यंत निर्बळ व भ्याड राजा होता. काठेवाडांतील शकवंशीय क्षत्रपानें त्याच्या मुलखावर स्वारी करून राजधानीला वेढा दिला व त्याला इतकें पेचांत आणलें कीं प्रजेचा सर्वस्वीं नाश न व्हावा म्हणून त्याला आपली राणी ध्रुवदेवी हिला शकराजाकडे पाठविण्याची अट नामुष्कीनें कबूल करावी लागली. पण त्याच्या शूर व मानी भावास-चन्द्रगुप्तास-ती अट अपमानास्पद वाटून त्यानें स्वतः ध्रुवदेवीच्या वेषानें शक राजाकडे जाण्याचें ठरविलें व पुढें एकांतांत त्याचा खून करून त्याच्या सैन्याचा धुव्वा उडविला त्यानंतर लौकरच रामगुप्त व चन्द्रगुप्त या भावांत वैमनस्य उत्पन्न झालें. व बहुधा चन्द्रगुप्ताच्या हातून किंवा त्याच्या चिथावणीनें रामगुप्ताचा वध झाला. राणी

ध्रुवदेवी हिचें प्रथमपासून चन्द्रगुप्तावर प्रेम होतें व तिच्या पतीच्या-रामगुप्ताच्या—अत्यंत भ्याड वर्तनाबद्दल तिच्या मनांत त्याच्याबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला होता म्हणून त्याच्या वधानंतर तिनें चन्द्रगुप्ताशीं लग्न केलें. रामगुप्ताची कारकीर्द गुप्तवंशास लांछनास्पद असल्यानें तिचा गुप्तवंशीय राजांच्या शिलालेखांत कोठेंही उल्लेख आढळत नाहीं यांत आश्चर्य नाही. ध्रुवदेवीचा उल्लेखही चन्द्रगुप्ताची पट्टराणी या नात्यानेंच कोरीव लेखांत सर्वत्र आढळतो. तिनें आपल्या सख्ख्या दिराशीं केलेला विवाह सध्यां धर्म-शास्त्रसंमत नसला तरी प्राचीन कालीं तो निंद्य मानला जात नसे."

डॉ. आळतेकर यांनीं उपलब्ध पुराव्याची छाननी करून वरील अनु-मानें काढल्यावर इतिहाससंशोधकांमध्यें मोठी खळबळ उडून गेली. प्रथम बरेच लोक साशंक होते व त्यांनीं वरील इतिहासावर नानाप्रकारचे आक्षेप आणले. पण त्यांचेंही निराकरण होऊन सध्यां बहुतेक इतिहासज्ञांचा कल वरील गोष्ट खरी मानण्याकडेच दिसून येतो. कलकत्ता युनिव्हर्सिटींतील प्राचीन भारतीयेतिहासाचे अध्यापक डॉ. देवदत्तपंत भांडारकर[1] व पाटण्याचे प्रसिद्ध संशोधक बॅ. काशीप्रसाद जयस्वाल[2] यांनी नुकतेच या विषयावर लेख लिहून नवीन प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि वर प्रसंगांतील कांही बाबी अद्यापि अनिर्णित राहिल्या आहेत. रामगुप्ताचा पराभव करणारा शत्रु कोण व हा प्रसंग कोठें घडला याविषयीं अद्यापि विद्वानांत ऐकमत्य नाहीं. वरील प्रसंगावर 'देवीचन्द्रगुप्त' या नांवाचें विशाखदत्ताचें एक नाटक होतें. त्यांतील कांहीं उतारे भोजाच्या शृंगारप्रकाशांत आले आहेत. त्यांत वरील गोष्टीचा उल्लेख असावा. तथापि तें सबंध नाटक अद्यापि उपलब्ध झालें नसल्यामुळें वरील बाबी आपणांस इतर पुराव्यावरूनच ठर-विल्या पाहिजेत.

राजशेखराच्या काव्यमीमांसेंत 'कथोत्थ मुक्तकाचें' उदाहरण म्हणून खालील श्लोक आला आहे—

(1) Malaviya Commemoration Volume pg. 189ff.

(2) J. B. O. R. S. XVIII p. 17

दत्वा रुद्धगतिः खसाधिपतये देवीं ध्रुवस्वामिनीं
यस्मात्खण्डितसाहसो निवर्तते श्रीशर्मगुप्तो नृपः ।
तस्मिन्नेव हिमालये गुरुगुहाकोणक्कणत्किन्नरे
गीयन्ते तव कार्तिकेय नगरस्त्रीणां गणैः कीर्तयः ॥

या श्लोकांत ' खसाधिपतये ' याबद्दल शकाधिपतये व ' श्रीशर्मगुप्तो ' याबद्दल ' श्रीरामगुप्तो ' हा मूळचा पाठ असून लेखकांच्या चुकीनें त्याबद्दल सध्यांचे पाठ घातले गेले असावे हें उघड आहे. त्यामध्यें रामगुप्त व कार्तिकेय या दोन राजांची तुलना करून कार्तिकेयाचा उत्कर्ष दाखविला आहे. ' ज्या हिमालय पर्वतावर शत्रूनें मार्ग अडविल्यामुळें खण्डितसाहस झाल्याकारणानें रामगुप्तास आपली राणी ध्रुवस्वामिनी देऊन स्वतःची सुटका करून घ्यावी लागली, ज्याच्या विशाल दऱ्यांत बसून किन्नर गात असतात त्या हिमालय पर्वतावर नगरस्त्रियांचे समूह, कार्तिकेय राजा !, तुझें यश गात असतात ' असें त्या श्लोकांत ह्मटलें आहे. येथें ' कार्तिकेयनगरस्त्रीणां ' असा एक सामासिक शब्द मानावा व कार्तिकेयनगरीं रामगुप्ताचा पराभव झाला असावा असें डॉ. भांडारकरांचें ह्मणणें आहे. हें कार्तिकेय नगर संयुक्तप्रांताच्या अल्मोरा जिल्ह्यांत गोमती नदीच्या खोऱ्यांत वसलेल्या वैजनाथ नामक गांवा-जवळ होतें व त्याचा कार्तिकेयपुर या नांवानें एका ताम्रपटांत उल्लेखही आढळतो असें त्यांनीं दाखविलें आहे. व वरील श्लोक चन्द्रगुप्तास उद्देशून असावा असें त्यांनीं ह्मटलें आहे. पण तें सयुक्तिक दिसत नाही. राजशेखरानें वरील श्लोक मुक्तकाचें उदाहरण ह्मणून दिला आहे. संस्कृतवाङ्मयांत काव्याचे रचनेच्या दृष्टीनें मुक्तक व प्रबन्ध असे दोन प्रकार मानतात. एकाच श्लोकांत सर्व कल्पना पूर्ण झाली असल्यास मुक्तक व अनेक श्लोकांत तिचा विस्तार झाला असल्यास प्रबंध असा त्या दोन संज्ञांचा अर्थ आहे. तेव्हां वरील श्लोकाच्या अर्थास जरूर ते सर्व शब्द त्यांत असले पाहिजेत हें उघड आहे. संस्कृतकवींनीं स्वकालीन राजप्रशस्तिपर अनेक श्लोक रचलेले दिसतात. पण त्या सर्वांत त्या त्या राजांचीं नांवें गोंवलेलीं आढळतात. याचें कारणही उघडच आहे. एकाच श्लोकांत सर्व कल्पना पूर्ण करावयाची

असल्यानें त्या राजाचें नांव त्यांत न आल्यास तो श्लोक एका विशिष्ट राजाच्या विषयीं आहे असें लोकांस समजणें शक्य नाहीं. या विधानाच्या समर्थनार्थ संस्कृत सुभाषितांतून शेंकडों उदाहरणें देतां येतील.[1] तेव्हां वरील श्लोकांत 'कार्तिकेयनगरस्त्रीणां' असा एक शब्द न मानतां कार्तिकेय हें संबोधन मानणें भाग आहे.

आतां हा कार्तिकेय कोण याचा विचार करूं. हा चन्द्रगुप्ताचा मुलगा कुमारगुप्त असावा असें डॉ. आळतेकर म्हणतात. वरील श्लोकांत द्वितीय चन्द्रगुप्ताची स्तुति केली आहे असें डॉ. भांडारकरांचें मत वर उद्धृत केलें आहे. पण हीं दोन्ही मतें सयुक्तिक दिसत नाहीत. रामगुप्ताची कारकीर्द मानधन गुप्तवंशास इतकी लांछनास्पद होती कीं तद्वंशीय राजांच्या लेखांत तिचा उल्लेख त्यांनीं बुद्धिपुरस्सर टाळलेला दिसतो. तेव्हां गुप्तकालीन एखादा कवि आपल्या राजाची रामगुप्ताशीं तुलना करून त्याचें श्रेष्ठत्व स्थापित करण्याचें मनांत आणील असें वाटत नाहीं. तेव्हां हा कार्तिकेय दुसऱ्याच एखाद्या वंशांतील असावा. संजान येथील ताम्रपटांत राष्ट्रकूट अमोघवर्षाची रामगुप्ताशीं तुलना करून त्याचें श्रेष्ठत्व दाखविलें आहे, तसाच प्रकार या श्लोकांतही केलेला दिसतो. राजशेखराच्या काळापूर्वी कार्तिकेय हें नांव कोणी राजानें धारण केलेलें दिसत नाहीं. पण राजशेखराचा आश्रयदाता महीपाल याचें कार्तिकेय हें दुसरें नांव असावें असें दिसतें. हा महीपाल कनोज येथील प्रतिहारवंशीय राजा होय. प्रतिहारवंशीय राजांनीं अनेक नांवें धारण केलेलीं प्राचीन कोरीव लेख व नाणीं यांवरून दिसून येतात. उदाहरणार्थ या महीपालाच्या आजानें—भोजानें—मिहिर, प्रभास आणि आदि-वराह हीं नांवें घेतलीं होतीं. महीपालाचा पिता महेन्द्रपाल हा महेन्द्रायुध निर्भयराज व भाक या नांवांनीं ज्ञात होता. महीपालाचीही क्षितिपाल, विनायकपाल, हेरम्बपाल हर्ष इत्यादि दुसरीं नांवें प्रसिद्ध आहेत. तसेंच कार्तिकेय हें नांव दिसतें. याच्या दरबारीं राजशेखर व आर्यक्षमीश्वर हे

(१) पद्य सुभाषितरत्नभांडागार (निर्णयसागर-प्रेस) पृ. ११८-१२०.

प्रसिद्ध संस्कृत ग्रंथकार होऊन गेले. आर्यक्षेमीश्वरानें चंडकौशिक या नाटकाच्या प्रस्तावनेंत आपल्या आश्रयदात्यास महीपाल या नांवानें व भरतवाक्यांत कार्तिकेय या नांवानें उल्लेखिलें आहे. शिवाय त्या नाटकाच्या नांवांतही त्या राजाच्या नांवाचा गर्भित उल्लेख असावा. कारण चण्ड हें कार्तिकेयाचेंच एक प्रसिद्ध नांव आहे असें महाभारतांत ह्मटलें आहे[1] राजशेखरानेंही आपल्या बालभारत या नाटकास 'प्रचण्डपाण्डव' हें दुसरें नांव वरील उद्देशानेंच दिलें असावें. संस्कृत ग्रंथकारांची अशी पद्धत होती हें कालिदासाच्या विक्रमोर्वशीय व कुमारसंभव या ग्रंथांवरून दिसून येईल. असो. राजशेखरानें उध्दृत केलेल्या श्लोकांतील कार्तिकेय हा कनोजचा प्रतीहारवंशीय पहिला महीपाल होय हें आपण पाहिलें. त्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें या राजानें हिमालयांतील एकादा प्रदेश जिंकला होता काय याचा आतां विचार करूं. महीपालाच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं राष्ट्रकूट नृपति तिसरा इंद्र व कलचुरी राजा पहिला युवराजदेव यांच्या स्वाऱ्यांमुळें कनोजच्या साम्राज्यास उतरती कळा लागली होती. तथापि प्रारंभीं प्रारंभीं महीपाळानें अनेक ठिकाणीं स्वाऱ्या करून विजय मिळविला होता यांत संशय नाहीं. मध्यहिंदुस्थानांत खजुराहो येथें चंदेलनृपति यशोवर्मन् याचा एक शिलालेख उपलब्ध झाला आहे त्यांत महीपालानें आपले हत्ती व घोडदळ यांच्या बळावर काबूल व पंजाब येथें राज्य करणाऱ्या साहि राजाचा पराभव करून वैकुंठ नामक विष्णूची प्रतिमा हस्तगत केली होती असा उल्लेख आहे.[2] राजशेखराच्या बालभारत अथवा प्रचण्डपाण्डव या नाटकांत महीपालाचें येणेंप्रमाणें वर्णन केलें आहे—

नमितमुरलमौलिः पाकलो मेकलानां
रणकलितकलिङ्गः केलितट् केरलेन्दोः ।।
अजनि जितकुलूतः कुन्तलानां कुठारो
हठहृतरमठश्रीः श्रीमहीपालदेवः

१ महाभारत वनपर्व अध्याय २३२ ( मुंबई प्रत )

(2) Ep. Ind. Vol. I p. 134.

यांत वार्णिलेल्या युद्धांपैकीं एक कुलूत देशाच्या राजाशीं झालें होतें. सतलज नदीच्या किनाऱ्यानें जालंदर दोआबच्या ईशान्येस जो प्रदेश लागतो त्यास पूर्वी कुलूत ही संज्ञा होती. हें स्थान हिमालयांत आहे. तेव्हां येथें महीपालानें जो विजय मिळविला त्याचें वर्णन त्याच्या दरबारच्या एकाद्या कवीनें काव्यमीमांसेंत उद्धृत केलेल्या श्लोकांत केलें असावें असें वाटतें.

अर्थात् याच ठिकाणीं शकराजानें रामगुप्ताचा पराभव केला असावा. डॉ. आळतेकर ह्मणतात त्याप्रमाणें हा पराभव रामगुप्ताच्या राजधानींत ह्मणजे पाटलिपुत्रांत झाला नसून हिमालयांत झाला असावा हें उघड आहे. भोजाच्या शृंगारप्रकाशांत ' प्रकृतीनामाश्वासनाय शकस्य ध्रुवदेवीसंप्रदानेऽभ्युपगते ' असे शब्द आहेत त्यावरून रामगुप्तानें आपल्या राजधानींतील प्रजेच्या आश्वासनार्थ ध्रुवदेवीला शकराजाकडे पाठविण्याचें ठरविलें असावें असें डॉ. आळतेकर यांनीं अनुमान केलें आहे. पण प्रकृति या संस्कृत शब्दाचे प्रजा व प्रधान असे दोन अर्थ होत असल्यामुळें दुसऱ्या अर्थानेंच त्या शब्दाचा येथें प्रयोग झालेला दिसतो. काव्यमीमांसेंतील श्लोकावरून आपणांस असें दिसतें कीं गादीवर आल्यावर रामगुप्तानें आपल्या दिग्विजयी पित्याचें—समुद्र-गुप्ताचें—अनुकरण करण्याच्या इच्छेनें शकराजावर स्वारी केली असावी. त्या-प्रसंगीं त्याचा भाऊ चंद्रगुप्त, राणी ध्रुवस्वामिनी, व इतरही मन्त्र्यादि परिवार त्यांच्या बरोबर होता. इतक्या लवाजम्यासह शत्रूच्या राज्यांत दूरवर स्वारी करणें ह्मणजे वरील श्लोकांत ह्मटल्या प्रमाणें साहसच होय. दुर्दैवानें या साह-सांत अपयश आल्यामुळें रामगुप्ताबरोबरच्या सर्व मंडळींचा नाश होण्याचा प्रसंग आला होता. ह्मणून शकनृपतीनें घातलेली मानहानिकारक अट स्वीका-रणें रामगुप्तास भाग पडलें. शृंगारप्रकाशांत देवीचन्द्रगुप्त नाटकांतील एक उतारा दिला आहे[१] त्यांत चन्द्रगुप्तानें अलिपुर नामक शत्रूच्या स्कन्धावारांत कामिनीवेषानें प्रवेश करून शत्रूचा निःपात केला असें ह्मटलें आहे. डॉ. आळतेकर स्कन्धावाराचा शिबिर असा अर्थ करतात व तें शिबिर पाटलिपुत्राजवळ होतें असें

(१) स्त्रीवेषनिन्हुतश्चन्द्रगुप्तः शत्रोः स्कन्धावारमलिपुरं शकपतिवधायागमत्।
Ind. Aut. for 1923.

ह्मणतात. पण हा शब्दही निराळ्याच अर्थानें योजिलेला दिसतो. स्कन्धावार याचा राजधानी असाही अर्थ होतो* व तोच अर्थ येथें विवक्षित दिसतो कारण वरील उताऱ्यांत 'स्कन्धावार' या शब्दाबरोबर अलिपूर या गांवाचाही उल्लेख केला आहे. बाणाच्या हर्षचरितांत या गांवाचें नांव अरिपूर असें आलें आहे.[1] पण तें लेखकास अलिपूर या शब्दाचा अर्थ न समजल्यामुळें आलें असावें. हर्षचरिताच्या एका हस्तलिखित प्रतींत वरील उताऱ्यांत त्या गांवाचें नांव नलिनपूर असें दिलें आहे. कदाचित् तेंच त्याचें मूळचें नांव असावें व कालांतरानें लेखकाच्या अज्ञानामुळें प्रथम त्याचें अलिपूर व नंतर अरिपूर असें रूपांतर झालें असावें. बाणाचा समकालीन चिनी प्रवासी ह्यूएन्त्संग यानें सध्यांच्या जलालाबादच्या थोडें पश्चिमेस Teng-kuang असें गांव उल्लेखिलें आहे. या गांवाचें प्राचीन नांव पत्रपूर होतें असें एका विद्वानानें दाखविलें आहे.[2] हेंच बाणाच्या नलिनपूरानें विवक्षित असण्याचा संभव आहे. तसें असल्यास रामगुप्ताचा पराभव जलालाबादजवळ झाला असावा. महीपालानें पंजाब व काबूल येथील 'साहि' राजाचा पराभव याच प्रांतांत केल्याचें वर दाखविलें आहे. हें स्थळ हिमालयांत नसून हिंदुकुश पर्वतांत आहे हें खरें, पण या पर्वताला त्यावेळीं श्वेतपर्वत असें ह्मणत असत असें दिसतें त्यामुळें अशी भौगोलिक चूक दूरच्या कनोज येथील कवीच्या हातून होणें असंभवनीय नाहीं.

रामगुप्ताचा पराभव जालंदर दोआबजवळ झाला असो किंवा दूरच्या जलालाबादजवळ झाला असो, त्याचा शत्रु माळवा व काठेवाड येथें राज्य करणारा कोणी क्षत्रप किंवा प्रांताधिकारी नसून पंजाब व अफगाणिस्थान येथें राज्य करणारा कुशान राजाच असावा यांत संशय नाही. हे कुशानवंशीय राजे समुद्रगुप्ताच्यावेळीं प्रबळ होते. त्यांचा 'दैवपुत्रषाहिषा-

---

* हर्षचरित पृ. १५३ ( निर्णयसागर प्रेस ) पहा.

(१) अरिपुरे च परकलत्रकामुकं कामिनीवेशगुप्तश्चन्द्रगुप्तः शकपतिमशातयत्।
हर्षचरित पृ. १५३

(2) Warren On Yoan Chwang.

हानुपाहि ' अशा पदवीनें समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील प्रशस्तींत उल्लेख आला आहे. ते इ. स. च्या पांचव्या शतकापर्यंत पंजाबांत राज्य करीत होते. व त्यांना शक असेंही ह्मणत. दिल्लीजवळ मिहरौली येथील लोहस्तंभावर एका चंद्रनृपाचा प्रशस्तिलेख कोरलेला विद्वानांस माहीत आहे. हा चंद्र ह्मणजे गुप्तवंशीय द्वितीय चन्द्रगुप्तच होय हें बॅ. जयस्वाल यांनी दाखविलें आहे.[९] या प्रशस्तींत उल्लेखिलेली बाल्हीकांवरची स्वारी चन्द्रगुप्तानें गादीवर बसल्यावर कुशानांवर सूड उगवण्याकरितां केली असावी. काठेवाड--माळवा येथील क्षत्रपांनीं रामगुप्ताचा पराभव केला असता तर चन्द्रगुप्तानें त्यांचा नि:पात करण्याची पहिली संधि साधली असती. पण निदान इ. स. ३८८ पर्यंत ह्मणजे चन्द्रगुप्त गादीवर आल्यावर १०—१२ वर्षापर्यंत तरी त्यानें त्यांच्याकडे लक्ष दिलेलें दिसत नाहीं कारण या वर्षापर्यंतची त्यांची नाणीं उपलब्ध आहेत. या अवधींत तो उत्तरेकडे स्वाऱ्या करण्यांत गुंतला असावा असें दिसतें. चन्द्रगुप्तानें माळव्यावर स्वारी केली त्यावेळीं त्याच्या बरोबर असलेल्या एका मंत्र्यानें आपल्या लेखांत स्वत:चा 'अनेकसमरावाप्तयशस्ताक.' असा उल्लेख केला आहे.[१०] त्यावरून तत्पूर्वी त्यानें चन्द्रगुप्ताबरोबर राहून अनेक लढाया जिंकल्या होत्या असें दिसतें व त्यावरून उत्तरेंतील कुशानवंशीय सम्राटांचा पराभव केल्यावरच चन्द्रगुप्त त्यांनीं नेमलेल्या काठेवाड व माळवा येथील प्रांताधिपतींचा समूळ उच्छेद करण्यास प्रवृत्त झाला असें अनुमान करतां येतें.

(9) J. B. O. R. S. vol. XVIII p. 31
(10) Fleet Gupta Inscriptions p. 29

# गुणाढ्य कवि आणि वत्सगुल्म.

——=*=——

( लेखक—कविमयूर लक्ष्मण शास्त्री गाडगे वाशीम. )

प्राचीनकाळीं विदर्भ देश साहित्यशास्त्राबद्दल फार प्रख्यात असून, तो अनेक प्रतिभाशाली व महाकवींची जन्मभूमी होता. पण इतिहासलेखनाची चाल पूर्वीपासूनच आमच्या देशांत नसल्यामुळें एखाद्या विशिष्ट स्थलाबद्दल अथवा व्यक्तीबद्दल कांहीं माहिती संकलीत करणें महादुष्कर होतें. तत्रापि प्राचीन ग्रंथांतून कांहीं तुरळक आढळून येणारे उल्लेख एकत्रित करून एखाद्या कवीचा काळ, त्याची जन्मभूमी व त्याची कामगिरी वगैरे माहितींची सांगड घालावी लागते. प्रस्तुत लेखांत गुणाढ्य कवि हा कोण ? त्याचें निवासस्थान कोणतें ? व त्याची साहित्यसेवा कोणची इत्यादि गोष्टींचा विचार करायचें ठरविलें आहे.

साहित्यशास्त्रांत काव्याच्या वैदर्भी, गौडी, आणि पांचाली या तीन रीती सांगितल्या असून त्यांत वैदर्भी रीतीस मुख्य स्थान दिलें आहे. वैदर्भी ( वऱ्हाडी ), गौडी ( बांगाली ), पांचाली ( पंजाबी ) यापैकीं वैदर्भी रीतीचें श्रेष्ठत्व सर्वसाहित्यकारांनीं मुक्तकंठानें गाइलें आहे—

तत्रासमासा निःशेषसमग्रगुणगुंफिता
विपंचीस्वरसौभाग्या वैदर्भीरीतिरिष्यते

तसेंच —सरस्वती कंठाभरण

श्लेषः प्रसादः समता माधुर्यं सुकुमारता
अर्थव्यक्तिरुदारत्वमौजः कांतिसमाधय
इति वैदर्भमार्गस्य दशप्राणा प्रतिष्ठिताः
एषां विपर्ययः प्रायो दृश्यते गौडवर्त्मनि

—काव्यादर्श १—५४

याप्रमाणें श्लेषप्रसाद वगैरे दहा गुण विदर्भरीतीचे केवळ प्राण होत व याच्या उलट " अनुप्रासस्तुतप्रियः " अशी गौड रीती आहे.

ओज:प्रकाशकैर्वर्णै:र्बंध आडंबरः पुनः
समासबहुला गौडी वर्णैः शेषैः पुनर्द्वयोः

—साहित्य दर्प०

याप्रमाणें गौडीचें वर्णन केलें आहे. उदा०—" अलिकुलसंकुलबकुल निराकुलकूजितकुंजकुटीर " याप्रमाणें समासबाहुल्यानें केलेलें वर्णन अष्टपदीकार जयदेवस्वामी यांच्या ग्रंथांत आढळून येतें. कारण ते गौड होते. हल्लीं सुद्धां आमच्या गौडबंधूंच्या नांवांत ही छटा दिसून येते. शामसुंदर, चक्रवर्ती, प्रफुल्लचंद्रराय, नालिनीकांतराय, जीवानंदविद्यासागर भट्टाचार्य याप्रमाणें लांब लांब डब्बे लागलेल्या मालगाडीप्रमाणें समासबाहुल्य व अनेक पदांची खच्चून भरलेली गर्दी दिसून येते. तिसरी रीती पांचाली. तिचें लक्षण— समस्तपंचपपदां पांचालीं कवयो विदुः—असें सांगितलें आहे. परंतु या सर्वांत मान्यता पावलेली फक्त वैदर्भी हीच एक रीती होय. यावरुन पूर्वी विदर्भात अनेक प्रतिभासंपन्न व मधुर काव्य करणारे कवि झाले असावेत व त्यांनीं संपादन केलेल्या श्रेयामुळेंच काव्यांत वैदर्भीरीतीस श्रेष्ठत्व प्राप्त झालें असावें हें उघड आहे. परंतु इतिहासाच्या अभावीं हाताच्या बोटांवर मोजण्या इतकेंच वैदर्भीय कवि दृष्टोत्पत्तीस येतात. भवभूती सारख्या एखाद्याच कवीचा नामनिर्देश केलेला आढळतो. पण ज्यांनीं विदर्भास इतका मान मिळवून दिला असे ते कोण कवि असावेत बरें ? भवभूती खेरीज सातवाहन, भोज, दंडी, त्रिविक्रमभट्ट, राजशेखर[१] आदि कांही कवि विदर्भांतीलच असावेत असें त्यांच्या ग्रंथांतील उल्लेखावरुन अनुमान करावें लागतें.

ज्या काव्यरीतीमुळें विदर्भदेश एवढ्या प्रख्यातीस आला त्याच विदर्भांतील वत्सगुल्म ( वाशिम ) या गांवीं गुणाढ्य कवीचा जन्म झाला असावा असें उपलब्ध असलेल्या माहितीवरुन ह्मणतां येईल.

---

१ किरातार्जुनीयकार महाकवि भारवि हा देखील वऱ्हाडांतील एलिचपूर शहरचाच रहाणारा होता. C/– प्रो. वि. भि. कोलते यांचा वऱ्हाडशाळापत्रक नोव्हें. डिसें. दिवाळी अंकांतील ' विदर्भाचा महाकवि भारवी ' हा लेख.

—संपादकः–शारदाश्रम वार्षिक.

वत्सगुल्म ( वाशिम ) हें क्षेत्र प्राचीन कालीं भूमध्यरेषेचें स्थान व अनेक पुण्यतीर्थे आणि देवता यांचें निवासस्थान असून याची पवित्र क्षेत्रांत गणना होती. हें एकेकाळीं साहित्यशास्त्राचें व विद्वत्तेचें माहेरघर असून अनेक प्रतिभासंपन्न कविरत्नांचें जनकत्व याजकडे होतें असें ऐतिहासिक व पौराणिक प्रमाणांवरून सिद्ध होतें. बृहत्कथा नांवाच्या सुरस ग्रंथाचा कर्ता महाकवी गुणाढ्य व काव्यमिमांसा, कर्पूरमंजरी वगैरे ग्रंथांचा कर्ता राजशेखर हे दोन्हीही कवी वत्सगुल्म किंवा वाशिम गांवचे रहिवाशी असावेत असें वाटतें. याबद्दल ऐतिहासिक प्रमाणें काय मिळतात ती पाहूं.

महाकवि गुणाढ्य यानें पैशाची भाषेत बृहत्कथा ग्रंथ केला आहे. हल्ली तो उपलब्ध नसून या ग्रंथाचीं भाषांतरें संस्कृतांत क्षेमेंद्र व सोमदेवभट्ट या कवींनीं केलीं आहेत. सोमदेवभट्टाचें कथासरित्सागर नांवाचें भाषांतर मूळाला धरून व विस्तृत असें आहे. त्यांतून उपलब्ध झालेली माहिती खालील प्रमाणें:—

एकदां श्रीशंकरपार्वती एकांतांत असतां पार्वतीनें शिवाला कधीं कोणीं ऐकल्या नाहींत अशा गोष्टी सांगण्याबद्दल आग्रह केला. त्या गोष्टी कोणासही न ऐकण्यासंबंधीं ताकीद देऊन अगदी एकांतात महादेव त्या गोष्टी सांगत असतां योगमार्गानें चोरून येऊन पुष्पदंत नांवाच्या गंधर्वानें त्या गोष्टी ऐकल्या व त्या अपराधाबद्दल त्याला मृत्यूलोकीं जन्म घेशील असा पार्वतीचा शाप झाला. त्याची तरफदारी करणारा विश्वावसु गंधर्वही शापित झाला. पुष्पदंत वररुचि नांवानें कौशांबी नगरींत जन्मला. दुसरा विश्वावसु गंधर्व त्याची गोष्ट अशी:—प्रतिष्ठान देशांत सुप्रतिष्ठीत नांवाचें शहर असून तेथें सोमशर्मा नामक कोणी ब्राह्मण रहात होता. त्याला वत्स व गुल्म या नांवाचे दोन पुत्र व एक श्रुतार्था नांवाची मुलगी होती. कांहीं दिवसांनी आईबाप वारल्यावर वरील दोघा मुलांनी, आपल्या बहिणीचें पालन पोषण केलें. एकदां चमत्कार असा झाला कीं लग्न झालें नसतांही श्रुतार्था गरोदर आहे असें दिसून आलें. परंतु तिसरा तेथें कोणी पुरुष नसल्यामुळें आपसांतच ते शंकित झाले. त्यांची ती साशंकवृत्तीपाहून श्रुतार्था आपल्या बंधूस ह्मणाली कीं माझ्याबद्दल आपण भलतीच शंका घेऊं नये. तर मी

एकदां स्नान करण्याकरितां गेली असतां नागराजा वासुकी याचा पुतण्या कीर्तिसेन यानें मला पाहिलें व कामासक्त होवून त्यानें आपलें कुल व नांव सांगून माझ्याशीं गांधर्व विवाह केला. त्या कीर्तिसेनापासून मला हा गर्भ राहिला आहे ही गोष्ट ऐकून त्यांनी तीस सत्यतेबद्दल प्रमाण मागितलें तेव्हां श्रुतार्थेनें त्या नागकुमाराचें स्मरण केलें व लागलीच तो तेथे उपस्थित झाला; आणि वत्स व गुल्म नामक त्या कन्येच्या बंधूंना तो ह्मणाला कीं, ही तुमची बहीण पूर्व जन्मांतील श्रेष्ठ अप्सरा असून, तुह्मी व ही तुमची बहीण गंधर्व कुलांतील आहांत. व कांहीं शापामुळें या मृत्युलोकीं आलांत. तुमच्या या बहिणीस निःसंशय मुलगा होणार व नंतर तुह्मी शाप मुक्त व्हाल असें सांगून तो नागकुमार गुप्त झाला. नंतर थोड्याच दिवसांनीं त्या श्रुतार्था नांवाच्या वत्स व गुल्म बंधूंच्या बहिणीला पुत्र झाला तोच हा शापभ्रष्ट माल्यवान गंधर्व सुप्रतिष्ठित नांवाच्या शहरांत महाकवि गुणाढ्य नांवानें जन्मला.

अन्यच्यः माल्यवानपि नगर वंर सुप्रतिष्ठिताख्येसः ।
जातो गुणाढ्यनामा देवितयोरेप वृत्तांतः ।

वर दिलेल्या माहितीवरून— प्रतिष्ठानेस्ति नगरं सुप्रतिष्ठित संज्ञकं— प्रतिष्ठानप्रांत हा दक्षिणपथांत होता व तो भाग ह्मणजे पैठण शहर होय. सोमशर्मा ब्राह्मणाला सुप्रतिष्ठित नगरांत वत्स आणि गुल्म नांवानें पुत्र व श्रुतार्था कन्या झाली असल्याचें सांगितलें आहे. सोमशर्मा वारल्यावर आपल्या लहान बहिणीचें पालन या बंधूंनी केलें. व त्यांच्याजवळ असतां-नाच श्रुतार्थेला गुणाढ्य नामक पुत्र झाला. वत्स गुल्म बंधूंनी स्वतः ब्राह्मण-पुत्र असतांही आपल्या पराक्रमानें जवळ असलेल्या प्रांतांत राज्य स्थापून " वत्सगुल्म " ( वाशीम ) ही राजधानी केली. व वाशिम येथें रहात असतांनाच त्यांच्या श्रुतार्था बहिणीला पुत्र झाला. वत्सबंधूंनी वसाहत केलेल्या प्रदेशाला त्या दिवसापासून " वत्सगुल्म " हेंच नांव प्राप्त झालें. ( अभूतां दाक्षिणात्यस्य द्विजस्य सोमशर्मणः । वत्सगुल्माभिधौ पुत्रौ । क्षेमेंद्र-(बृहत्कथामंजरी) वात्स्यायनाच्या कामसूत्र ग्रंथांत " वात्सगुल्मांना असा वत्सगुल्मांतील राजे व मुख्यप्रधान यांच्या दुर्वर्तनाचा दोन वेळ उल्लेख

आला असून त्या ग्रंथाचा टीकाकार यशोधर गुरुदत्तेंद्रपाद आपल्या जयमंगला टीकेंत वत्सगुल्म देश कोणता यासंबंधीं पुढील प्रमाणें लिहितो " दाक्षिणापथे सोदर्यौ राजपुत्रौ वत्सगुल्माभिधौ ताभ्यामध्यासितो देशो वत्स-गुल्मक इति प्रतीतः " दक्षिणापथांत राजपुत्र वत्सगुल्म नांवाचे दोघे सख्खे बंधू होते त्यांनीं वसाहत केलेला प्रांत वत्सगुल्म या नांवानें प्रख्यात आहे. यावरून पूर्वोक्त बंधूद्वयानें या भागांत प्रथम वस्ती केल्याचें दिसतें व त्यांच्या नांवावरून प्रस्तुत प्रदेशास वत्सगुल्म हें नांव पडलें व तेंच वत्सगुल्मशहर हल्लीं वऱ्हाडांत वाशीम या नांवानें प्रख्यात आहे व या शहरांतच वत्सगुल्म या राजांच्या बहिणीला महाकवि गुणाढ्य पुत्र झाला. वरील सर्व प्रमाणांवरून गुणाढ्य हा कवि वाशिमचाच रहिवासी होता हें निःसंशय सिद्ध होतें. कदाचित् सुप्रतिष्ठित शहरासच पुढें वत्सगुल्म बंधूंच्या रहाण्यामुळें वत्सगुल्म हें नांव पडण्याचा अधिक संभव आहे. यावरून वरील कवि वत्स–गुल्म राजांचा भाचा होता हें उघड आहे.

वत्सगुल्मक्षेत्र माहात्म्य म्हणून ४१ अध्यायाचा एक संस्कृत (हस्तलिखित) ग्रंथ सध्या उपलब्ध असून त्यांत अनेक तीर्थें व देवतास्थानें यांचीं फार सुरस वर्णनें आहेत. सदर ग्रंथांत वत्सगुल्म क्षेत्र कसें निर्माण झालें या संबंधी लिहिलें आहे कीं-पुराणकालीं वत्सऋषीनें अनेक वर्षें तपश्चर्या केली त्यामुळें श्रीशिवाला करुणा उत्पन्न होऊन अनेक देवतांसह वत्सऋषीच्या आश्रमांत ते आले व वत्सऋषीच्या प्रार्थनेवरून सर्वदेवासह वर्तमान भक्तजनांचा उद्धार करण्याकरितां शंकरानें श्रीकरुणेश्वर नांवानें येथेंच कायमचें वास्तव्य केलें वत्सगुल्म या शब्दाची व्युत्पत्ति माहात्म्य ग्रंथांत खालीलप्रमाणें दिली आहे. वसिष्ठ–गुल्मत्वेन स्थिता देवा वत्साश्रमपदंप्रति अतोस्यचाभवन्नाम वत्सगुल्म मितिप्रभो ॥ १ ॥ वत्सगुल्मा. अ० ८ वत्स ऋषीच्या आश्रमांत सर्व देव आपापल्या गणासह समुदाय ( गुल्म ) करून येऊन राहिले म्हणून या क्षेत्रास वत्सगुल्म असें नांव प्राप्त झालें.

सदरहू क्षेत्र पुरातन कालीन वत्सऋषीच्या तपश्चर्येमुळें बनलें असो किंवा अर्वाचीन सोमशर्मा ब्राम्हणाचा वडील पुत्र वत्स याच्या राहण्यामुळें

असो; प्रस्तुत क्षेत्राच्या प्राचीनत्वाचा काल सुमारें जवळ जवळ २००० ( दोन हजार ) वर्षांचा असावा असें आभास वाटतें. याबद्दल विस्तृत विचार " राजशेखर आणि वत्सगुल्म " या लेखांत करूं.

वत्सगुल्म बंधूंच्या राजधानींत—वाशीम-येथें कीर्तिसेन नांवाच्या नाग-कुमारापासून गुणाढ्य कवीचा जन्म झाला. कांहीं कालानंतर गुणाढ्य कवीचे दोघे मातुल व त्याची माता श्रुतार्था ही मरण पावली, यामुळें गुणाढ्यास फार दु:ख झालें पण तसाच तो धैर्यानें विद्याभ्यास करण्याकरितां देशांतरास गेला व अनेक विद्या संपादन करून प्रसिद्ध पंडित झाला. आपले गुण दाखविण्याकरितां स्वदेशास येऊन प्रतिष्ठान शहरांत राज्य करणाऱ्या " शात-वाहन " राजाची त्यानें भेट घेतली. प्रधानानें राजास सांगितलें कीं हा कवि सर्वविद्यासंपन्न असून प्रख्यात आहे व ह्मणूनच गुणाढ्य हें त्याचें नांव यथार्थ आहे " अयंदेव भुविख्यात : सर्व विद्याविशारद :। गुणाढ्य इति नामास्य यथार्थ मत एवहि. ॥ अशा प्रकारें प्रधानानें त्याची स्तुति केलेली पाहून शातवाहन ( शालिवाहन ) राजानें त्याचा मोठा सत्कार केला व त्याला आपल्या प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं.

एकदां शातवाहन राजा आपल्या स्त्रीसह जलविहार करीत असतां त्याच्या विदुषि स्त्रीनें " मोदकै: सिंचय " माझ्यावर पाणी फेकूं नका असें ह्मटलें पण व्याकरणाचें ज्ञान नसल्यामुळें " मा उदकै: " असा पदसंधी न कळून " मोदकै: सिंचय "—मोदकांनी ( लाडूंनीं ) सिंचन करा असा भलताच अर्थ समजून स्त्रीवर त्यानें लाडू फेकले. यानंतर ' काय हा मूर्खपणा ' असें ती उद्गारली. या अपमानामुळें तो फार खिन्न झाला व प्रधानास व्याकरण किती दिवसांत येईल असें त्यानें विचारल्यावर गुणाढ्य कवीनें सहा वर्षांत शिकवीन ह्मणून सांगितलें. पण दुसऱ्या एका प्रधानानें सहा महिन्यांत शिकवीन ह्मणून सांगितलें तेव्हां गुणाढ्य कवीनें प्रतिज्ञेनें सांगितलें कीं सहा महिन्यांत कोणी व्याकरण शिकवील तर हल्लीं व्यवहारांत असलेल्या संस्कृत प्राकृत, अपभ्रंश किंवा देशभाषा या तीनही भाषा बोलण्याचें सोडून देईन.

दुसऱ्या प्रधानानें सहा महिन्यांत न शिकवीन तर देह त्याग करीन अशी प्रतिज्ञा केली. पण हें व्हावें कसें ? अशा काळजींत पडल्यावर एका तपस्व्यानें सांगितल्यावरून त्या प्रधानानें कार्तीक स्वामीची आराधाना करून त्याचा वरप्रसाद झाल्यावर शातवाहनाकडे येऊन त्यास ६ महिन्यांत व्याकरण शिकविलें. अशा रीतीनें पराभूत झाल्यामुळें गुणाढ्य पंडितानें आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्याकरतां पूर्वोक्त तीन भाषा—संस्कृत, प्राकृत अपभ्रंश किंवा देशी—न बोलण्याची प्रतिज्ञा केली. राजा प्रधान वगैरे यांचा तसें न करण्या-बद्दल आग्रह असतांही तो न जुमानतां विंध्यावासिनी देवीच्या दर्शनास निघून गेला. व देवीची कृपा होऊन तिच्या आज्ञेनें तेथून निघून घोर अरण्यांत फिरत असतां अनेक पिशाचांची आपसांत चाललेली भाषा ऐक-ण्यांत आल्यामुळें त्याला त्यांची भाषा अवगत झाली. त्यानंतर गुणाढ्याची यक्ष असून शापामुळें पिशाच झालेल्या काणभूतीची भेट झाली व परस्परांच्या भेटीतच शापमुक्तीचें कारण मुर्नाम समजलें. नंतर काणभूती पिशाच्यानें गुणाढ्याला अनेक सुरस व मनोरंजक गोष्टी सांगितल्या. त्या गोष्टी गुणाढ्यानें आपल्या रक्तानें लिहिल्या. त्याचे सात ग्रंथ झाले. ते आपल्या शिष्याजवळ देऊन सातवाहन राजाकडे त्यानें पाठविले पण ते ग्रंथ रक्तानें लिहिलेले व पिशाच्य भाषेंत लिहिलेले त्यानें परत केले. शिष्यानें ते ग्रंथ गुणाढ्यास परत केले. सातवाहन राजानें आपल्या ग्रंथांचा धिःकार केला हें पहातांच तो खिन्न झाला. व कुंडांतील अग्नी त्यानें प्रदिप्त केला. ग्रंथ वाचावा व प्रत्येक पान अग्नींत होमावें. ती कथा ऐकून मनुष्य, पशुपक्षी व वनांतील सर्व श्वापदें खाणेंपिणें सोडून अश्रू गाळूं लागले. ही गोष्ट शातवाहनास कळल्यावर तो तेथें आला व त्या कथा ऐकून आश्चर्यचकित झाला. गुणाढ्यानें सहा ग्रंथ अग्नीत जाळले होते पुढें शिष्यांच्या विनंती वरून एक ग्रंथ मात्र त्यानें त्यास दिला तोच "बृहत्कथा" नांवाचा अद्भुत व सुरस ग्रंथ होय. वरील सुरस कथा शिवानें पार्वतीस व गुणाढ्यानें काणभूती पिशाचास सांगि-तली. पहिला गंधर्व पुष्पदंत हा कात्यायन किंवा वररुचि या नांवानें प्रख्यात झाला, व दुसरा माल्यावान गंधर्व गुणाढ्यकवि या रूपानें अवतीर्ण झाला.

अवदश्च चंद्रमौलिः कौशांब्याख्यास्तिया महानगरी ॥
तस्यांस पुष्पदंतोवररुचि नाम्नाप्रिये जात: ॥
अन्यश्च माल्यवानपि नगरवंर सुप्रतिष्ठिताख्येस: ॥
जातो गुणाढ्य नामा देवि तयोरेष वृतांत :

कथापीठलंनकेषष्ठस्तरंगः—काथासरित्सागरे

वर दिलेल्या कथेत गुणाढ्य कवीनें स्वतःचा जन्म सुप्रातिष्ठित नगरांत झाल्याचें सांगितलें आहे. सुप्रतिष्ठित नगर हें वत्सगुल्म किंवा वाशिम हेंच असलें पाहिजे कारण त्याचे मामा जे वत्सगुल्मबंधू त्यांचे जवळ त्याची आई श्रुतार्थी रहात होती व गुणाढ्य कवीचा जन्म झाल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याची आई व दोघे मामा हे मृत्यु पावले. ते आपल्या राजधानीच्या नगरीं-वत्सगुल्म नगरीं—असताना गुणाढ्य कवीचा जन्म व्हावा हे साहजिक आहे पण गुणाढ्य स्वतःचा जन्म सुप्रतिष्ठित नगरांत झाल्याचे सांगतो त्या अर्थी नवीनच व सुंदर ज्याची रचना झाली अशा सुप्रतिष्ठित नगराचा अर्थ होतो. जरी वरील गांवास सुप्रतिष्ठित असें नांव दिलें असलें तरी वत्सगुल्मबंधूंच्या निवासामुळें पुढें बराच काल गेल्यावर त्या गांवाला " वत्सगुल्म " हेंच नांव पडलें असावें व त्यामुळेंच गुणाढ्यानें सुप्रतिष्ठित या नांवानेंच स्वतःच्या गांवाचा उल्लेख केलेला आढळतो. दंतकथेंत सातवाहन किंवा शालिवान प्रतिष्ठानचा—पैठणचा—राजा म्हणून सांगतात व पैठणचे लोकही ही शालीवान राजाची राजधानी होती म्हणून म्हणतात. यावरुन सातवाहन प्रथम सुप्रतिष्ठित नगरांत राज्य करुन नंतर तो पैठणास राजधानी करुन राहिला असावा व सुप्रतिष्ठान नगरांत शातवाहनानंतर वत्सगुल्मबंधूंनी राज्य केलें असावें कारण सातवाहन राजाची राजधानी आणि वत्सगुल्म या दोन्ही प्रदेशाला " कुंतल देश " म्हटल्याचें आढळतें. ( कुंतलेषु सातवाहनो नामराजा—काव्यमी· ) " अत्थिकुंतलेसुवच्छोमंण्णाम ( वत्सगुल्म ) ण अरं—कर्पूर मंजरी "-राजशेखर)

पैठणापासून वत्सगुल्म—वाशिम हें शहर सुमारें ६०-६५ कोसावर आहे व यावरुन सुप्रातिष्ठित शहरच पुढें वत्सगुल्मबंधूंची वस्ती झाल्याकारणानें " वत्सगुल्म " या नांवानें प्रख्यात झालें असावें.

गुणाढ्याचा पैशाची भाषेतील बृहत्कथा ग्रंथ हल्लीं उपलब्ध असल्याचें आमच्या ऐकिवांत नव्हते पण त्या ग्रंथाचा कांहीं भाग उत्तर हिंदुस्थानांत कोणास तरी उपलब्ध झाल्याचें आणि वाचलें असें श्री. य. खु. देशपांडे यांनीं आह्मास सांगितलें. तो ग्रंथ प्रत्यक्ष पाहून वाशिम हेंच गुणाढय कविचें जन्मस्थान असावं किंवा नसावें याबद्दल कांहीं प्रत्यक्ष पुरावा सापडल्यास उत्तमच पण आह्मी इतर ग्रंथांच्या आधारें प्रस्थापित केलेलें हें मत चुकीचें आहे असें सबल कारणानें कुणी प्रसिद्ध केल्यास आह्मी आमचें हें मत मोठ्या आनंदानें परत घेऊं.

प्रस्तुत कवीनें शातवाहन राजाचा प्रधान होण्यापूर्वी कांहीं संस्कृत ग्रंथ केले किंवा काय ? हें समजण्यास कांहींच साधन आज उपलब्ध नाहीं. बृहत्कथेच्या अन्यकृत संस्कृत भाषांतरावाचून गुणाढयाचें अन्यग्रंथ उपलब्ध असल्याचें दिसत नाहीं. याचा पैशाची भाषेतील मूळ बृहत्कथा हा ग्रंथ सांप्रत उपलब्ध झाला आहे. पण अद्याप तो आमच्या पाहाण्यांत आला नाहीं. परंतु पूर्वीच्या महाकवींनी तिचा उल्लेख मोठ्या आनंदानें आपल्या ग्रंथांत केला आहे.

समुद्दीपित कंदर्पाकृत गौरी प्रसाधना ॥
हरलीलेव नोकस्य विस्मयाय बृहत्कथा ॥ —हर्षच० बाणभट्ट

तसेंच:—

शश्वत्बाणद्वितीयेन नमदाकारधारिणा ।
धनुषेव गुणाढयेन निखिलोऽरंजिनोजनः ॥

दमयंती कथा: त्रिविक्रमभट्ट

यशस्तिलकचंपूकर्ता सोमदेवभट्ट यानें देखील आपले ग्रंथांत प्राचीन कवींची नांवें दिली आहेत त्यांत गुणाढय कवीचा उल्लेख केला आहे:—

" उर्वभारवि —भवभूति — भर्तृमेंठ — कंठ—गुणाढय—व्यास—भासकेस—कालिदास—बाणमयूर—नारायण—कुमार—माघ—राजशेखरादि कवि काव्येषु "

वरील ग्रंथाचा काल ( इ. स. ९६० ) गुणाढयकवीचा आश्रयदाता हाही उत्तम कवी असून त्यानें " गाथासप्तशती " नांवाचा सुरस ग्रंथ केला आहे. तो प्राकृत भाषेंत असून त्यातील अंतः प्रमाणावरून विदर्भातच त्याची रचना झाली असल्याचें दिसतें.

# दुर्भगाप्रमेय



( ले.—ह्. ना. नेने, M. A. L. T. पटवर्धन हायस्कूल नागपूर. )

म्हणौनि अक्षरीं सुभेदीं । उपमाश्लेष कोंदाकोंदी ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रथार्थासि ॥ ज्ञाने० १३-११६४
शंकेचेनि गदळें । जैं शुद्धप्रमेय मैळे ।
तैं मागुतिया पाउलीं पळे । अवधान येतें ॥
न बुझावितां मतें । न फिटे अक्षेपाचें लागतें ।
तें व्याख्यान जी तुमतें । जोडूनि नेदी ॥

ज्ञाने० १८-३२४-२७

१ शिष्यांसमवेत वेदांत्तचर्चा चालू असतां, नित्य व्यवहारांतील त्यांच्या अनुभवाचे दाखले देऊन, वेदांतरहस्य शिष्यांच्या मनांत ठिंबविण्याची अपूर्व हातोटी जशी श्रीरामकृष्णपरमहंस यांच्या मध्यें दिसून येते, तशीच विलक्षण वाक्शक्ति महानुभवपंथाचे आद्यप्रणेते श्रीचक्रधर यांच्या अंगीं वास करीत होती. श्रीचक्रधरांच्या प्रयाणानंतर थोडक्याच अवधींत त्यांचे पट्टशिष्य नागदेवाचार्य यांनीं केशोबासांच्या हस्तें महानुभवीय तत्त्वज्ञानाची जव्हां सिद्धांत मांडणी केली, तेव्हां सर्वज्ञ चक्रधरानीं आपल्या विविध शिष्यांना सांगितलेले प्रमुख दृष्टांत लीळाचरित्रांतून निवडून काढून, सिद्धान्ताच्या अनुक्रमाला अनुसरून त्या दृष्टांतांचाही अन्वय केशोबासांच्या हस्तें लावून देऊन दृष्टान्तशृंखला तयार करविली. दृष्टान्तांचा रोख ज्या ध्येयवस्तूकडे होता त्या वस्तूकडे साधकांचें लक्ष वेधून जावें म्हणून दृष्टान्तांमध्यें अस्फुट असलेला परम-अर्थ 'दार्ष्टांतिक' लिहून केशिराजव्यासानी सुव्यक्त करून दाखविला. हा सर्वभाग यादवकालीन प्राचीन मराठींत आहे ही मराठाच्या गद्याच्या दृष्टीनें अपूर्वता आहे.

२ हे निवडलेले दृष्टान्त ११४ असून, महानुभावांच्या 'पाठसमुदायांत' त्यांचा समावेश केलेला आहे. दृष्टान्तांचा गर्भितार्थ उकलून दाख-

विन्यासठीं पुढें अनेक गद्यग्रंथ झाले. दृष्टांतप्रमेय, दृष्टांतस्थळ, दृष्टांतविधायक या सारखे जसें मोठमोठे गद्य महानुभवीय वाङ्मयांत आढळून येतात, तसेंच कित्येक दृष्टान्तांवरही 'प्रमेय' ग्रंथ तयार झालेले आहेत. महानुभावीय परंपरेप्रमाणें प्रथम 'प्रमेय' रचना झाली; मग स्थळ (भाष्यें) निर्माण झालीं व नंतर 'बंध' (महाभाष्यें) झालीं. सारांश, कालानुक्रमानें प्रमेयें हीं अगोदरची होत. ज्ञानेश्वरी ही जशी गीताग्रंथावरील 'भावार्थदीपिका' तशी दृष्टान्तप्रकरणावरील हीं प्रमेयें होत. पद-पदांतील गूढ अर्थ मोकळा करून, आक्षेप, आशंका घेऊन व त्याचें निरसन करून अज्ञजनांना तत्त्वार्थ सुबोध व्हावा असा प्रमेयकारांचा उद्देश आहे. सर्व दृष्टान्तांची साकल्यानें चर्चा करणार जसे ग्रन्थ उत्पन्न झाले, तसेंच एक एक दृष्टान्त घेऊन त्यावरही ग्रंथ उभारणी केली केली. कारण दृष्टांत एकेकटे असोत, अगर त्यांची माला असो. त्या सर्वांमध्यें गोडी भरलेली आहे

नाना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होतीं परिमळीं ।
वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरीं जैसी ॥

या ज्ञानेश्वरांच्या उक्तीची याठिकाणीं आठवण होते.

३ महानुभवीय वाङ्मयसूचीवरून पाहिल्यास, केशिराजानीं 'द्विभार्या दृष्टान्तावर प्रमेय रचल्याचें दिसतें; कवीश्वरबासांची शिष्यीण नागाइसा इनें 'दुर्भगाविवेक' केल्याचा उल्लेख आढळतो; कवीश्वरबासांचे शिष्य परशरामबास यांचे 'दुर्भगा' दृष्टान्तावर प्रमेय दिसून येतें. मुरारिमल्लविद्वांस (१५ वे शतक) यांनीं तर ११२ प्रमेयें केल्याचा उल्लेख आहे.

४ प्रस्तुत प्रमेय हें दुर्भगेच्या दृष्टान्ताला अनुलक्षून लिहिलें असून तें परशरामबासांचें असावें असें वाटतें. पोथीमध्यें कोठेंही काळाचा, स्थळाचा, किंवा व्यक्तीचा उल्लेख नसला तरी, मुरारिमल्ल यांच्या प्रमेयापेक्षां, तें भाषादृष्टीनें व वर्णनशैलीवरून पूर्वीचें असावें हें उघड आहे. मुरारिमल्लांची निरूपणपद्धति सोपी, सुरस व सुबोध असून, सापेक्षानें 'दुर्भगाप्रमेया'पेक्षां भाषा अर्वाचीन आहे. 'चक्रधरसिद्धान्तसूत्रें' या गेल्यावर्षी प्रसिद्ध झालेल्या

पुस्तकाच्या टीपांत या प्रमेयकाराच्या भाषासरणीचे नमुने विस्तृत दिलेले आहेत. तारतम्य दृष्टीनें पाहतां प्रस्तुत ‘ दुर्भगाप्रमेयाची ’ भाषासरणी एकसारखी जरी सुबोध नसली तरी कांहीं कांहीं रमणीय स्थळें त्यांत खास आहेत; तसेंच विचाराचा सूक्ष्मपणा व शास्त्रीय मांडणी या दृष्टीनें तें इतर प्रमेयग्रंथाप्रमाणें मननीय आहे.

५ प्रस्तुत उपलब्ध झालेली पोथी चिवट व जाड्या कागदावर लिहिलेली असून तिच्या पानांचा आकार औरस चौरस ४।×४।। इंच आहे. लेखक मोठा साक्षेपी माणुस दिसतो. आजूबाजूला १।। बोटाइतकी ‘ माया ’ सोडून, कागदाच्या मध्यभागीं अक्षर चमचमितपणें काढलेलें असून, तें सुवाच्य, वळणदार, घोटीव व अथपासून इतिपर्यंत एकटाकी आहे. प्रत्येक ओळींत ७ ८ शब्द, अशा १४ ओळींचें प्रत्येक पान, अशा १४ पानांत प्रमेयाचा समावेश झालेला आहे. प्रारंभीं अगर अंतीं कालाचा किंवा लेखकाचा उल्लेख नाहीं; तथापि अक्षराची घाटणी व कागदाचा जुनेपणा यावरून ही पोथी २००–२५० वर्षापूर्वीची असावी असा तर्क आहे. पोथी सांकेतिक असून नेहमींच्या ‘ सकळलिपींत ’ आहे. पोथींतील सर्वभाग गद्यमय आहे. वाक्य व शब्द यांची अर्थ लावण्याची घाटणी मीमांसकांच्या प्रमाणें आहे. तसेंच प्रकरणावरील चर्चा आबालवृद्धांना सुगम व्हावी म्हणून, श्रोत्यांच्या परिचयांतील लीळाचरित्रांतील प्रसंगांचे व आख्यायिकांचे, पाठसमुदायांतील ओळखीच्या सूत्रांचे, व दृष्टांतप्रकरणांतील दृष्टांतांचे उल्लेख, चर्चेच्या ओघांत केल्यानें, मोरोपंतांची ‘ केकावली ’ वाचतांना भाविक श्रोत्यांना जो आनंद होतो, तसाच अपूर्व आनंद महानुभावीय लोकांना होतो यांत संशय नाहीं.

६ प्रस्तुतप्रमेय ज्या दृष्टान्तावर उभारलें आहे तो दृष्टांत असा आहे : “ कव्हणी एकी दुहवा असे : ते वाडीचा वाडीं कडवलीं असे । गांवींचा गांवीं तीएचे बापमाऊ असति : ते नेवों एति । तवं ते भणे : तुमचीं पाटाउवें सुताउवें नेसतां मज श्लाघ्यता नाहीं : भणौनि राहे । मग कीतीएक दीसां : मळीन : रोकडी : दुखीस्त : तेणें देखिली । मग अनुंकपा उपनली :

संबंधु दीधला : गर्भसंभुती जाली : पुत्र जाला : मग तेयाचेया आवघेयाची गोसावीण जाली । ''

७ या दृष्टान्तावर केशिराजबासांची 'लापणिक' पुढील अर्थाची आहे : आपल्या हातून आचरणांत अथवा विहितक्रियेंत अनुचित असें कांहीं घडल्यास परमेश्वराचें औदासिन्य भक्ताला दिसूं लागतें; तथापि परमेश्वराची 'जवळीक' न सोडतां अनन्यभावानें भक्तींत अंतर पडूं न दिल्यास परमेश्वराची पूर्ववत् कृपा होते. दुर्भगेच्या बाबतींत तिच्या नवऱ्याची जशी ती आवडती झाली, तसाच भक्त परमेश्वराला पुनश्च आवडूं लागतो. केशिराजबासाचें 'दार्ष्टांतिक' याच अर्थाचें आहे. " तैसें काईसेनि एकें परमेश्वरू उदासीन होति : मग संनिधान न संडीत असलेया परमेश्वर आपुला संबंध देति। '' अशा प्रकारच्या या गोड प्रकरणावर प्रस्तुत प्रमेयाची उभारणी आहे.

८ श्रीचक्रधरानीं दुर्भगेचा दाखला कां दिला असा प्रारंभीं प्रश्न उपस्थित करून, प्रमेयकारांनी केशिराजबासांच्या 'शब्दांचा मागोवा घेत' उत्तर दिलें आहे. परमेश्वरानें अव्हेर केला तरी, अनन्यभावानें उपासना चालूं ठेवणाऱ्या भक्ताला परमेश्वर प्राप्ती होते; ह्मणून पतीचें घर सोडून न जातां, मिळेल तें अन्नवस्त्र घेऊन राहणाऱ्या व पुढें पतीच्या सर्वस्वाची मालकीण होणाऱ्या 'दुर्भगेचा' दाखला गोसाव्यानीं दिला आहे. प्रमेयकाराचे शब्द पुढील प्रमाणें आहेत. " श्रीपरेशाय नमः । तरि गोसावी दुर्भगा कां सांघीतली : ना : अव्हेरिलियाहि पुरुषु संनिधान न संडत असीला तरि ईश्वरातेंचि पावे । भणौनि दुर्भगा न्याया उपमिली : जैसी ते पतीची केव्हेळांही कनाति न संडी तैसा ठावो ॥ ''

प्रमेयाचा शेवट पुढीलप्रमाणें केलेला आढळतो:—"भणौनि ईश्वरविहित संनिधान न संडित असलेल्या दुर्भगा एसणी जाली । सकळ क्रियांचीया उणिवा साधनेंचि दुर्भगेसि बहुत भेद असतिः पर प्राप्ती ते आवघेया सारखीचि : भणौनि संनिधान आचरू न संडावा । या लागीं गोसावी दुर्भगा सांघीतली । ''

९ दुर्भगेचा दृष्टांत कां दिला याचा हेतु आरंभीं स्पष्ट केल्यावर, मग 'दुर्भगा' या शब्दाच्या अर्थाकडे प्रमेयकार वळले आहेत. ज्यावेळीं पतीची कृपादृष्टि तिच्यावर पूर्णपणें होती त्यावेळीं तिचा प्रत्येक शब्द झेलला जात असे. पण तोंडाळपणामुळें किंवा अशाच कांहीं कारणानें पतीची अवकृपा झाल्यावर जो तो अवहेलना करूं लागला. म्हणून ती दुर्भगा म्हणजे 'दुहव: झाली. तिल्याकडून व्यभिचारीपणाचा दोष न घडल्यानें तिच्या पतीनें तिला वाड्याच्या जवळ आवारांतच खोपटींत रहाण्याची परवानगी दिली. प्रमेयकार पुढीलप्रमाणें याचें वर्णन देतात.

"तरि दुर्भगा भणीजे काई : ना : दुर्भाग्या जाली : आधीं सभागा होति तवं वरैतु (नवरा) आदिकरूनि तीएसि अधीनें होति। तवं ते भणे तें करीतें होति। ऐसीं तळाटीं वर्ततें होति। तें सभाग्य गेलें : मग आलें अभाग्य : मग कव्हणी मानीति ना : लखीती ना। दुहवें घालीतां अवज्ञा करीति : उदक घालीतां : सर्पण देतां : अवज्ञा करीति। कां पां : **नावडे घरा। तें नावडे आवघेया घरा** : भणौनि दुर्भगा। तरि दुर्भगा केव्हेळां जाली - ना : पतीसी नावडे तेव्हेळां : तेंचि द्विविध : एकी : मूळाची व्यभिचारिणी : तीएसी ठाइचेंचि सभाग्य नाहीं : तें मुळीलागौनि दुर्भगा असे। एकी : अवान्तर। गोसावीची हेंचि सांघीतली। कां पां : अग्निब्राह्मणसाक्षी करुनि मायबापीं हातीं लाविली : तधवां सुहव होति : मग अनुचित (अनुचित क्रियेमुळें) पतीसि नावडी उपनली : तेव्हेळीं दुहव झाली। तरि काई : अनुचित आचारू केला : भणे ना : वेळेचें तेयाचें भणीतलें न करीचि : कांहीं भणे तरि तेयासि तोंड दे : तणें तेया (नवऱ्याला) खंति आली। मग अव्हेरिली कडवली घातली।"

१० यानंतर दुर्भगेच्या ठिकाणीं विविध भक्तांना कल्पून व परमेश्वर हा पति असें रूपक करून, भक्तांना अनुचित वागल्यानें 'दुहवपण' कसें येतें याची फोड प्रमेयकारानी केलेली आहे. "जें जें प्रमाण भंग तेणें तैसें दुहवपण ये।"

११ इतकें विवरण झाल्यावर महानुभवीय, अजाण पण सात्विक अशा श्रोत्यांना हें रहस्य कळावें ह्मणून लीळाचरित्रांत वर्णिलेला नागदेवाचार्य यांच्या चरित्रांतील श्रीचक्रधरांच्या जवळ राहण्याबद्दलचा त्यांचा आग्रह व मनाची तळमळ वर्णन करणारा बहारीचा प्रसंग सांगून नागदेवाचार्यांचें ' दुहवपण ' श्रोत्यांना पटेल अशा रीतीनें प्रमेयकारानीं चित्रित केलें आहे. तसेंच वर्णनाच्या ओघांत, वर्णनाला लागूं पडतील अशा सूत्रांचा मधून मधून उल्लेख केल्यानें विवेचनाला सरसता आली आहे. ( सूत्रें :-अविद्येचीं अनंत द्वारें । जीवु दोषांचे आजे । इत्यादि )

१२ यानंतर संनिधान परत्वें व दोषानुरूप दुहवपणाचे भेद सांगून नवऱ्याची बायकोवर अवकृपा होण्यास काय काय कारणें होतात व दोषाच्या कमी अधिक प्रमाणानुसार कोणती शिक्षा कितपत दिली जाते याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं, ' दृष्टांत ' प्रकरणांपैकीं अनेक दृष्टांतांचा उल्लेख प्रमेयकारानें केलेला आहे.

१३ पतीनें अव्हेर केला तरी माहेरीं जाणें कव्हांही अनिष्ट असा विचार तिच्या मनांत कां आला याचें कारण पुढीलप्रमाणें दिलेलें आहे. पतीनें दिलेलें अन्नवस्त्र निमुटपणें घेऊन तेथेंच वाड्याच्या आसपास राहिल्यास पतीच्या कृपाकटाक्षाचा संभव तरी आहे; तो देखील कठीणच; मग माहेरीं राहिल्यास लोकनिंदेस अवसर मिळून, पुन: पतीची कृपा उद्भवणें शक्यच नाहीं. हें विवेचन वाचीत असतां, " घर तरि अविद्या : दादोसा तरि अनिष्ट : तरी गोसावी तो अवतारू सांधितला असे तेथ जावो : मग भट्टी भणीतलें : मी परमेश्वरपुरा जाईन " या शब्दांनीं वर्णिलेली लीळाचरित्रांतील नागदेवाचार्यांची मूर्ति डोळ्यासमोर उभी राहते.

यानंतर आपल्या मुलीचें दुहवपण ऐकून त्याच गांवांत राहणार सधन असे तिचे बापभाऊ तिला नेण्यास आले; पण त्या पतिव्रतेनें मोठें मार्मिक उत्तर दिलें; " पतीचिया मुखावांचौनि सकळही सुखें दैन्यें आन पाप " प्रस्तुत रूपक उलगडून दाखवीत असतां, परमेश्वरावर पतीची कल्पना

करून, विरहानें तळमळणारा भक्त कसा असतो याचें वर्णन प्रमेयांत पुढील प्रमाणें केलें आहे.

"ऐसेया परी असतां तो सकळही सुखें वोवाळणी घाली: भणौनि सृष्टीं सृष्टीं हाचि पति होवावा: कां पां: हा आणिका पतीसारखा नव्हे: हा नित्यपति: इतर पती केव्हां नष्ट होतील व वैधव्यपण केव्हां येईल याचा नियम नाहीं; ह्मणून सर्व प्रकारचा सासुरवास सहन करून, पतीच्या कृपेची प्रतीक्षा ती चातकाप्रमाणें उत्कंठापूर्वक करूं लागली. दुर्भगेप्रमाणें अनन्य-भावानें उपासना करणारे साधक स्वर्गनरकादि च्युतिमंत फळांची आशा न करितां 'अच्युत'पद प्राप्तीची वाट सोडत नाहींत व त्यासाठीं कोणतेही आयास करण्यास ते तयार असतात. 'सुखसाधनें देव न पवीजे, नाएका' या सूत्राची अशाप्रकारें साक्ष पटते.

१४ पुढें अनुताप पूर्वक दिवस कंठीत असतां, तिच्या स्थितीचें वर्णन प्रमेयकार पुढील प्रमाणें देतात:—'निरंतर ईश्वराची आर्त होवावी : विरहो भावावा : भणौनि तोंडाचां ठाइं कोमाइलेंपण : डोळेयाचां ठाइं कोमाइलेंपण : शब्दांचेयां ठाइं कोमाइलेंपण। जैसें एकाधेया वृक्षाचे शाखा-पल्लव लाल्हात दिसती : मा अवचट तळीं घावो घाली : मग सकळ पालव कोमाइले दिसति : डहाळीया गळालीया दीसति :...ऐसा अव्हेराचा कुहा पाडिला असे : मग रात हीं या अव्हेराबाहिरि कैं पडैन भणौनि शोचि-तुचि असे :....जैसें तुडकाचां हातीं पाडिलेया अखंड सुटकेची चिंता वहातुचि असे : दुःख करीतु असे।"

१५ या केविलवाण्या स्थितीचें सूक्ष्मविवेचन करितांना प्रमेयकारांनीं—

'बाइ, अनुचित क्रियेसी अनुताप पुरश्चरण' या 'आचारपाठांतील' सूत्राकडे श्रोत्यांचें लक्ष वेधून घेऊन, निर्वेद, अनुताप, अनुशोच व आर्ति यांतील भेद स्पष्ट केला आहे. पूर्वजन्मीं पापें केलीं त्याचें फळ पतीला तोंड टाकून बोलण्याची बुद्धि होणें याबद्दल मनाला वाईट वाटणें हा निर्वेद; प्रस्तुत केविलवाणी असहाय स्थिति ह्मणून उद्वेग वाटणें हा अनुताप; आतां तरी विहित आचरणांत प्रमाद होऊं नये, नाहींतर पुनः पुढें दुःख ठेवलेलें

असा विचार येऊन मन खिन्न होणें हा अनुशोच; व पतीच्या विरहाची तळमळ व पुनर्दर्शनाची आकांक्षा ही आर्ति, यामुळें त्या स्त्रीच्या मनांत कसा फरक पडत चालला व दिवसेंदिवस तिची तपश्चर्या सिद्धीस जाण्याची वेळ कशी आली हें पुढें प्रमेयकार वर्णन करितात. " निर्वेदे अयोग्यता दक्षता नासे : अनुतापु अविधि अनिष्ट नासें : अनुशोचें इंद्रियधर्म मनोध मींची उलंघनें होति : शमीनि मग स्वस्थाचित्तें बुद्धि संभवे : आर्ति कर्माचेया राशी नासति : ऐसा निरंतर ईश्वराचेनि दुःखें झळंबला असे '

१६ अशा स्थितींत ती स्त्री कशी दिसत होती याचें चित्र सूक्ष्मपणें रेखाटलें आहे. " ऐसयापरि आपणेयातें दमितुचि असे : लोका गुरुकुळाचें साहातुचि असे : तुटकें देह : कडकडित पासोळीया : हातीं पायीं सीरा उमटलीया : वाक नियमीतु : खोल निगेले डोळे : सरकिया जालीं बुबुळें : आंगीं पोट रुते :···एयापरि आपणातें दामितुचि असे। तें केंवि : ना : पोळलेया सुनयाचेनि दृष्टांतें। " फोफाट्यांत अंग माजून अंगाची लाही झाली असतां त्या कुत्र्याची तळमळ कोठें गेले तरी कशानेंही शांत होत नाहीं त्याप्रमाणें पतीच्या विरहानें ही लता कोमेजून गेली; करपून गेली.

१७ अशाप्रकारें रात्रंदिवस तळमळणाऱ्या भक्ताला परमेश्वर दूर नाहीं याची साक्ष ह्मणून लीळाचरित्रांतील परमेश्वरी कृपाप्रसादाचें वर्णन अनेक आख्यायिका व प्रसंग सांगून प्रमेयकारांनीं दिलें आहे ' दयाघन भक्तीं आकळिला ' हें ध्रुवपद ह्मणून झाल्यावर, परमेश्वराच्या दयालुपणाचे एकामागून एक उल्लेख केल्यानें, या पदानें भक्तिरसाचा उत्कर्ष जसा श्रोत्यांच्या मनांत होतो, तसेंच ' दुबळीया मातेच्या ' दृष्टांताचा उल्लेख करून, दयाघन प्रभूच्या अनुपम दयेचें वर्णन प्रमेयकारानीं बहारीचें केलें आहे.

" तें अवघें स्वरूपाचि कृपेचें: ईश्वरीं कृपा उमपः जीवांसि योग्यता घडावेया कारणें तोखु स्वीकरिला : कां पां : जे : **भायेदेवाचेया** बोरांसि तोखले : **साधाचेया** फुलांसि तोखले : इंद्रभट्टाचेया पुजेसि तोखले : असे जीवाचे दोष नासावेया कारणें खंति स्वीकरिली : कां पा : **पद्मनाभिदेवाचा** केसणा दोषु चुकविला : श्राद्धभोजनीं **भट्टोबासाचा** केसणा दोषु

चुकविला : सींभाजनीं आउसाचा केसणा दोपु चुकविला : विद्यावंत निवारणी भट्टाचा केसणा दोपु चुकविला : म्हणौनि जीवातें उद्धरावेया कारणें जीव देवतांचे धर्म परमेश्वरु स्वीकरिती। ”

या अवतरणांतील भक्तिरसाचा आस्वाद, लीळाचरित्रांतील लीला ज्यांना माहीत आहेत, त्यानांच जरी घेतां येण्याजोगा असला, तरी त्यांतील आर्तता व आवेश वाचकांना ग्रहण करतां येतील असें वाटतें.

१८ यापुढें तिच्या पतीनें जसा त्या स्त्रीचा स्वीकार करून, संबंध दिल्यानें ती पुत्रवंती झाली व पतीच्या सर्वस्वाची मालकीण झाली, तसेच भक्ताची आर्तता पाहून परमेश्वर द्रवतो व आपल्या कृपेला सर्वस्वी पात्र करून आपल्या सर्व शक्तींचा त्याला स्वामी करतो व तो भक्त त्यामुळें सर्वांना ‘ प्रमाण द्रव्य ’ होतो. “ आजि लागोनि जीवासि मागील दुःख कष्ट : अवज्ञा अव्हेरण : साहिलेयाचें जव्हेळीं सकळ सुख जालें : तव्हेळींचा तेया स्वरूपाचा संबंधु जाला: मग तेया आनंदरूप स्वरूपाचें आलिंगन कंठ्ठांठीं सुटौनि नाहीं: आवघेयाची धनिनी : गोसाविणी तियें स्थानीं जमणें ईश्वरस्वरूप तेसणा होय : तीए ईश्वरस्वरूपीचा आनंद अखंड भोगितु असे। तेथ ईश्वरावेया जडांचेतना शक्तीचा गोसावी होए। तें कैसि : ना चंदनाचेनि दृष्टांतें। ”

१९ अशा प्रकारें “ भक्त वियोगी नुरे ” “ परमेश्वरू आपुलेया भक्तांसि अनुभूति रति देति ” इत्यादि सूत्रानुरूप जीवोद्धरणाचें निरूपण करून दुर्भगादृष्टांताची हृदयंगम चर्चा प्रमेयकारांनी केली आहे.

२० संस्कृत विद्येला पारखा झालेल्या अफाट अज्ञसमाजाचें जीवोद्धरण करण्याची दीक्षा घेतलेल्या या पंथानें अजाण व असंस्कृत आबालवृद्धांची, “ स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ” या न्यायानें धर्मजिज्ञासेची तळमळ नित्यव्यवहारांतील देशी बोलीनें शांत करून केवढें धर्मकार्य केलें व भागवत धर्माचा प्रसार भक्ति, वैराग्य, ज्ञान या त्रयीच्या दृष्टीनें कसा केला याची साक्ष हें प्रमेय देईल.

श्रीचक्रधरः शरणम्.

# श्रीचक्रधरस्वामींचा काळनिर्णय.



[ लेः—महात्म वाङ्मयसेवक बाळकृष्णजी शास्त्री ( पंजाब युनिवर्सिटी ) माहूर ]

कांहीं वर्षांपूर्वी महाराष्ट्र सरस्वतीच्या भाविक उपासकांचा असा समज होता कीं, आपल्या उपास्यदेवतेच्या पद्यशरीराची आद्यरचना श्रीज्ञानेश्वर महाराजांनींच केली; तिच्या गद्यशरीराची पहिली निर्मात्री सभासदी बखरच होय; वृत्तात्मक पातळ विणून तें तिला नेसविण्याचें श्रेय प्रथम वामनानेंच घेतलें; व व्याकरण कोषांचीं लेणी इंग्रजांच्या कृपाप्रसादानेंच तिला लेवविलीं गेलीं. परंतु कै० वि० ल० भावे यांनीं श० १८४६ मध्यें ' महाराष्ट्र सारस्वत ' आणि ' महानुभाव महाराष्ट्र ग्रन्थावली, कविकाव्य सूची ' छापून महाराष्ट्र-सरस्वतीच्या पद्यशरीराच्या आद्यरचनेचा मान श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या ऐवजीं ' शिशुपाल वध ' कर्ते कवीश्वराचार्य श्रीभानुभट्ट उर्फ भास्कर महानुभाव यांना दिला; गद्यशरीराच्या आद्यनिर्मितिचा टिळा ' लीला चरित्र ' कार श्रीमहिमभट्ट ( ह्माइं भट्ट ) महानुभाव यांस लावला; तिचें वृत्तात्मक पातळ विणण्याचें पहिलें श्रेय कवीश्वराचार्य श्रीभास्कर महानुभाव यांनाच दिलें; व व्याकरण कोषांचीं लेणीं लेवविण्याचें पुण्य अनुक्रमें श्रीभीष्माचार्य महानुभाव व श्री-दत्तराज मराठे महानुभाव यांच्या पदरीं घातलें. तव्हां पासून महाराष्ट्र सर-स्वतीचे उपासक आश्चर्यचकित होऊन अहमहमिकेनें महानुभावीय वाङ्मयां-कडें धांव घेऊं लागले आहेत. सर्व उपासकांपैकीं सद्यः रा. रा. यशोनिधि यशवंत खुशाल देशपांडे एम्. ए. एल्. एल्. बी. उर्फ आप्पासाहेब हे प्रमुख असून यांनीं यवतमाळ येथें ' शारदाश्रम ' नांवाचा एक आश्रम स्थापिला आहे व यांत हे महानुभावीय वाङ्मयाची सेवा अहर्निश करीत आहेत. हें उभ्या महाराष्ट्रास केवळ विदितच नव्हे तर त्यानें आश्रमांतील ' महानुभावीय मराठी वाङ्मय ' आणि ' श्री ऋद्धिपूर वर्णन ' या दोन पुष्पांचा प्रत्यक्ष

अनुभवहि घेतला आहे. याच आश्रमाचा एक सदस्य आणि महानुभावीय वाङ्मयाचा सेवक या नात्यानें प्रस्तुत लेखकानें आश्रमास भेट ह्मणून 'फूल नाहीं फुलाची फकळी' या ह्मणी प्रमाणें श्रीचक्रधर चरित्र भूमिकापर ऐतिहासिक दृष्टि या नांवाचा एक निबंध समर्पण केला असे. सदर निबंधावर आश्रमाकडून 'पुरस्कार' पत्रिकाही मिळाली आहे. ती निबन्धाच्या आरंभी सादर असे.

कै० वि० ल० भावे यांनी आपल्या ग्रन्थांत श्रीचक्रधरस्वामींची जन्मभूमि भडोच, कारकीर्द श० १०७५ ते ११९४ आणि ज्ञाति सामवेदी ब्राह्मण प्रतिपादन केली होती. व कै० भाव्यांचेंच मत सन १९३१ च्या जानेवारी महिन्यापर्यंत प्रचलित होतें. पण फेब्रुवारी १९३१ मध्यें मुंबई येथें श्री. रा. केशवआप्पा पाध्ये यांनी 'हेमाद्रि उर्फ हेमाडपंत' नांवाचें एक पुस्तक छापलें. त्याच्या पृ० ३०२ वर लिहिलेल्या "श्रीचक्रधराच्या चरित्रांत ज्या विशालदेवांचा उल्लेख केला आहे, तो व वीरधवलाचा मुलगा विशालदेव हे एकच असावे, यांत शंका नाहीं" या वाक्यास पाहून अमृतसर (पंजाब) येथें महंत मुकुन्दराज आराध्य यांनी आपल्या 'श्रीचक्रधर चरित्र' ग्रन्थाच्या प्रस्तावनेंत, श्रीचक्रधरस्वामींची जन्मभूमि अनहिलवाडा (पट्टन), कारकीर्द श० ११३१ ते ११९६ आणि ज्ञाति सोळंकी वाघेल राजपूत ठरविली. महंतजीच्या मतानुसार प्रो. वि. भि. कोलते, एम्. ए. एल्. एल्. बी. (अमरावती) यांनीहि 'किंग एडवर्ड कॉलेज मॅगझीन्' (मार्च १९३२) मध्यें दिलेल्या 'महानुभाव पंथ व त्यांचें वाङ्मय' या लेखांत "चक्रधर हा स्वतः क्षत्रियांच्या सोळंकी कुळांत जन्मलेला होता" असें लिहिलें. याप्रमाणें श्रीचक्रधरस्वामींच्या स्थान, काळ आणि ज्ञाती विषयीं बरीच गडबड झालेली पाहून प्रस्तुत लेखकानें इतस्ततः भ्रमण करून महानुभाव पंथांतील महंतांकडून लीळाचरित्र ग्रन्थाच्या अनेक पोथ्या मिळविल्या. त्यांचें सूक्ष्मदृष्ट्या आमूलाग्र वाचन केलें. त्यांतील प्रत्येक अक्षराचा परामर्श घेतला. नंतर पंथांतील प्रमुख प्रमुख महंतांशीं विचार विनिमय केला.

तसेंच पंथाबाहेरील ऐतिहासिक ग्रन्थांकरितां अमरावती, यवतमाळ, नागपूर, पुणें इत्यादि ठिकाणीं हिंडून संस्कृत, मराठी, हिन्दी, इंग्रजी भाषेंतील ऐतिहासिक ग्रन्थ वाचून एक टिपण तयार केलें. रा. आपासाहेब, रा. भवाळकार, रा. नेने, रा. कोलते, रा. वा. ना. देशपांडे, रा. ग. ह. खरे आदि प्रसिद्ध संशोधकांस पंथांतील लीळाचरित्रादि ग्रन्थ व आपलें टिपण दाखवून त्यांजबरोबर विचार चर्चा करून सदर निबंध लिहिला आहे. यांत श्रीचक्रधरस्वामींच्या स्थान, काळ आणि ज्ञातीचा साधार निर्णय करून महंत मुकुन्दराज यांच्या निराधार कल्पनांचें सप्रमाण खंडन केलें आहे. जुलै, आगस्ट आणि सप्टेंबर, १९३२ च्या विविधज्ञान विस्तारांत सदर निबंधाचा कांहीं भाग छापून प्रसिद्ध झाला आहे. प्रस्तुत ग्रन्थाच्या वाचकांनाहि श्रीचक्रधरस्वामींच्या स्थान, काळ आणि ज्ञातीच्या यथार्थ स्वरूपाची अंशतः तरी जाणीव व्हावी या आशेनें सदर निबंधांतील उपयुक्त माहितीचा गोषवारा येथेंहि नमूद करीत आहे.

लीळाचरित्रांतील (१) "महादाइसीं पुसिलें : जी जी : प्रधानपुत्र कैसा जन्मला : सर्वज्ञें भणितलें : बाई : भरवसा क्षेत्री मल्लदेव राजा : तयासि भडऋषीचा शापु : भणौनि पुत्र नाहीं : त्याचा प्रधान विशाळदेव : तो सामग ब्राह्मण लाडदेशीचा : मग मल्लदेवरायें समै विशाळ देवासि राज्य दिधलें : पाल्कु पुत्र निरोविला : मग तो काळधर्मासि गेला : विशाळदेवासिही पुत्र नाहा : मग हरिपाळदेव बहुतां नवसियां जाला : प्रधानें वेदाविदांचानि वचनें पुत्राकारणें बहुत धर्म केले : परि पुत्र नव्हेचि : मग वारानशी निगाला : मार्गी अवधूतवेषें : श्रीदत्तात्रयप्रभु भेटले : त्यातें प्रधानें पुजिलें : पुत्राचें विनविलें : मग श्रीदत्तात्रयप्रभु प्रधानासि वरप्रदान दिधलें : तैसांचि प्रधानांचिये राणियेसि गर्भाधान जालें : श्रीदत्तात्रयप्रभुतें पुसोनि प्रधान आपुलेया नगरासि गेला : नवमास भरले : पुत्र जाला : मग मंगळ महोत्साह प्रवर्तलें ; वाद्यंत्राचि एकी घाइ लागली : प्रधानें पुत्रासि हरिपाळदेव ऐसें नांव ठेविलें : मग हरिपाळदेव थोर जाला : पढों घातला : तेणें चौसटिकळा

अभ्यासिलिया: तो महाप्रतापिया धीरवीर ऐसा जाला: त्याचा विग्रहो केला: तयासि वर्षे बात्तीस भरली: तंव सिंगण रायाचें कटक गुर्जरावरि चालिलें: जें रायेंविण प्रधानु राज्य करीत असे; तर तें राज्य घेयावें: म्हणौनि सिंगणें चाली केली: जगळदेवो: वीझदेवो: मायीदेवो हे पाठवीले: ते आइकौनि विशाळदेवें आपुलें सकळही बळदानें पाठवीले:........ सिंगणाचेनि दळें प्रधानाचें दळ भंगिलें: मग प्रधानपुत्रें कटकौवे आइती मांडिली:......प्रधानपुत्र सर्वदळें त्या कटकां टाकौनि गेला: मा जगळदेयासि वीझदेयासि युद्ध केलें: तें प्रधानपुत्रें भंगिलें: तो ठाणां वैसवीत येळापुर वेऱ्हीं आला: मग सिंगणें शिष्टाई केली:.........".

(२) सर्वज्ञें म्हणितलें: बाई: प्रधान कुमरासि पंचवीस वर्षें भरली: तंव परचक्र चालिलें: तें कांदि पडिली: मग प्रधानपुत्र गांवा आला: तिये समयीं भरवसा गुजरातें प्रधान कुमरासि सातपांच दीवस काही एकी सजा जाली होति:......तेणें तया प्रधान कुमराचे देह गेलें होतें: तें उठऊनि एणें स्वीकरिलें:.........विक्रम संवत्सरीं भाद्रपद मासीं शुक्लपक्षीं बीजेसि शुक्रवारीं एणें पुर स्वीकरिलें: .....तेथ एक वर्ष तीन मास क्रमलें: तद-नंतर तेथ कमळा राणियेसि गर्भाधान जालें: पुत्र जाला: तंव तेथ राज्य केलें: तया पुत्रा नांव महीपाळदेवो:.........".

(३) "मग रायाची ओळग विसर्जली: प्रधानां पाठवनी दीधली: मग राउळांतौनि प्रधान विशाळदेवो आले: तेहीं मर्दनाचियें अवसरीं माल्हाइसातें पुसिलें: हरिपाळदेवासि मर्दना (आंघोळी) जासी: माल्हाइसीं आयव सांघीतलें:".

(४) "(सर्वज्ञें म्हणितलें:)...मग एनें कमळनायकातें म्हणितलें नायका: एथ सकळही अंग हो: एथ एकु यासि जाति कुळ असे: हे लाव सामगु: ऐसी एणें आपुली शाखा सांघीतली:".

(५) "सर्वज्ञें म्हणितलें: पूर्वीं अवरदेशीं क्रीडतां एकवेळ हे वोरंगला गेले होते:...तिये वोरंगला नगरीचा रावो: तया नांव प्रतापरुद्र:" इत्यादि

वाक्यांचा व श्री. ग. ह. खरे यांनीं सन् १९३० मध्यें छापविलेल्या व श० ११५० मध्यें कोरलेल्या 'आंबे' येथील शिलालेखांतील "गुर्जर वरसीहाडि शिर: कमलमूलनालात्पाटनकर.....खोलेश्वर देवो विजयते"; "गुर्जरान् जर्जरीकृत्य संनिकृत्य शिर: क्षणात्। भृगुकच्छाधिपस्याब्धा स्ताम्भो येनाधिरोपितः ॥" या वाक्यांचा परामर्श केला असतां असा निष्कर्ष निघतो कीं, महानुभाव पंथ संस्थापक श्रीचक्रधरस्वामींनीं परकाया प्रवेश करून महाराष्ट्रांत अवतार कृत्य केलें. स्वामींनीं ज्या कायेंत प्रवेश केला होता ती काया हरिपाळदेव नांवाच्या सामवेदीलाड ब्राह्मणाची होती. हरिपाळ-देवाच्या बापाचें नांव विशाळदेव आणि मातेचें नाव माल्हनबाई होतें. विशाळदेव हे भडोच येथील मल्लदेव नांवाच्या राजाचे प्रधान होते. यांना बरींच वर्षें पुत्र नव्हता. पुत्र संतति होण्याकरितां यांनीं अगोदर पुष्कळ दान धर्म केले, पण पुत्रमुखदर्शनाचा सुयोग कांही केल्यानें येईना. शेवटीं तीर्थयात्राकरण्याकरितां वाराणशीस निघाला. वाटेंत दैवयोगानें अकस्मात् श्रीदत्तात्रेयप्रभूचें दर्शन घडलें. विशाळदेवांनीं यथाविधि प्रभूची पूजा केली. प्रभूच्या कृपाप्रसादानें श. १११६ मध्यें एक पुत्ररत्न प्राप्त झालें. या पुत्राचें नांव हरिपालदेव असें ठेविलें. अल्पवयांतच हरिपालदेवांनीं सर्वशास्त्रीं नैपुण्य आसादन केलें. यांचा विवाह कमलाबाई नांवाच्या एका कन्येशीं केला गेला. अग्रारीतीनें हे आपल्या संसारांत नांदूं लागले. भडोचचा राजा मल्लदेव यासही पुत्र नव्हता. त्यानें 'वडवा' येथून सिन्धुराजाचा बन्धु सीहाडि (सिंह) यास दत्तक पुत्र घेतला. परंतु घातक दैवांनीं या दत्तकाचें देखील सुख सोहळे राजास पाहूं दिले नाहीं. दत्तक लहान असतांच राजा मरण पावला. मरतां वेळीं राजानें आपला दत्तक पुत्र आणि राज्य प्रधान विशाळदेवांच्या हवालीं केलें. दत्तक योग्य होईपर्यंत राज्यकारभार प्रधान-विशाळदेवच चालवीत होते. भडोचचें राज्य सरहद्दीचे राज्य आहे. व तें यावेळीं प्रधानांकित आहे असें पाहून सिंघणानें श० ११३८ मध्यें भडोचवर स्वारी केली. यावेळीं सिंघण सैन्याचें आधिपत्य जगळदेव (जगदळदेव) वीझदेव (वीचिदेव) आणि मायीदेव यांजकडे होतें, हरिपाळदेवाची आयु

चरित्र ग्रंथाच्या एका पानाचा फोटो दिला आहे तो वाचण्याकरितां सुंदरीलिपीची किल्ली दिली आहे.

| सुंदरी. | नागरी. |
| --- | --- |
| अ— | अ |
| आ— | आ |
| उ— | इ |
| ऊ— | ई |
| इ— | उ |
| ई— | ऊ |
| ऌ— | ऋ |
| ॡ— | ॠ |
| ऋ— | ऌ |
| ॠ— | ॡ |
| अे— | ए |
| अै— | ऐ |
| ए— | ओ |
| ऐ— | औ |
| अं— | अं |
| अः— | अः |

| सुंदरी | नागरी. |
| --- | --- |
| न— | क |
| | |
| थ— | ख |
| ज— | ग |
| ह — | घ |
| ... | ... |
| झ— | च |
| ब— | छ |
| प— | ज |
| फ— | झ |
| ... | ... |
| ठ— | ट |
| ट— | ठ |
| ढ— | ड |
| ळ— | ढ |
| व— | ण |
| स— | त |
| छ— | थ |
| ग— | द |

| सुंदरी | नागरी |
| --- | --- |
| भ— | ध |
| ञ— | न |
| क— | प |
| घ— | फ |
| श— | ब |
| ध— | भ |
| व— | म |
| र— | य |
| य— | र |
| च— | ल |
| म— | व |
| द— | श |
| ल— | ष |
| त— | स |
| ण— | ह |
| ड-- | ळ |
| ज्ञ-- | क्ष |
| क्ष— | ज्ञ |

संकेत.

: ऽ : मग.
: ञे : आन.
: कि : पर.
: उ : बाई.
: ऽ। : तथा.
: पी : जीजी.
: वी : महदाइसीं.
: भे : भणितलें.
: भौ : भणौति.
: श्य : ब्राह्मण.
: त्मी : विनविलें.
: त्र्य : श्रीदत्तात्रेयप्रभु.
: त्र्यें : श्रीदत्तात्रेयप्रभुते.
: े : सर्वज्ञें भाणितलें.
: कु : पुसिलें.

२२ वर्षांची होती, दत्तकपुत्र सीहडि हा बाल्दशेंतच होता. विशाळदेवांनीं धैर्य न सोडतां सिंघण सैन्याशीं तोंड देण्यासाठीं आपलें सगळें सैन्य पाठविलें, पण सिंघणाच्या सैन्यानें विशाळदेवांच्या सैन्यास पळवून लावले. तेव्हां हरिपाळदेवांच्या अंगी वीरवृत्तीचा प्रादुर्भाव होऊन त्यांनीं पळत सुटलेल्या सैन्यास एकत्र केलें, व सिंघण सैन्यावर तुटून पडलें. जगळदेव आणि वीझदेव हे सामन्यांत उभे राहिले, पण हरिपाळदेवांच्या अतुल पराक्रमापुढें ते टिकूं शकले नाहीं. शेवटीं सळो कीं पळो होऊन त्यांना परत देवगिरीचाच आश्रय घ्यावा लागला. हरिपाळदेवांनीं ही एळापूरपर्यंत त्यांचा पाठलाग केला. सरते शेवटीं सिंघणास हरिपाळदेवांबरोबर तह करावा लागला. शांतीचीं दोन वर्षे गेल्यावर तिसऱ्या वर्षी अर्थात् श. ११४१ मध्यें हरिपाळदेव १५ वर्षांचे असतां सिंघणानें अनहिल्वाडचें राज्य घेण्याकरिकरितां पुन्हां मोहिम केली. या मोहिमेच्या वेळीं खोलेश्वर हा सिंघण सैन्याचा सेनापति होता. लवण प्रसाद आणि वीरधवल या पितापुत्रांचा आणि सिंघण सैन्याचा सामना भडोच जवळ झाला. हरिपाळदेवांनीं या मोहिमेंतहि भाग घेतला होता. त्यांच्या डाव्या भुवईवर बाणाचा व्रणहि झाला. रणांगणांतून सुरक्षित परत आल्यावर कांहीं दिवसांनीं त्यांना कांणीएक रुजा झाली. तिचें पर्यवसान त्यांच्या प्राणोत्क्रमणांत झालें. अंत्यसंस्कार करण्याकरितां त्यांचा देह स्मशानांत नेला.चितेवर ठेवून अग्नि लावावा इतक्यांत अचिन्त्यानन्तशक्ति भगवंतांनीं त्या मृतदेहांत प्रवेश करून सजीव भाव आणिले. ही अघटित घटना पाहून सर्व लोकांस मोठेंच कौतुक वाटलें. या दिवसाची नोंद लीलाचरित्र ग्रन्थांत “ विक्रमसंवत्सरीं भाद्रपदमासीं शुक्लपक्षीं बीजेसि शुक्रवारीं एणें पुर स्वीकरिलें : ” या वाक्यानें केलेली आहे. सिंघण कालीन विक्रम संवत्सर श० ११४२ मध्यें येत असल्यामुळें हाच वर्ष श्रीचक्रधर स्वामींचा उदय वर्ष होय असें गृहीत धरणें युक्तियुक्त आणि इतिहाससंगत आहे. परकायप्रवेशानंतर हरिपाळदेवांनीं (श्रीचक्रधर स्वामींनीं) दोन वर्षेपर्यंत भडोच येथें निवास केला. या दोन वर्षाच्या अवधींत हरिपाळदेवांपासून कमळाबाईस महीपाळदेव नांवाचा एक चिरायु मुलगा झाला.

त्यानंतर श० ११४४ मध्यें हरिपाळदेवांनीं आपलें अवतारकृत्य पूर्ण करण्याकरितां रामयात्रेच्या निमित्तानें गृहत्याग केला. यावेळीं भडोचचा राजा सीहडि हा जीवंत होता. नंतर श० ११५० च्या पूर्वी खोलेश्वराकडून सीहडीचा शिरच्छेद केला गेला. हरिपाळदेव रामटेक येथें न जातां ऋद्धिपूर येथें श्रीगोविन्दप्रभु नांवाच्या अवतारी पुरुषांच्या सन्निधीस गेले. श्रीगोविन्दप्रभूनीं हरिपाळदेवांस 'चक्रधर' या नांवानें आळविलें. श्रीगोविन्दप्रभूंपासून श्रीचक्रधरस्वामींनीं ज्ञानाचा स्वीकार करून सातपुडा पर्वतावर १२ वर्षेपर्यंत क्रीडा केली. त्याच पर्वतावर सालबर्डी येथें जवळ जवळ १३०० वर्षांपासून तप करीत असलेली भर्तृहरीची भावजय विक्रमादित्याची जाया मुक्ताबाई हिचीहि भेट स्वामीस झाली होती. नंतर आपल्या कार्यक्षेत्रभूत संपूर्ण महाराष्ट्राच्या परिस्थितीचें अवलोकन करीत करीत जवळ जवळ ३५ वर्षे घालविलीं. या ३५ वर्षांच्या अवधींतच लोणार येथें यादवराज कन्हरदेव आणि महादेवराव यांना स्वामींचें दर्शन घडलें. स्वामी वरंगल येथें असतां राजा प्रतापरुद्र ( रुद्रम्मा ) राज्य करीत होता. नंतर पैठण येथें संन्यासदीक्षा घेऊन ग्रंथस्थापनेचा पायंडा घातला. खऱ्या ईश्वरास भुलून जाऊन क्षुद्र देवीदेवतांच्या भक्तीच्या नांवाखर ऐहिक भोग-विलासांत मग्न झालेल्या जनतेस ईश्वराच्या अनन्य भक्तीचा मार्ग चोखाळण्यास लावला. शेवटीं पट्टशिष्य श्रीनागदेव यांस आचार्य पदावर प्रतिष्ठित करून श्रीचक्रधरस्वामींनीं श० ११९४ माघ वद्य चतुर्थी मंगळवारीं बद्रिकाश्रमास प्रयाण केलें.

लीलाचरित्र ग्रन्थाधारें वर दिलेल्या त्रोटक माहितीवरून स्पष्ट आहे कीं, श्रीचक्रधरस्वामींची जन्मभूमि भडोच होती, त्यांचा जन्म सामवेदी लाड ब्राह्मण कुळांत झाला होता, व त्यांचा विद्यमानकाळ श० ११४२ ते ११४९ होता. लीलाचरित्रांतील ग्रन्थांतील मुख्य मुद्याच्या मजकुराचें छायाचित्र व त्याच्या वाचनाकरितां लिपीची किल्लीहि येथें दिली आहे.

कै० भावे यांनीं लिहिलेला श्रीचक्रधरस्वामींचा आरंभकाळ शक १०७५ हा लीलाचरित्रांतील यादवराज सिंघण व त्याचे जगळदेव ( जगदळ-

देव ), वीझदेव ( बीचिदेष ) आणि मायीदेव या ऐतिहासिक व्यक्तींच्या उल्लेखावरून असंगत प्रतीत होतो. महंत मुकुन्दराज यांनीं 'श्रीचक्रधरचरित्र' ग्रन्थाच्या भूमिकेंत लिहिलेला स्वामींचा आरंभकाळ श० ११३१ हा निराधार असल्यामुळें चिन्त्य आहे. तसेंच महंतजींनीं, स्वामींची जन्मभूमि अनहिलवाड ( पट्टन ) आणि ज्ञाति सोळंकी वाघेल रजपूत होती, असें जें विधान केलें आहे तें केवळ श्री, केशव आप्पा पाध्ये यांच्या मताचा आश्रय घेऊन कल्पनेच्या वातावरणांत विहंगमवृत्तीचेंच अवलंबन केलें आहे. त्यांनीं आपल्या विधानास कोणताच ऐतिहासिक आधार दिला नाहीं. या ह्मणण्याचें याथातथ्य 'श्रीचक्रधर चरित्राची' भूमिका आणि प्रस्तुत लेख, ज्याचा "श्रीचक्रधर चरित्र—भूमिकापर ऐतिहासिकदृष्टि" हा निबंध वाचून पाहिला ह्मणजे सहज कळून येईल. जिज्ञासूंस 'निबंध' "शारदाश्रम—यवतमाळ येथून मोफत, व श्रीचक्रधर चरित्र' "श्रीकृष्ण संस्कृत विद्यालय—हरिपुर-( हजारा )" येथून २।। रुपयांस मिळेल.



# आप्पासाहेब व मनभट

—⋙✻⋘—

(ले:—श्री. यादव माधव काळे, बुलढाणा)

नागपूरचें राज्य जरी नांवाला इ. स. १८५३ पर्यंत चालूं होतें, तरी त्याचा खरोखर अंत इ. स. १८१८ मध्यें ज्या वेळेस आप्पासाहेब पदच्युत होऊन पळून गेला त्या वेळेसच झाला. या गोष्टीस शंभरांवर वर्षें होऊन गेलीं. सदहू गडबडीच्यावेळीं नागपुरास अनेक पक्ष उपपक्ष असून त्यांनीं एकमेकांच्या अंगावर जी धूळ उडविली, तिच्यामुळें त्यावेळच्या व्यक्तींचीं कृत्यें त्यांच्या वास्तविक स्वरूपाहून भिन्न अशीं दाखविलीं गेलीं. शंभर वर्षांनंतर ती धूळ आतां खालीं बसून तीं कृत्यें व त्या व्यक्ति आतां त्यांच्या वास्तविक स्वरूपांत दिसूं लागल्या आहेत, मात्र पूर्वग्रहरहित मनानें त्यावेळच्या इतिहासाकडे पाहिलें पाहिजे.

त्या वेळच्या व्यक्तींपैकीं लोकप्रवादानें ज्या पुरुषाचा मोठा अन्याय केला आहे, तो पुरुष म्हणजे मनभट हा होय. आप्पासाहेबासंबंधानेंहि लोकांच्या कल्पना अशाच चुकलेल्या आहेत, परंतु त्याविषयींचा विचार या लेखांत करण्याचा नसून, मनभट हा आप्पासाहेबाशीं स्वामिनिष्ठ होता कीं, त्यानें आप्पासाहेबांशीं बेइमानी केली एवढेंच दाखविण्याचा हेतु आहे.

दुसरा रघूजी राजा हा इ. स. १८१६ मध्यें मरण पावला त्यावेळेस त्यास एक पुत्र परसोजी ऊर्फ बाळासाहेब हा होता व रघूजीचा पुतण्या मुधोजी ऊर्फ आप्पासाहेब हाच काय तो दुसरा पुरुष भोसल्यांच्या घरांत होता. परसोजी हा जरी ३८ वर्षें वयाचा होता तरी राज्याचा कारभार चालविण्यास मुळींच लायक नव्हता. शरीरानें पंगु, डोळ्यांनीं आंधळा, व मनानें वेडा असा हा विचित्र पुतळा नागपूरच्या गादीवर बसला परंतु राज्यकारभार चालविण्यास अप्पासाहेबाशिवाय लायक मनुष्य कोणीहि नव्हता. अप्पासाहेब हा अगदीं तरुण वीसबावीस वर्षांचा व पाणीदार मनुष्य होता. वयाच्या मानानें त्यास अनुभव जरी कमी होता तरी चांगले मार्गदर्शक असते तर तो

चांगला राज्यकर्ता निघाला असता; परंतु ज्यांचेकडून त्यास चांगला उपदेश व मदत मिळावी ती सर्व मंडळी त्यांचे विरुद्ध पक्षास होती. दुसऱ्या रघूजीची बायको प्रसिद्ध बाकाबाई इनें आप्पासाहेबांचा पाडाव करून आपण कारभार करण्याचा निश्चय केला, व तिच्या वजनामुळें सर्व महत्वाची मंडळी तिच्या पक्षास मिळाली. परसोजीच्या शारीरिक व मानसिक स्थितीमुळें वास्तविक आप्पासाहेबांस गादी मिळावयास पाहिजे होती व तसें झालें असतें ह्मणजे पुढील सर्व संकट टळलें असतें; परंतु रघूजीनें मरतेवेळीं परसोजीसच गादीवर बसवावें व आप्पासाहेबानें कारभार करून परसोजीस सांभाळावें असेंहि सांगून ठेविलें होतें त्यामुळें सर्वांनी तीच गोष्ट घडवून आणिली व आप्पासाहेबानेंहि त्या गोष्टीस विरोध केला नाहीं.

बाकाबाईनें परसोजीस आपल्या ताब्यांत घेऊन मुख्य राजवाड्यांतून काढून नव्या हवेलींत ह्मणजे ज्यांत हल्लीं सिटी स्कूल आहे त्या वाड्यांत नेलें. परसोजीची सख्खी आई आधींच मरण पावली होती ह्मणून बाकाबाई हीच त्याच्या आईच्या जागीं होती. धर्माजी भोंसला ह्मणून भोंसल्यांचा एक दासीपुत्र होता त्याचेकडे सर्व खजिना व जवाहीर राहात असे, व एक कोट रुपयापर्यंत रोकड त्याचे ताब्यांत असे. तो बाकाबाईचा मुख्य हस्तक होता.

रघूजीचा भाचा गुजाबादादा गुजर हाहि मोठा कर्तबगार मनुष्य होता तोहि बाकाबाईच्या पक्षाचा होता. सिद्दिक अलीखान हा फौजेवरील मुख्य अधिकारी व चिटणीस वगैरे मुत्सद्दी हेहि बाकाबाईच्या पक्षास मिळाले. तसेंच बाकाबाईचें इंग्रज रेसिडेंटाकडेहि सूत होतें. त्यामुळें बाकाबाईचा पक्ष फार प्रबळ झाला.

आप्पासाहेबाचे पक्षास त्याची पूर्वीची स्नेहीमंडळीच फक्त होती. ती ह्मणजे रामचंद्र वाघ, मनभट उपाध्ये, व नागो त्र्यंबक हे होत. खुद्द आप्पासाहेबासंबंधानें लोकमत विशेष अनुकूल नव्हतें व त्याच्या वरील स्नेह्यांबद्दलहि गोष्ट तशीच होती. रामचंद्र वाघ हा मराठा गृहस्थ मोठा शूर

धाडशी म्हणून प्रसिद्ध होता, परंतु मोठ्या खोल बुद्धीचा व उलट्या काळ-जाचा होता. दुसरा मनभट उपाध्ये हा मोठा उलाढाली होता परंतु तो मुळींच लोकप्रिय नसून कोणाचाहि त्याच्यावर विश्वास नव्हता. त्याचे वडील आपलें उपाध्येपण सांभाळून कधीं कधीं राजकारणांतहि पडत असत. मनभटाचा चुलता कृष्णभट हा छत्तीसगडांत रतनपुर येथें बिंबाजी भोंसल्या जवळ कारभारी म्हणून होता, व बिंबाजीचें मृत्यूनंतर त्याची बायको आनंदीबाई इचाहि मुख्य कारभारी होता. आप्पासाहेबाचा तिसरा कारभारी नागोपंत हाहि नागपुरच्या मुत्सद्यांत मोडत असे; परंतु आप्पासाहेबाचे कारकिर्दीपर्यंत तो विशेष प्रसिद्धीस आला नाहीं.

आप्पासाहेब व त्याचे स्नेही यांनीं पाहिलें कीं, इंग्रज रेसिडेंटास आपल्या बाजूस वळविल्याशिवाय आपला पक्ष प्रबळ होणार नाहीं. नागपुरचे सर्व मुत्सद्दीहि इंग्रज रेसिडेंटाच्या कच्छपी लागलेले असून सर्व संस्थान आंतून पोखरलें गेलें होतें, म्हणून इंग्रज आपणांस अनुकूल झाल्यास हा सर्व विरोध जागचे जागीं जिरून जाईल हें स्पष्ट होतें; म्हणून इंग्रजांकडे संधान बांधण्याचा आप्पासाहेबानें निश्चय केला व तें काम नागोपंताकडे दिलें. यशवंतराव रामचंद्र या नांवाचा मनुष्य भोसल्यातर्फे रेसिडेंटाकडे वकील म्हणून होता. त्याचें मार्फत नागोपंतानें रेसिडेंटाकडे बोलणें सुरू केलें. यशवंतराव रामचंद्र हा जरी भोसल्यांचा नोकर होता तरी तो इंग्रजांस अनुकूल होता. इ. स. १८०३ चा प्रसिद्ध देवगांवचा तह याचे मध्यस्तीनें ठरला होता व भोंसल्यातर्फे त्या तहावर त्यानें सही केली होती. त्या कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून यशवंतरावास इंग्रजाकडून दरसाल २५००० रुपये पेन्शन मिळत होतें. त्यामुळें हा गृहस्थ इंग्रजांचा केवळ दास बनला होता.

रेसिडेंट मि. जांकिन्स यानें पाहिलें कीं, नागपूरचें राज्यांत आपला हात कायमचा शिरकविण्यास ही संधी चांगली आहे. इ. स. १८०३ पासून रघूजी भोंसल्याकडून सबसिडियरी तह करून घेउन इंग्रजी सैन्य नागपुरास आणून ठेवावें म्हणजे नागपुरचें राज्य आपल्या हातांत आलें, हा प्रयत्न

इंग्रजांतर्फे चालू होता. जेंकिन्सच्या पूर्वीचा रेसिडेंट एल्फिन्स्टन यानें व जेंकिन्सनें या कामाकरितां जंग जंग पछाडलें व रघूजीस अनेक वेळां अडवून त्यास बराच त्रास दिला; परंतु रघूजी हा जरी शूर नव्हता तरी चाणाक्ष मात्र होता. सबसिडियरी तह करून इंग्रजांचे लष्कर घरांत घेतलें ह्मणजे आपलें स्वातंत्र्य जाऊन आपण इंग्रजांचे ताबेदार बनणार ही गोष्ट त्यास कळून चुकली होती, ह्मणून त्यानें सबसिडियरी तह करण्याचें साफ नाकारिलें. तो तह करून घेण्याची आतां नामी संधी आली आहे हें पाहून रेसिडेंटानें यशवंतरावामार्फत आप्पासाहेबास कळविलें कीं, तुह्मी राजातर्फे इंग्रजांशीं सबसिडियरी तह करून घ्याल तर आह्मी तुह्मांस मदत करून तुमचा अमल बसवून देऊं. गरजवंतास अक्कल नाहीं या न्यायानें आप्पा-साहेबानें आपल्या मूर्ख सल्लागारांच्या सल्ल्यानें वरील गोष्ट कबूल केली.

इंग्रजांनीं आप्पासाहेबाचा पक्ष घेतला ही बातमी कळतांच बाकाबाईचे पक्षांतला एक एक मनुष्य मागें पाय घेऊं लागला व आतांपर्यंत तटस्थ असलेले लोक हळूहळू आप्पासाहेबाकडे येऊं लागले. फौजेवरील अधिकारी नबाबसिद्दिकअल्लीखान हा निव्वळ इंग्रजांचे बाजूचा होता. तो रेसिडेंटाचा कल पाहून आप्पासाहेबास मिळाला.

एवढी तयारी होतांच विरुद्ध पक्षापैकीं धर्माजी भोसले यास कैद करण्याचा आप्पासाहेबानें निश्चय केला. मसलतीचें बोलणें करण्याच्या निमित्तानें धर्माजीस अप्पासाहेबानें जुनें राजवाड्यांत बोलावून त्यास त्यानें एकदम कैद केलें. व नव्या हवेलीचे अरब पहारेकऱ्यांमध्यें फूट पाडून तो नवीन वाडा व खजिना आपल्या ताब्यांत घेतला. यानंतर ता. १८ एप्रील १८१६ रोजीं अप्पासाहेबानें परसोजीस मोठ्या समारंभानें नव हवेलींतून राजवाड्यांत आणिलें. परसोजीस पालखींत बसवून आपण परसोजीवर चवरी धरून पायीं चालत आला. नंतर त्यानें परसोजीस गादीवर बसविण्याचा मोठा समारंभ केला. इंग्रज रेसिडेंट व सर्व मुत्सद्दी व मानकरी यांस बोलावून त्यानें मोठा दरबार भरविला व सर्वांसमक्ष परसोजीस गादीवर बसविलें व त्याचें तोंडून

करें तरी 'आमच्या तर्फे सर्व कारभार करण्यास आम्हीं आप्पासाहेबास मुखत्यार नेमिलें आहे.' असें वदविलें. त्याप्रमाणें सर्व राज्यांतहि द्वाही फिरविण्यांत आली.

याप्रमाणें सर्व अधिकार हातीं येतांच अप्पासाहेबानें बाकाबाईच्या पक्षाच्या लोकांवर आग पाखडण्यास सुरवात केली. ता. ५-५-१८१६ रोजीं त्यानें धर्मोजी भोंसल्यास ठार मारविलें. चिटणिसांचा मुखत्यार नारायण यशवंत यास कैद करण्याचें त्यानें ठरविलें परंतु त्याजकडून सव्वालक्ष रुपये घेऊन त्यास सोडून दिलें. गणपतराव * तिखे नांवाचा फौजेवरील अधिकारी होता. त्यास जरब देऊन त्याचेकडून त्यानें गुजाबादादाच्या फौजेंत फोडाफोड केली व गुजाबादादासहि कैद करण्याचा प्रयत्न चालविला. आपणावर हल्ला होणार असें पाहून गुजाबादादा सर्व अधिकार सोडून देऊन आपल्या संरक्षणा. पुरतें अरबांचें लष्कर आपल्या वाड्याभोंवतीं ठेऊन बंदोबस्तानें राहिला. तेथेंहि भीति वाटूं लागली म्हणून तो गुजरांचा पुरातन कारभारी येसाजी रामचंद्र गुजर म्हणून होता. त्याचें घर अडचणींत होतें, तेथें जाऊन राहिला. शेवटीं इंग्रजांशिवाय कोणी आपलें रक्षण करणार नाहीं हें पाहून तो पळून रेसिडेंटास शरण गेला. रेसिडेंटानें त्यास कांहीं दिवस सिताबर्डीवर ठेऊन नंतर प्रयागास पाठवून दिलें. तेथें तो अप्पासाहेबाच्या कारकीर्दीच्या अखेर- पर्यंत होता, व नंतर इंग्रजांनीं त्यास परत आणून बाकाबाईबरोबर तिसऱ्या रघूजीचा कारभारी म्हणून नेमिलें.

**सबसिडियरी तह**

आप्पासाहेबाकडून आतां परसोजी तर्फे कारभारी म्हणून सबसिडियरी तह करून घेण्यास हरकत नाहीं हें पाहून रेसिडेंटानें वरील तह करून घेण्याची खटपट चालविली. त्यांत मध्यस्थ नारायण गोपाळ पंडितजी व नागोपंत हे होते. नागोपंताचें घर भुत्यादरवाजाकडे एका अडचणीच्या जागीं होतें. तेथें

---

* याचे पूर्वज चंद्रपुरास मुधोजीचे कारभारी होते. वंशज सीताबर्डी- वर आहेत.

रात्रीं उभय पक्षांच्या भेटी होऊं लागल्या व सर्व शर्ती पक्या होऊन ता. २८–५–१८१६ रोजीं रात्रीं नागोपंताचे रेसिडेंट मि. जेन्कीन्स व साऊथबी नांवाचा एक लष्करी अमलदार हे येऊन तेथें आप्पासाहेब व रेसिडेंट यांच्या तहनाम्यावर सह्या झाल्या. या तहानें असें ठरलें की, इंग्रजांनीं नागपुरच्या राज्याच्या रक्षणासाठीं पायदळाच्या सहा पलटणी व घोडस्वारांची एक पलटण व त्या मानानें तोफखाना इतकें लष्कर नागपुर राज्याच्या हद्दींत ठेवावें, त्याच्या पगाराच्या खर्चा करितां राजानें दरसाल साडेसात लक्ष रुपये द्यावे. रुपये न दिल्यास इंग्रज सरकार मागतील तो त्या उत्पन्नचा मुलूख तोडून घ्यावा. या शिवाय राजानेंहि तीन हजार स्वार व दोन हजार पायदळ कंटिंजंट फौज म्हणून ठेवावें व त्याजवर देखरेख रेसिडेंटाची रहावी. परराज्याशीं राजकारण करूं नये व इंग्रजांशीं व त्यांच्या दोस्तांशीं लढाई करूं नये ह्या महत्वाच्या शर्ती अर्थात होत्याच.

ह्या तहाची वाटाघाट इतकी गुप्त रीतीनें चालली होती कीं, तहनाम्यावर सही झाल्यावरसुद्धां ही गोष्ट कोणासही कळली नाहीं. रेसिडेंटानें एलिचपुराहून जनरल डव्हटन यास सैन्यासह नागपुरास बोलाविलें. ज. डव्हटन हा ता. १-६-१६ रोजीं निघून ता. १८-५-१६ रोजीं नागपुरास आला. इंग्रजी लष्कर जवळ आलें असें पाहतांच ता. ९-६-१६ रोजीं हा तह शहरांत सार्वजनिक रीतीनें जाहीर करण्यांत आला. इंग्रजी सैन्य नर्मदेच्या कांठीं कोठेंतरी ठेवावें असें रहिल्यानें ठरलें होतें, परंतु भित्र्या आप्पासाहेबास तें नागपुरास पाहिजे होतें, म्हणून आप्पासाहेबाच्या सांगण्यावरून दोन पलटणी नागपुर शहरांत पाहऱ्यावर राहिल्या व एक पलटण तेलंगखेडीवर ठेविली, व बाकीच्या पलटणी नागपुरच्या जवळच कळमेश्वर येथें ठेविल्या. सबसिडियरी तहाची बातमी जाहीर होतांच आप्पासाहेबाच्या विरुद्ध पक्षास ज्यास्तच जोर आला. दुसऱ्या रघोजीनें युक्तीप्रयुक्तीनें जो तह करण्याचें टाळून नागपुरचें स्वातंत्र्य कायम ठेविलें तें आप्पासाहेबानें केवळ आपल्या स्वार्थाकरितां हा तह करून

गमविलें, ही गोष्ट कोणासहि स्पष्ट दिसण्याजोगी होती. त्यामुळें सर्वच लोक आप्पासाहेबाविरुद्ध उलटले परंतु ते सर्व निर्बल होते, व इंग्रजांची फौज दाखल होऊन सर्व नागपुर शहर त्यांच्या ताब्यांत आलें होतें. तरीही आप्पासाहेबास राजवाड्यांत राहण्याची हिम्मत होईना. म्हणून तो तेलंगखेडीस जाऊन राहूं लागला.

या तहानें आप्पासाहेब व त्यांचे सल्लागार यांचे तोंडास काळिमा लागला आहे. राघोबादादा व बाजीराव पेशवे याप्रमाणेंच आप्पासाहेबानें आपल्या राज्याच्या मोठा घात केला व शेवटीं बाजीरावाप्रमाणें त्याचाहि स्वार्थ साधला नाहीं तो नाहींच.

नारायण गोपाळ पंडितजी,* यशवंतराव रामचंद्र व नागोपंत या तिघांनी हा तह घडून आणण्याचे कामीं फार खटपट केली, यामुळें त्यांच्या या कामगिरीबद्दल इंग्रजाकडून नारायण पंडितास दरसाल २५००० व नागोपंतास दरसाल १५००० रुपये पेनशन मिळालें. यशवंतराव रामचंद्र यास पूर्वीपासूनच पेनशन मिळत होतें. याप्रमाणें या अदूरदर्शी व देशद्रोही मुत्सद्यांनीं नागपूरचें स्वातंत्र्य विकण्यास आप्पासाहेबास मदत केली. नागोपंतास कृतकर्मांची फळें लवकरच भोगावीं लागलीं व यशवंतराव रामचंद्र याचेंहि घराणें जवळ जवळ नामशेष झालें आहे. नारायण पंडिताचे वंशज मात्र आपल्या वडिलाच्या कामगिरीची गोड फळें अद्याप अनुभवीत आहेत.

आप्पासाहेबाच्या विरुद्ध पक्षांत बाकाबाई व राजाचे इतर आप्त होते त्यांनाहि वरील गोष्टी बद्दल बराच दोष दिला पाहिजे. आप्पासाहेबास इंग्रजाच्या दाढेंत नेऊन सोडण्यांत बाकाबाई हीच बऱ्याच अंशीं कारणीभूत झाली. आपल्या हातांत राज्याचा सर्व कारभार यावा या स्वार्थी बुद्धीनें तिनें आप्पासाहेबाशीं द्रोह सुरू केला. आप्पासाहेब हा वीस बावीस वर्षांचा

---

* याचें घर शुक्रवारा तलावाच्या काठाजवळ असून तेथें एक खाजगी शाळा आहे. वंशज धंतोलीवर राहतात.

अल्पवयी व विनअनुभवी पोर असून त्याचे सल्लागारहि उथळ वृत्तीचे होते. उलट बाकाबाई व तिचे पक्षाची मंडळी हीं पोक्त व अनुभवी असून त्यांनीं आप्पासाहेबास वळवून व त्यास मदत करून करून राज्यकारभार चालविला असता तर आप्पासाहेब इंग्रजांच्या जबड्यांत सांपडला नसता. पण देशभक्ति हा गुण त्यावेळीं लहान मोठ्या सर्वांतूनच लुप्त झालेला होता. व इंग्रजांच्या स्वतःच्या देशभक्तीपुढें व पैशाच्या माऱ्यापुढें आमच्या लोकांचें इमान तेव्हांच भ्रष्ट झालें. वरील तह घडवून आणण्याकरितां किती प्रयत्न करावे लागले, पैशाचा किती मारा करावा लागला व त्यापासून इंग्रजांचा किती मोठा फायदा झाला याचें वर्णन इंग्रजी लेखांत सांपडते.

**परसोजीचा मृत्यु ता. १-२-१८१७**

यानंतर ता. १-२-१८१७ रोजीं सकाळीं परसोजी हा बिछान्यांतच मेलेला सांपडला. आप्पासाहेब हा त्यावेळेस नागपुरास नसून चंद्रपुरास गेला होता, तरीसुद्धां त्यानेंच परसोजीचा खून करविला अशी सर्व लोकांची समजूत झाली. या गोष्टीस प्रत्यक्ष पुरावा जरी नव्हता तरी वरील गोष्ट बरीच संभवनीय असल्यामुळें सर्व लोकांची अशी प्रामाणिक समजूत झाली. बाकाबाईचा पक्ष राजवाड्यांत अद्याप प्रबळ असल्यामुळें ती परसोजीस दत्तक देववून आपला गादीवरचा हक्क नष्ट करील अशी आप्पासाहेबास भीति होतीच. याकरितां वरील तहाचे वेळेसच आप्पासाहेबानें रेसिडेंटामार्फत गव्हर्नर जनरल यास लिहून त्याचेंकडून ठरवून घेतलें होतें कीं, परसोजी हा वेडा असल्यामुळें दत्तक घेण्यास जी समजूत व इच्छाशक्ति पाहिजे ती त्याचे अंगीं नसल्यामुळें त्यानें दत्तक घेतल्यास तो कायदेशीर होणार नाहीं. वरील बंदोबस्त केला असतानांहि परसोजीचा कांटा मार्गांतून दूर झाल्यास आपणांस एकदम गादी मिळेल व सर्वच भानगड मिटेल, असें वाटणें स्वाभाविक होतें व आपणावर संशय येऊ नये म्हणून आपण दूर जाऊन आपल्या हस्तकांकरवीं वरील गोष्ट घडवून आणणें हेंहि कठीण नव्हतें.

परसोजीच्या मृत्यूचें वर्तमान समजतांच आप्पासाहेब हा ताबडतोब चंद्रपुराहून नागपुरास आला. भोंसल घराण्यांत कोणीहि पुरुष न राहिल्यामुळें व इंग्रजांची पूर्ण मदत असल्या मुळें आप्पासाहेबास कांहीं अडचणी न येतां तो गादीवर बसला. गादीवर बसण्याचा समारंभ ता. २१ ४ १८१७ रोजीं झाला.

**आप्पासाहेब गादीवर बसले २१-४-१८१७**

यानंतर लवकरच आप्पासाहेबाचा व इंग्रजांचा बिघाड होऊन सीताबरडीची लढाई झाली. हा बिघाड होण्याचीं कारणें अनेक आहेत, परंतु तीं सांगण्याचें हें स्थळ नव्हे. एवढें मात्र खरें कीं सीताबरडीचे लढाईंत जर कोणीं इमानानें लढलें असेल तर मनभट व त्याचे हाताखालचे आरबांचें लष्कर हें होय. बाकीचें सैन्य निव्वळ तमाशाच पहात होतें असें म्हटलें तरी चालेल. सीताबरडीच्या लढाईनंतरहि इंग्रज सैन्यास कुमक येऊन मिळण्यापूर्वीं आप्पासाहेबानें आपल्या बाकीच्या सैन्यासह इंग्रजांवर पुन्हा हल्ला केला असतां तरीहि तो यशस्वी झाला असतां असें त्या वेळच्या इंग्रजांनीं लिहून ठेविलेलें आहे, परंतु आप्पासाहेब हा अत्यंत भित्रा व घरसोडीच्या वृत्तीचा मनुष्य असल्यामुळें तो लढाईचे ठिकाणीं गेला सुद्धां नाहीं. व सक्करदऱ्यावर राहून सिताबरडीच्या लढाईंत पिछेहाट होतांच घाबरून जाऊन त्यानें मित्रपणानें रेसिडेंटास निरोप पाठविला कीं, माझे परवानगीशिवायच लष्करानें लढाई सुरू केली; त्यांत माझें अंग नाहीं व लष्कर माझें ऐकत नाहीं. हें म्हणणें अर्थातच खोटें होतें; परंतु या भित्र्या स्वभावाचा फायदा घेण्याकरितां रेसिडेंटानें उलट निरोप पाठविला कीं, असें जर आहे तर तुम्ही आमच्या छावणींत निघून या म्हणजे आम्हीं तुमच्या लष्कराची खोड मोडतों. हें उत्तर ऐकतांच आप्पासाहेबाची त्रेधा उडाली. न जावें तर आपण पाठविलेला निरोप खोटा पडतो, जावें तर आपण आयतेंच इंग्रजांच्या हातांत सांपडतों. लष्करांतहि फितूर झाल्याचा संशय बळावत चालला होता. इंग्रजांच्या मदतीस येणारें लष्कर नागपुरास येऊन पोंहोचलें होतें. इंग्रजांकडून निरोप घेऊन येणारे वकील व इंग्रजांस फितूर झालेले राजाचे मुत्सद्दी त्यास जाण्याची सल्ला देत. उलटपक्षीं इतर लोक

आप्पासाहेबानें स्वतः जाऊं नये असें सांगत. जाण्याबद्दल आप्पासाहेबाचें मन वळविणारे मुख्य गृहस्थ दोन, पहिला म्हणजे नारायण गोपाळ पंडितजी हा होय. तो राजातर्फे रेसिडेंटाकडे वकील असल्यामुळें रेसिडेंटानें त्याचे हातानें आप्पासाहेबास आपल्या शर्ती कळविल्या त्या अशा कीं, आप्पासाहेबानें इंग्रजांचे छावणींत येऊन रहावें म्हणजे इंग्रज त्याच्या लष्कराचा बंदोबस्त करून त्याचें राज्य त्यास परत देतील. फक्त सबसिडियरी सैन्याच्या खर्चाकरितां जरूर तेवढ्या उत्पन्नाचा मुलूख इंग्रज सरकार आपल्या ताब्यांत घेईल व पुन्हां राजास इंग्रजाशीं लढाई करतां येऊं नये याकरितां राजाचे अंतर्गत कारभारांतहि इंग्रज जरूरी पुरता अधिकार ठेवितील. याशिवाय जास्त कडक शर्ती घालण्यांत येणार नाहींत.

इंग्रजी लष्कर नागपुरास येईपर्यंत रेसिडेंटानें थोडी ढिलाई ठेविली, परंतु चोहोंकडून इंग्रजी सैन्य नागपुरास येतांच त्यानें आपलें उग्र स्वरूप प्रगट केलें. व ता. १५ डिसेंबर १८१७ रोजीं सकाळीं नारायण पंडिताबरोबर वरील शर्ती कळविल्या. त्याचें उत्तर दुसरे दिवशींच्या सकाळपर्यंत मागविलें. न आल्यास आपण हल्ला करूं असेंहि त्यानें सुचविलें व तशी तयारीहि केली. आप्पासाहेबानें उत्तर देण्यास तीन दिवसांची मुदत मागितली पण रेसिडेंटानें तीन तासांची मुदत दिली. राजानें स्वतः रेसिडेंटाची भेट घेण्याची परवानगी मागितली परंतु रेसिडेंटानें तीहि दिली नाहीं.

रामचंद्र वाघ, मनभट व गणपतराव सुभेदार हे तिघे जण मात्र रेसिडेंटाच्या शर्ती आप्पासाहेबानें कबूल करूं नयेत व एक वेळ पुन्हां लढाई द्यावी असा आग्रह करीत होते, व आप्पासाहेबानें रेसिडेंटाच्या ताब्यांत जाऊं नये असें त्यास सांगत होते. वरील त्रिवर्गांनीं ता. १५ चे रात्रीं सर्व सरदारांस बोलवून लढाईची तयारी केली. त्याच प्रमाणें इंग्रजांकडील ज० डव्हटन यानेंहि रात्रीं तयारी करून दुसरे दिवशीं सकाळीं हल्ला करण्याचें ठरविलें.

नारायण पंडिताप्रमाणेंच सिद्दिक अल्लीखान हा लष्करी अधिकारीहि आप्पासाहेबाचें मन इंग्रजांशीं सल्ला करण्यासंबंधानें वळवीत होता, पण

इतर सर्वजण राजानें रेसिडेंटाचें छावणींत जाऊं नये व एकदां लढाई द्यावी असा आप्पासाहेबास आग्रह करीत होते परंतु तसें करण्यास आप्पासाहेबास धैर्य होईना. नारायण पंडित हा इंग्रजांच्या लष्कराविषयीं व तयारी विषयीं फुगवून वर्णन करून आप्पासाहेबाची हिम्मत खचवीत होता इतक्यांत ता. १६ ची सकाळ होऊन रेसिडेंटानें वाढविलेली फक्त तीन तासांची मुदत राहिली व ज. डव्हटन याचें लष्कर सीताबरडीहून शहराकडेस येण्यास निघालेंहि. इतक्यांत रेसिडेंटानें राजावर अखेरचा एक प्रयोग करण्याचें ठरविलें. रेसिडेंटाचे पदरीं विनायक* आनंदराव औरंगाबादकर व गुंडो+ लक्ष्मण या नांवाचे दोघे ब्राह्मण नौकरीस होते. त्या दोघांना रेसिडेंटानें राजाकडेस पाठविलें व त्यांना राजास इनाम देऊन वचन देण्यास सांगितलें कीं, 'तूं आमचे स्वाधीन झाल्यास आह्मी तुला दगा करणार नाहीं. तुला कैदहि करणार नाहीं अगर तुझें राज्यहि घेणार नाहीं. तुझें लष्कर तुझें ऐकत नाहीं, त्याचा बंदोबस्त करून तुला पुन्हां गादीवर बसवूं. फक्त आमच्या लष्कराच्या खर्चापुर्ता मुलूख नर्मदेकडे घेऊं.' आप्पासाहेब फारच घाबरलेला होता. तीन तासांच्या मुदतींत तो रेसिडेंटाकडे न गेल्यामुळें ती मुदत संपतांच डव्हटन हा आपलें लष्कर व तोफखाना घेऊन शुक्रवार तळ्याच्या शहराकडच्या कांठास येऊन थांबला होता. सरदार, मुत्सद्दी व आप्त हे राजास इंग्रजाकडे जाऊं देईनात, परंतु आप्पासाहेबाची हिम्मत लागेना शेवटीं विनायकरावाकडून आपणास दगा होणार नाहीं असें वचन प्रमाण व शपथा घेऊन आप्पासाहेब कोणाचेंहि न ऐकतां ता. १६ च

---

* हा गृहस्थ जालना येथील राहणारा. १८०३ चे युद्धांत ज. वेलस्लीनें जालना शहर घेतलें तेव्हांपासून तो इंग्रजांच्या नोकरीस राहिला व नागपुरचे राज्याशीं तह होऊन नागपुरास रेसिडेंट राहूं लागला तेव्हांपासून तो नागपुरास रेसिडेन्सींत होता. याचे वंशज नागपुरास आहेत कीं नाहीं हें माहित नाहीं.

\+ याचे वंशज सीताबरडीवर दांडिगे आडनांवाचे असून सुशिक्षित आहेत.

सकाळीं ९ वाजतां विनायकरावाबरोबर सीताबरडीस जाऊन रेसिडेंटाचे स्वाधीन झाला. राजा रेसिडेंटाकडे गेला हें कळतांच डव्हटन यानें तळ्याचे काठींच मुक्काम केला.

' ब्राह्मणानें क्रिया करून दगा केला ' असें कांहीं अलीकडील पोवाड्यांत व भाटांच्या गाण्यांत आपण ऐकतों तें वरील विनायकरावानें जें वचन दिलें त्यास अनुलक्षून आहे. तसेंच बापू नांवाच्या शाहिराच्या पोवाड्यांत मनभटानें इंग्रजांस फितूर होऊन राजास इंग्रजाकडे नेलें आहे असें ह्मटलें आहे परंतु ही गोष्ट अगदीं चुकीची आहे. रामचंद्र वाघ हा आप्पासाहेबाचा दुसरा स्नेही हाहि इंग्रजांस फितूर झाला होता असेंहि त्याच पोवाड्यांत ह्मटलें आहे परंतु तीहि गोष्ट चुकीची आहे. मनभट व रामचंद्र वाघ हे आरंभापासून अखेरपर्यंत इंग्रजांच्या विरुद्धच होते. हे दोघे व गणपतराव सुभेदार हे तिघे शेवटपर्यंत इंग्रजांशीं लढले व आप्पासाहेबाशीं इमानानें राहिले. त्यावरून पहिल्या दोघांना इंग्रजांनीं कैद केलें व गणपतराव सुभेदार पळून जाऊन बाजीराव पेशव्यास मिळाला. बाजीरावाचा मोड झाल्यानंतर त्यास इंग्रजांनीं कैद करून नगरच्या किल्यांत ठेविलें. मनभट व रामचंद्र वाघ हे इंग्रजांस फितूर असते तर ते इंग्रजाविरुद्ध लढले नसते व त्यांना इंग्रजांनीं कैद न करतां नारायण पंडित व यशवंतराव रामचंद्र यांच्या सारखें बक्षीस दिलें असतें. पूर्वीच्या बाजार गप्पावर सुमारें चाळीस वर्षांपूर्वी रचलेल्या अशिक्षित बापूशाहिराच्या पोवाड्यांत ऐतिहासिक सत्य मुळींच नाहीं. व इतर बाबतींतहि पदोपदीं चुकीच्या माहीतीनें भरलेल्याला हा पोवाडा अगदींच अविश्वसनीय आहे.

विनायकरावानें जें इमान दिलें त्याचा विपर्यास मनभटाच्या नांवावर केला आहे. शिवाय विनायकराव हा आप्पासाहेबाचा नोकर नसून रेसिडेंटाचा नोकर होता. व आपल्या धन्यानें सांगितल्याप्रमाणें त्यानें आप्पासाहेबास वचन दिलें, व रेसिडेंटानेंहि तें अक्षरशः पाळिलें. त्यानें पूर्वी दिलेल्या शर्तीवरच आप्पासाहेबास सोडून देऊन ता. ९ जानुअरी १८१८ रोजीं रेसिडेंटानें

आप्पासाहेबास राजवाड्यांत आणून पुन्हा गादीवर बसविलें. यांत विनायक-रावाचा किंवा रेसिडेंटाचा वचनभंग मुळींच झाला नाहीं. उलट आप्पा-साहेबास पुन्हां गादीवर बसवावें ही गोष्ट गव्हर्नरजनरलानें नापसंत करून त्याच वेळीं सव राज्य घ्यावें असा हुकूम सोडला होता, परंतु रेसिडेंट जेंकिन्स यानें पुन्हां लिहिलें कीं, आप्पासाहेब आमच्या स्वाधीन होण्यापूर्वी आमचें त्यास वचन गेलें आहे. व तें पाळलें पाहिजे असा त्यानें आग्रह धरला. त्यामुळें ग. ज. नें पहिला हुकूम फिरवून रेसिडेंटाचें म्हणणें मान्य केलें. या प्रमाणें विनायकरावाच्या शपथेंतहि खरोखर भंग झाला नाहीं. यानंतर बरेंच दिवसांनीं आप्पासाहेबास इंग्रजांनीं लष्कर पाठवून राजवाड्यांतच कैद करून रेसिडेन्सींत आणिलें व प्रयागाकडेस पाठविलें. परंतु यावेळेस आप्पासाहेब हा स्वखुशीनें इंग्रजांकडे गेला नव्हता व कोणीहि फितूर होऊन त्याचें मन वळविण्याचाहि प्रसंग पडला नव्हता.

आप्पासाहेब रेसिडेंटाकडेस गेल्यावर रेसिडेंटानें त्याचेकडून त्याच्या लष्करास हुकूम घेतला कीं, सर्व तोफखाना व दारूगोळा डव्हटन याचे ताब्यांत द्यावा. इंग्रजांचे लष्करास कोठेंहि अडवूं नये. परंतु हा हुकूम राजानें नाइलाजानें दिला असला पाहिजे हें ओळखून मनभटानें आपल्या हाता-खालच्या अरब लष्करासह शुक्रवार दरवाजाच्या आंतील राजवाडा वगैरे सर्व भाग आपल्या ताब्यांत घेऊन ता. १६ डिसेंबरपासून ता. ३० पर्यंत इंग्रजांच्या हल्ल्यास तोंड देऊन व वारंवार ते हल्ले हटवून टिकाव धरला. तसेंच रामचंद्र वाघ व गणपतराव सुभेदार यांनीं सक्करदऱ्याच्या मैदानांत इंग्रजांशी लढाइ दिली. परंतु त्यांचा मोड झाला. इंग्रजांच्या तोफा हलक्या असल्यामुळें शुक्रवार दरवाजा फुटेना व दरवाजाच्या बाहेरच्या सर्व इमार-तींतून व दरवाजाच्या दोन्ही बाजूंच्या तटबंदीवरून मनभटाच्या आरबांनीं बंदुका जेजाला यांचा मारा इंग्रजी लष्करावर चालू ठेविला. त्यामुळें तें लष्कर शुक्रवार दरवाजाच्या जवळ सुद्धां येऊं शकेना. शेवटीं तुळशीबागेकडून व भुत्या दरवाजाकडून हल्ला करून आंत शिरण्याचा इंग्रजांनीं प्रयत्न केला, परंतु आरबांनीं त्यांना आंत येऊं दिलें नाहीं. इंग्रजांजवळ लांब पल्याच्या

तोफा नसल्यामुळें त्यांनीं आकोल्याहून मोठ्या तोफा मागविल्या परंतु त्या येईपर्यंत रेसिडेंटास वेळ गमाविणें योग्य वाटलें नाहीं म्हणून त्यानें आरब-लोकांस पैशाचा लालूच दाखवून फोडण्याचा प्रयत्न केला, व त्यांच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें तो यशस्वी झाला. रेसिडेंटानें सिद्दिक अलीखान याच्या मार्फतीनें आरबांचा मुख्य पीरजादा याच्याशीं बोलणें लाविलें कीं, 'राजा आमच्या ताब्यांत असतां व शहर खालीं करून देण्याचा त्याचा हुकूम असतां तुह्मी मनभटाचें काय ऐकतां? तुमच्या पगाराची थकलेली बाकी आह्मी देऊं. तुह्मास पुढें पगार तरी मनभट कोठून देणार? आरबलोक जाणून बुजून भाडोत्री त्यांनीं थकलेला पगार व आणखी ५०००० रुपये वर घेऊन शहर सोडण्याचें कबूल केलें व ता. ३० रोजीं दुपारीं बारा वाजतां ठरलेली हुकूम घेऊन सर्व आरब भुत्या दरवाजानें शहराबाहेर निघून गेले. शुक्रवार दरवाजा त्यांनीं उघडून दिला व इंग्रजी लष्कर त्या दरवाजानें बिनहरकत आंत शिरून त्यांनीं सर्व राजवाडा आपल्या ताब्यांत घेतला, व शहरभर पाहरे बसवून दुपारी अडीच वाजतां एका इंग्रज अधिकाऱ्यानें राज-वाड्यावर इंग्रजांचें निशाण लाविलें व त्यास २१ तोफांची सलामी दिली. आरब सैन्य जातांच इंग्रजांनीं मनभटास कैद केलें व तो पुढें मरेपर्यंत कैदेतच होता.

राजवाड्यावर इंग्रजांचें निशाण लागतांच नागपूरचे सर्व सरदार, मान-करी व मुत्सद्दी रेसिडेन्सींत जाऊन त्यांनीं रेसिडेन्टास सलामी दिली. ग. ज-याजकडून जसा हुकूम येईल तशी पुढें राज्याची व्यवस्था होईल असें रेसि-डेन्टानें सर्वांना सांगितलें.

यानंतर बाजीराव पेशव्याशीं आप्पासाहेबाचा पत्रव्यवहार धरला गेला. तसेंच बाजीराव पेशवा पुण्याहून पळून वऱ्हाडांत पांढरकवड्यापर्यंत आला. व चंद्रपुरास जाऊन नागपुरास येण्याचा त्याचा बेत दिसूं लागला. आप्पासाहेब हे हि आतां इंग्रजांच्या विरुद्ध उलटला होता व आपणांस प्राप्त झालेलें पारतंत्र्य त्यास दुःसह होऊं लागलें. शहरांत व प्रांतभर इंग्रजांचा लष्करी अमल सुरू

झाला एवढेंच नव्हे तर राजवाड्यावरहि इंग्रजांचा पाहरा बसला. त्यामुळें तो अगदीं बिथरून गेला. रेसिडेंटास सर्व गुप्त बातमी कळतच होत्या. बाजीराव चंद्रपुर व नागपूर या रोखानें वर्धा नदीजवळ आला व आप्पासाहेब त्यास मिळाल्यास आपणांस अवघड जाईल हें समजतांच ता. १५ मार्च १८१८ रोजीं सकाळीं कॅ. ब्राऊन हा रेसिडेंटाच्या हुकूमानें दोन बंगाली कंपन्या घेऊन राजवाड्यांत शिरला. आप्पासाहेब राजवाड्याच्या आंतील भागांत राणीवशांत जाऊन लपून बसला. ब्राऊन हा स्वतः आंतील खोल्यांत शिरला व त्यानें आप्पासाहेबास हातानें धरून बाहेर ओढलें व कैद करून रेसिडेन्सींत घेऊन रेसिडेंटाचे स्वाधीन केलें. रेसिडेंटानें आप्पासाहेबाचे दोस्त रामचंद्र वाघ व नागोपंत यांसहि कैद केलें. आप्पासाहेबास कैद करतांना कोणीहि प्रतिकार केला नाहीं व जनानखान्यांतील बायकांच्या नखांच्या ओरखंड्याशिवाय ज्यास्त दुखापत कॅ. ब्राऊन यास झाली नाहीं. शहरांत अगर प्रांतांत कोठेंहि हूं कां चूं झाली नाहीं. हा सर्व सबसिडियरी तहाचा परिणाम.

आप्पासाहेब, रामचंद्र वाघ व नागोपंत या त्रिवर्गास प्रयागास पाठविलें, परंतु ता. १३–५–१८१८ रोजीं पहाटचे रात्रीं जबलपुराचे अलिकडेस रायचूर येथें आप्पासाहेबानें पाहरेकऱ्यांस वश करून घेऊन त्यांचे कपडे अंगावर घालून पाहरे बदलण्याचे वेळीं पहारेकरी गार्डाबरोबर त्यांच्यांत मिसळून लेफ्ट्, राईट करीत कूच केलें. मागें पलंगावर लांब उशीवर पांघरूण घालून आप्पासाहेब निजला आहे असें दाखविलें व मागें ठेविलेल्या एका नोकराकडून आप्पासाहेब आजारी आहे त्यास उठवूं नका असेंहि सोंग केलें. रामचंद्र वाघ व नागोपंत हे कैदेंतच राहिले. आप्पासाहेब सुटून गेल्यावर त्यानें पंजाब व हिमालयापर्यंत पलायन करून इंग्रज सैन्यास कसें चकविलें ही माहिती फार मनोरंजक आहे. परंतु तिचें सविस्तर वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे. शेवटीं आप्पासाहेब हा पकडला जाऊन जोधपुरास ता. १५–७–१८४० रोजीं वयाचें ४५ वर्षी मरण पावला. जोधपूरच्या राजानें स्वतः हमी घेऊन त्यास आपल्या नजर कैदेंत ठेविलें व मोठ्या इतमामानें वागविलें.

वरील वर्णन इंग्रजी व मराठी कागद पत्रांवरून लिहिलेलें आहे. यावरून मनभट हा इंग्रजांस फितूर झाला होता व त्यानें स्वामिद्रोह केला हें ह्मणणें किती खोटें आहे हें दिसून येईल. तीनचार वर्षांपूर्वी नागपूरच्या एका पत्रांत अज्ञानानें मनभटाविरुद्ध लेख आले होते. मनभटामध्यें इतर दोष पुष्कळ असतील परंतु फितुरी अगर स्वामिद्रोह हा दोष त्याचे माथीं मारणें केवळ सत्याचा अपलाप होय. पोवाडे, दंतकथा अगर लोकप्रवाद हे विवेकबुद्धीच्या व कागदपत्रांच्या कसोटीस लाविल्याशिवाय त्यांतील गोष्टी इतिहास ग्रहण करू शकत नाहीं. तसेंच जातिमत्सर, व्यक्तिद्वेश, फाजील स्वाभिमान या गोष्टींपासूनहि अलिप्त राहिलें तरच सत्य उघडकीस येईल.

---

# जिजाऊचें माहेर अर्थात् सिंदखेड राजा

—×=—✱×✱—=×—

( लेः—द. वा. महाजन बी. ए )
नायब तहसीलदार, मेहकर.

ज्यांनीं पूर्व कालांत अनेक प्रकारच्या राजवैभवांचा उपयोग घेतला, स्वताच्या मर्दुमकीनें व धाडसानें आपलें नांव इतिहासांत चिरस्मरणीय केलें. ज्यांच्याकडे पाहून आपल्या शूर पूर्वजांची आठवण व्हावी व आजच्या निराशेच्या काळांतहि भवितव्यतेविषयीं आशा वाटून एक प्रकारचें स्फुरण यावें; सारांश पूर्वजांचें वैभव, पराक्रम व कीर्ति यांचीं प्रत्यक्ष स्मारकेंच वाटावींत अशीं जीं थोडी ऐतिहासिक व पुण्यवान स्थळें वऱ्हाडच्या वाटणीस आलीं त्यांत जाधवरावांच्या सिंदखेडचा प्रामुख्यानें समावेश होतो. छत्रपति शिवाजी महाराजासारख्या असामान्य राजपुरुषाचा इतिहासहि सिंदखेडच्या इतिहासावाचून अपुरा रहावा इतकें अपूर्व ऐतिहासिक महत्व सिंदखेडास प्राप्त झालें आहे.

राजमाता जिजाऊ हीचें नांव माहीत नाहीं असा मराठा मिळणें महाराष्ट्रांत तरी अशक्य. ह्याच जिजाऊचें माहेर हें सिंदखेड होय. हा पूर्वीचा महत्वाचा परगणा खरा पण आज त्याची लहान खेड्यांत गणना होते. अकबरच्या वेळेस व त्यानंतर बरींच वर्षे सिंदखेड मेहेकर सरकाराखालीं होतें. व आजहि त्याच तालुक्यांत असून तेथून बत्तीस मैलांवर आहे. सिंदखेडला जावयाचें झाल्यास देऊळगांवराजापर्यंत मोटारीनें व पुढें सहा मैल बैलगाडीनें जावें लागते.

सिंदखेडचें प्राचीन नांव आलापूर✱ होतें. तें बदलून सिंदखेड नांव कां पडलें याचीं खालील तीन कारणें सांगण्यांत येतात.

---

✱ जाधवरावांची अप्रसिद्ध अस्सल बखर. ही बखर श्री. या. मा. काळे यांनीं मला वाचावयास दिल्याबद्दल त्याचा साभार उल्लेख करणें जरूर आहे या बखरीच्या व कागदपत्रांच्या आधारें हा निबंध लिहिला आहे.

(१) सिंधुरम राजानें वसविल्यामुळें त्याला सिंदखेड म्हणतात असा सार्वत्रिक समज आहे. बखरकारहि " कदीम वस्ती आलापूर नंतर सिंदुराजा गौळी यानें अलिकडे सिंध-खेड वस्ती केली " असें स्पष्ट लिहितो.

**सिंदखेड नांव कां व कसें पडलें ?**

(२) दुसरें कारण असें कीं ह्या गांवीं अनेक संत, योगी व सिद्धपुरुष होऊन गेले असल्यामुळें या गांवचें नांव 'सिद्धपूर' व पुढें अपभ्रंशानें सिंदखेड झालें असावें. सिंदखेड येथील बरेचसे जुने कागदपत्र आमच्या पहाण्यांत आले असून त्यांत सिंदखेडचा उल्लेख 'सिद्धक्षेत्र' 'सिद्धपूर' ह्या नांवांनीं केला आहे यांत शंका नाहीं. या शिवाय शके १५०९ मध्यें येथील निळकंठेश्वराच्या देवळांत कोरलेल्या शिला* लेखांत 'परगणे शीधपूर' असा स्पष्ट उल्लेख आहे. त्याच प्रमाणें सिंदखेडचे सुप्रसिद्ध संतकवि गोसावी नंदन यांचा चरित्रकारहि " सिंदखेड स्थळ। सिध्दांचें केवळ ॥ देखोनी तात्काळ। वास+ केला ॥ असें या गांवचें वर्णन करतो.

(३) सिंदीच्या झाडावरून ह्या गांवाला सिंदखेड म्हणत असावें असाहि लोकांचा समज आहे. व हेंच बुलडाणा गॅझिटिअरकार व श्री. काळे यांनीं खरें मानलें आहे. पण स्थानिक चौकशी करून ह्या गांवीं सिंदीचीं झाडें कधींहि कोणी पाहिल्याचें सांगत नाहीं.

सिंदखेडचा प्राचीन इतिहास अद्यापि उपलब्ध नाहीं. मोंगलांच्या राजवटींत म्हणजे लुकजी जाधवराव सिंदखेडला आल्यापासूनच सिंदखेडच्या खऱ्या इतिहासास प्रारंभ झाला म्हटलें तरी चालेल. हा परगणा इ. स. १४५० सुमारास सिंदखेडच्या काजीला जागीर× म्हणून दिला होता. तो सरासरी एक शतकानंतर जाधव घराण्यांतील

**'इतिहास'**

---

* नीळकंठ देवळांतील शीला लेख

+ गोसावी नंदन यांचें अप्रसिद्ध ओवीबद्ध चरित्र

× Buldana Gazetter पान ४६५

पहिला प्रसिद्ध पुरुष लुकजी याला मिळाला. यमुनाबाईमुळे ईच्या आजेवा वरून लुकजीनें 'बंडखोर' व 'बेइमान' रविराव ढोण्यास ठार मारून सिंदखेडची देशमुखी मिळविली. "रविराव जातीचा मर्द खरा पण स्त्रीलंपट* होता." लुकजी व रविराव यांच्या द्वंद्वाचें मनोरंजक वर्णन बखरींत दिलें आहे तें विस्तार भयास्तव येथें देतां येत नाही. रविरावचा अस्त व पराक्रमी लुकजीचा विजय एकाच वेळीं झाला. रविरावचा कांटा आयताच निघून गेलेला पाहून गांवच्या लोकांस आनंद व्हावा यांत नवल नाहीं. सिंदखेडची बिघडलेली घडी पुन्हां जशीच्यातशी करण्यास लुकजीला बरेच श्रम व दिवस लागले. रवताकरितां त्यानें एक मोठी गढी व आंत दगडी महाल बांधला. हा महाल किती भव्य मजबूत होता हें त्याच्या अद्यापि असलेल्या अवशेषांवरून लक्षांत येतें. त्यानंतर कदमापूर, माननगर, वगैरे पेठा बांधून गांवचा विस्तार वाढविला व 'आंबराईची लावणी केली' पण लकुजीचें सर्व आयुष्य रणांगणावर पराक्रम गाजविण्यांत गेल्यामुळें शांततेच्या वेळांत करतां येणाऱ्या स्थानिक सुधारणा लुकजीला ह्या काळांत करतां येणें शक्य नव्हतें.

**'रावजगदेव'**

पण लुकजीनें आरंभिलेल्या कार्याची पूर्तता ह्याच घराण्यांतला दुसरा प्रसिद्ध पुरुष रावजगदेव यानें केली. अवघ्या पंधरासोळा वर्षांचा असतां कर्नाटकांतील वाघिणगीरा किल्ला सर करण्यांत यानें मोगलातर्फे जो पराक्रम केला तो खरोखरच अवर्णनीय आहे. रावजगदेव हा जसा शूर तसाच स्वाभिमानी, करारी, स्वधर्मपालक व मनाचा थोर होता. तो दिल्लीस असतां दिल्लीपतीनें हिंदूंना बाटविण्याचा सपाटा चालविलेला पाहून तो खुद्द पातशहाच्या जीवावर उठला. हा महत्वाचा प्रसंग बखरकारांच्याच शब्दांत देतों:— '...तों पातशहाची मर्जी हिंदु लोकावर एके दिवशीं बरम (?) झाली. हिंदु मुसलमान करावे. तें समयीं जैपूरकर राजे व राजे जगदेवराव एकत्र होऊन, तमाम दक्षिणी महाराष्ट्रमंडळ नाईक निंबाळकर, राजे घोरपडे, शिरके, मोहिते, माने

---

* जाधवरावांची बखर.

पाटणकर...आवग्र लोक एक होउन हाल्ला पातशाईपत केली. नेटापाटाचें उत्तर स्पष्ट देऊन...पातशहाशीं लढाईस उभे ठाकले. गई होण्याचा समय समजून पातशहांनी समेट केली." सिंदखेड जें एव्हढें भरभराटीस चढलें त्याचें बहुतेक सर्व श्रेय रावजगदेव यासच दिलें पाहिजे. त्यानें मुद्दाम जमीन विकत घेऊन तेथें तलाव बांधून त्यांत एक सुंदरसा बंगला बांधला 'नांव टाकून जलविहार करतां यावा, खेळतां यावें असें करून बागेचें नांव जगदेव ठेविलें" हाच तलाव सध्याचा चांदणी तलाव होय! रावजगदेव यानें 'नामजाद झाडें, मेवे, व आंबराई लाविली व ह्याकरतां चार लक्ष एवज खर्च केला." सिंदखेडच्या आंब्यांची जी आजहि प्रसिद्धि आहे ती सर्व झाडें याच जगदेवच्या वेळची होत. सिंदखेडला त्यावेळीं फारच गुरें असत. त्यांना पिण्याला मोकळे व मुबलक पाणी नव्हतें ह्मणून 'मोठा तलाव करून, दोन्हीकडून डोंगर व कराडें, मध्यंतरीं चार लक्ष रुपये लावून थोप बांधली. व नहर (नळ) किल्ल्यांत न्यावयाचा ह्मणून तळ्यांत तीन विहीरी करून त्याचें पाणी चवड्या विहीरीत आणून तेथून नळ चालविला. पाणी नेण्याचें ठिकाण गुप्त. व खजाणा ठेवण्याचें ठिकाण गुप्त. तळ्याच्या थोपेच्या तोंडाशीं कुंद व कडीविकर्डाच्या कोटड्या काढाडल्या.' सिंदखेड येथील मोठा तलाव व त्याच्या थोपेवर बांधलेला दगडी महाल फारच प्रेक्षणीय आहे. सिंदखेडला आजहि भूषणभूत असलेल्या रायबारव, बाळसमुद्र, गंगासागर वगैरे बारवा ह्याच रावजगदेवनें बांधल्या. सुप्रसिद्ध कालाकोट बांधण्याचें काम यानेंच सुरु केलें पण 'आधींच मऱ्हाटे तरवार बहाद्दर जबरदस्त, त्यास किल्ला जालीयावर बदलतील अशी कल्पना घेऊन पातशहानें तें काम बंद पाडलें. ह्या किल्ल्याचें वर्णन पुढें आलेंच आहे. जानफळ; पळसखेड व तुळजापूर येथील प्रख्यात गढ्या यानेंच बांधविल्या. हा सन १६११ सालीं मरण पावला.

**यशवंतराव व नाईकांचा उपद्रव**

रावजगदेव नंतर इतिहासांत नमूद करून ठेवण्याइकी महत्वाची कामगिरी यशवंतराव जाधव यानें केली. ह्यावेळीं सिंदखेड हें एक भरभराटीस चढलेलें गांव होतें. जाधवरावासारख्या अव्वल दर्जाच्या सरदाराचे वतनाचें

गांव असल्यामुळें त्याला जवळ जवळ राजधानीचेंच स्वरूप प्राप्त झालें होतें असें म्हटल्यास चालेल. येथील व्यापार फारच मोठा असून कासार व वाणी यांचे आज जे भव्य वाडे पहावयास मिळतात त्यावरूनहि त्यांच्या श्रीमंतीची कल्पना होते. पुण्यावरून नागपूरास जाणारा मोठा रस्ता म्हणजे नागपूर डाक लाईन हा सिंदखेड वरूनच जात असल्यामुळें त्याच्या व्यापारबुद्धीस मदत झाली. पण त्यावेळीं दळणवळणांचीं साधनें फारच कमी असल्यामुळें व्यापारी आपला सर्व माल बैलांच्या पाठीवरूनच वहात असत. श्रीमंत व्यापारी हजारो बैल आपल्या संग्रहीं ठेवीत असत. इ. स. १७१० च्या सुमारचा काळ हा वऱ्हाडच्या इतिहासांत अतिशय महत्वाचा आहे. कारण ह्यावेळीं दक्षिण वऱ्हाडांत 'नाईकांचा उपद्रव' सुरु झाला. उत्तर हिंदुस्थानांत पेंढारी त्याच प्रमाणें देश उध्वस्त करणारे नाईक वऱ्हाडांत निर्माण झाले. त्यांनीं मोठमोठीं गांवें जाळून तीं बेचिराख केलीं. व अनेक श्रीमंत कुटुंबें मातीस मिळविलीं. "उजाड झालेलीं गांवें आबाद होऊं शकलीं" पण नाइकांनीं कधींहि भरून न निघणारें असें कोणतें राष्ट्रीय नुकसान केलें असेल तर तें जुनें कागद पत्र व सनदा जाळून टाकण्याचें होय! ह्या नाईकासंबधीं अलीकडे पुष्कळच कागदपत्र आम्हांस मिळाले आहेत पण त्याचा एक स्वतंत्र निबंधच होईल. लुटारू नायकांचा उपद्रव कमी करण्याची यशस्वी खटपट यशवंतरावनें केली. अशा अनेक प्रसंगांपैकीं एका प्रसंगाचें वर्णन बखरकारानें केलें आहे तें असें:—" दोन हजार बैल किराणा वगैरे बाबत वाणी वंजारी वगैरे यांचे नाईकांनीं वळून नले म्हणोन श्रान करते समयीं श्रवण केले. तैशीच स्वारी तयार करून नाईकाचे पाठीमागे दोशा जमी येती नसी लागले. वीस कोसावर शीरपूर मैदानांत नाईक गांठून त्याजला लुटून वाणी याचा मवेसी तमाम बैल होते तितिकेहि आणून दिधले"

लार्ड वेलस्ली ह्या प्रदेशांतून जात असतां त्यानें शिंदखेडचें वर्णन 'चोरांचें पेव, 'लुटारूंची गुहा' ह्या विशेषणांनीं केलेलें आहे. नाइकांचा पूर्ण बंदोबस्त मेजर संदरलंड येईतोंपर्यंत झाला नाहीं. नाईकांनीं केलेले



शिवछत्रपतींचे मातामह **लखुजी जाधव यांचा शिंदखेड येथील राजमहाल.**

प्रकार इतके भयंकर असत कीं त्यावेळचे प्रसिद्ध लुटारूं मोहनसींग खडल-मशा गाझीखान यांचीं नांवें उच्चारतांच बरेच दिवसपर्यंत लोकांच्या अंगांत कापरें भरत असें.

**राघोजीराव**

राघोजीराव जाधव याच्या राजवटींत येथील कापडाचा व्यापार बराच वाढला होता. सिंदखेड व नंतर दौलताबाद येथील ‘ कोरे सणगे ’ तो लोणार येथें धुण्यास पाठवीत असे, असें बखरेवरून दिसतें.

**सिंदखेडची लढाई १७५७**

इ० स० १७५७ च्या जानेवारी महिन्यांत सिंदखेडला निजाम व मराठे यांच्यांतील सुप्रसिद्ध लढाई झाली. निजामातर्फे लढत असलेला रामचंद्रराव जाधव हा सिंदखेडच्या गढींत लपला असतां दत्ताजी सिंदे यांनी मोठा पराक्रम करून विजय मिळविला. खुद्द नानासाहेब व सदाशीवराव भाऊ ह्या लढाईला हजर होते.

**जाधवराईची अखेर**

जाधव घराण्यांतील अखेरचा प्रसिद्ध पुरुष राजे बाजीराव होय. इंग्रजी सैन्याशीं लढाई केल्याबद्दल त्यावर आरोप येवून त्यास कैद करण्यांत आलें. त्याचवेळीं त्याचें वतनहि जप्त झालें. हा शूर पुरुष कैदेंतच १८५९ सालीं मरण पावला.

**सिंद्यांचा अंमल**

इ० स० १७४३ पासून तों १८०३ पर्यंत सिंदखेड हें सिंद्यांच्या ताब्यांत होतें त्यानंतर तें निजामाकडे गेलें व आज इंग्रजाकडे आहे ! पुढें तें कोणाकडे जाईल हें एकटा काळच ठरवूं शकणार आहे !!

इ० स० १८१८ च्या सुमारास वऱ्हाडांत जात असता दुसरा बाजीराव बरेच दिवस सिंदखेडास राहिला होता.

जाधवांच्या राजवैभवाचीं साक्ष देणारीं अनेक स्मारकें, प्रासाद, राज-भवनें, महाल, मंदीर, तलाव व जलविहारांचीं ठिकाणें सिंदखेडास कायम

आहेत. आजहि त्यांच्याकडे पाहिलें ह्मणजे त्यांना बांधण्यास लागलेलें द्रव्य सामर्थ्य, कौशल्य व मेहनत याची कल्पना मनासमोर उभी राहून मन आश्चर्यानें थक्क होतें. अशा प्रेक्षणीय स्थळापैकीं कांहींचें संक्षित वर्णन खालीं दिलें आहे.

**दगडी महाल**:—हा महाल खास लुखजीनें बांधलेला असून, अनेक वर्ष निसर्गाशीं झगडून आजहि त्याचा तीन मजलीं दर्शनी भाग बव्हंशी कायम आहे यावरूनच तो किती मजबूत असला पाहिजे याची कल्पना होते. हा दगडी दरवाजा ओलांडून गेल्यावर जमीनदोस्त झालेला पण ज्याच्या आस्तित्वाचा आजहि स्पष्ट असलेल्या खुणा दिसणारा चौक लागतो हाच तो लुखजीचा रहाता महाल होय! या महालाच्या तळाशीं असलेलें तळघर मात्र अद्यापि शाबूत आहे. सिंदखेड येथील बहूतेक प्रत्येक जुन्या वाड्याला एकतरी तळघर आहेच आहे. शिवाजी सिंदखेडास खरोखरच आला असेल तर तो याच दगडी महालांत आपल्या जिजाऊ बरोबर राहिला नसेल काय? बालशिवाजी सिंदखेडास* आपल्या आईजवळ सन १६३२–३३ सालीं राहिला होता, या मुद्यावर श्री० काळे, दळवी व जदुनाथ सरकार, सरदेसाई यांचे जवळ जवळ एकमत आहे.

**रंगमहाल**:—ऐतिहासिक महत्वाच्या दृष्टीनें या महालाइतका महत्वाचा महाल येथें दुसरा नाहीं. याच महालांत रंगपंचमीच्या सुप्रसिद्ध प्रसंगी शहाजी व जिजाबाई यांच्या विवाहाचा वाङनिश्चय झाला. श्री. चिं. वि. वैद्य यांच्या मतें हा प्रसंग मुळीं घडलाच× नाहीं. या प्रश्नाला पूर्ण उत्तर देण्याचें हें स्थान नव्हे पण श्री. वैद्य यांनीं हा इतिहास लिहिल्यापूर्वी एक वेळ जर सिंदखेडला भेट दिली असती तर हा सुप्रसिद्ध 'रंगमहाल' पाहून, व तेथील

---

* श्री. काळेकृत 'वऱ्हाडचा इतिहास' पानें, १६७, १६८, ३२६. दळवीकृत 'जाधव घराण्याची कैफियत' पान २९.

× वैद्यकृत Shivaji founder of Maratha Swaraj. पान १८

आबाल वृद्धांच्या तोंडून या महालाचा इतिहास ऐकून त्यांना वरील विधानास फाटा द्यावा लागला असता. श्री. वैद्य ह्मणतात त्या प्रमाणें कदाचित् जाधवरावांनीं आपली आवडती जिजा मोठ्या आनंदानें शहाजीस दिली असेल पण जोंपर्यंत हा रंगमहाल अस्तित्वात आहे तोंपर्यंत तरी वरील विधानावर विश्वास बसणें कठीण ! या महालांतील लाकडी छतावर कोरून काढलेले डिझाइन्स व त्यांत हस्तीदंताचे व मधून मधून सोनेरी वर्खाचे केलेलें काम फारच सुबक, कौशल्यपूर्व व नयनमनोहर आहे.

**घुमट:**—शील्पशास्त्रदृष्ट्या ह्या इमारतीइतकी निर्दिष्ट इमारत येथें दुसरी नाहीं. याची लांबी, रुंदी व उंची अगदीं समान असून बांधणी अतिशय रेखीव आहे. एकाद्या ओतीव मूर्तिप्रमाणें याची प्रमाणशीर व सुबक घडण आहे. हा घुमट लुकजीचीं समाधि किंवा स्मारक असावें असा आमचा तर्क आहे. लुकजी दौलताबादेस मारला गेला हें प्रसिद्ध आहे पण त्याचें स्मारक मात्र येथें आहे. ह्या घुमटाच्या उत्तर दरवाज्यावर जो लेख कोरलेला आहे तो असा— 'सिंदखेडचे देशमुख भानवसे विठोजी त्याची आरधांगीं ठाकराई राणी त्यांचे सुपुत्र लुकजी जाधवराव माहाराज." या लेखाचा शेवट लुकजीच्या नांवानें झाला आहे यावरून हें लुकजीचें स्मारक असावें ! कारण मुख्य दरवाज्यावरील लेख जाधवांची वंशावळ देतो ती अशी "सिंदखेडचे देशमुख भानवसे विठोजी सौ. अरधांगी ठाकराई राणी त्यांचे पोटी जाधवराव, लुकजी महाराज अरधांगी गिरजाई राणी त्यांचे पोटीं पुत्र दत्ताजी व अंचलजी व राघोजी राजे जाधवराव लुकजी पुत्र दत्ताजी त्यांचे पोटीं यशवंतराव राजे लिंबाजी" हा संपूर्ण लेख असूनहि पुन्हां त्याच इमारतीच्या दुसऱ्या दरवाज्यावर व तोहि लुकजीस 'सुपुत्र' हें विशेषण लावून लिहिण्याचा अर्थ काय ? सरकारीं कागदपत्रांत ह्या इमारतीला 'महादेव टेंपल' ह्मटलें आहे तें मात्र अगदींच चूकीचें दिसतें. ही इमारत जाधवांची हें निसंशय ! हा घुमट अगदीं स्मशानांत आहे हेंहि तितकेंच खरें ! या इमारतीच्या अगदीं जवळ सर्व जाधवांची थडगी आहेत. अशा ठिकाणीं जाधवांना मुद्दाम महादेवाचें देऊळ बांधण्याचें प्रयोजन तरी काय ? जाधवराव घराण्यांतील एका सतीच्या

थडग्यांवर खालील लेख आहे. "शके १६३७ मनमथ नाम संवत्सरे आश्वीन शुद्ध दसमी ते दिवशीं मोरतब (?) जडोजी यादव ‹रधांगी सोरबा-बाई सती सेवक तेजजी नारायणजी जाधो"

**मोठा तलाव:**—हा तलाव रावजगदेव यानें सहा लाख रुपये खर्च करून गांवापासून एक मैल अंतरावर बांधला आहे. दगडी महाल जितका भव्य, घुमट जितका रेखीव तितकाच हा तलाव रम्य आहे. दगडाची थोर किंवा भींत ही इतकी कौशल्यपूर्ण बांधली आहे कीं तें पाहून मोठमोठ्या एंजिनिअरांनीं तोंडांत बोटें घालावीं. अतिवृष्टीनें किंवा तळ्यांतील पाण्याच्या जोरानें ह्या प्रेक्षणीय भींतीस इजा होऊं नये ह्मणून पाणी जाण्यास गोल छिद्रें ठेवलीं आहेत व एकामागेंएक अशा आंतल्या आंत अनेक भींती बांधून व त्यांत पुन्हा त्याच पातळींत छिद्रें ठेवून पाणी वहात असतांहि नयनमनोहर धबधबे दिसावेत अशी योजना केलेली आहे. पाणी जात असतां तें भिंतींनीं झालेल्या विहिरींत पडतें. व पुन्हा घोंघो वाहूं लागतें! ही योजना ह्मणजे अरेबिअन नाईटसमधील काल्पनिक वर्णनापेक्षांहि कुतुहलजनक वाटतें. पाणी तर बाहेर निघून जावें पण जाताना रमणीय दिसावें अशी दुहेरी योजना ज्यानें इतक्या सफाईनें केली त्याच्या कल्पकतेची कमालच ह्मटली पाहिजे! हीं सर्व छिद्रें वाटल तेव्हां बंद करण्याचीहि सोय केलेली आहे. या तलावांत चार बुरुज असून त्यांत विहीरी आहेत. खजिना ठेवण्याचें स्थान तें हेंच असावें असें बखरी-वरूनहि दिसतें!

**चांदणी तलाव काळा कोट:**—हीं दोन्हींहि समकालिन आहेत व दोन्हींचेंहि काम अपुरें राहिलेलें आहे. ह्या तलावांतून राजमहालांत नेलेला नळ जागजागीं फुटलेला दिसतो. ह्या तलावाच्या मध्यभागीं लहानशी पण टुमदार दोमजली पक्की इमारत असून तळ्यांत भरपूर पाणी असतें त्यावेळीं त्याची शोभा पहाण्यासारखी असतें. काळाकोट हा सिसे ओतून पक्क्या दगडांनीं बांधलेला किल्ला आहे पण दुर्दैवानें त्यांचें काम पुरें होऊं देण्याची पातशहाला बुद्धि झाली नाहीं.

**सावकार वाडा**:—हा वाडा खरोखरच फारच मजबूत असून प्रेक्षणीय आहे. या वाड्याचा लढाऊ परकोट अगदी शाबूत असून शत्रूवर मारा करण्याकरतां जागोजाग व्यवस्था केलेली आहे. हा वाडा लाडांच्या मालकीचा असून यांचें जाधवराव सारख्या सरदारावरहि हजारो रुपये कर्ज होतें.

**रामेश्वर मंदीर**:— हे श्रीरामचंद्रानें स्थापन केलें असें बखरकार ह्मणतो " तें समयीं बारवेवर स्नान करून श्रीरामानें लिंग स्थापना केली. " शरभंग ऋषींचा आश्रम येथेंच होता व येथूनच श्रीराम राक्षसभूवनास गेले. या मंदीरा इतकेंच जुनें देवालय श्रीनीलकंठश्वराचे होय ! या देवालयांत पुढील शीलालेख आहे " श्रीगणेशायनमः शके १५०९ सार्वजित संवत्सर श्रावण शुद्ध पाडवा जीर्णोद्धार हें देऊळ बांधलें राघोजी लुकजी भानुवंशी देशमुख परगणे शंधिपुर. " ह्या देवळासमोर नीलकंठ बारव आहे. तींतील शीलालेख पाण्यामुळें दुर्बोध झाला आहे.

**पुतला बारव**.—ही अतिशय जुनी विहीर असून हिच्या सर्व बाजूंनीं स्त्रीपुरुषांचे फारच सुंदर पुतळे आहेत. ज्या काळ्या व नरम दगडांनीं ही विहीर बांधून काढली त्या प्रत्येक दगडावर पुतळा कोरलेला दिसतो. ही बारव जाधवांच्याहि पूर्वीची आहे यांत शंका नाहीं. लोणारचे दैत्यसूदनाचें देऊळ ज्यांनीं पाहिलें असेल त्यांना ह्या कोरीव पुतळ्यांच्या सौंदर्याची कल्पना येईल. तसेंच सजनाबाई बारवेची बांधणी फारच सुबक आहे. याशिवाय बालसमुद्र, गंगासागर, अन्नछत्र रायबारव, गिरजा बखर ह्या विहिरी प्रेक्षणीय आहेत. याशिवाय अनेक जुने भव्य वाडे, नाना प्रकारचीं देऊळें व मंदीरें, अगणित बागा, दाटआंबराई, नयनमनोहर तळीं, तृणाछादित लहानशा टेकड्या, अनेक शुभ्र जुन्या मशिदी, यांनी या गांवास फारच शोभा आणली आहे. असा ह्या सिंदखेडचा स्पृहणीय इतिहास आहे. सिंद-खेडचें ' पूर्व ' इतके ' दिव्य ' होतें. त्याचा भावीकाळ खरोखरच तितका रम्य असेल काय ?

---

# राजे उदाराम घराणें



( लेः—यशवंत खुशाल देशपांडे एम्. ए. एल् एल् बी. )

इ. स. १६१७ च्या आक्टोबरची गोष्ट. शहाजादा खुर्रम दक्षिणेंत विजय संपादून आणि दक्षिणेच्या सुभ्याच्या संरक्षणाची व्यवस्था करून किल्लेमांडु येथें बादशहा जहांगीर यास भेटण्यास आला. बादशहानेंही आपल्या विजयी आणि कर्तृत्वशाली शहाजाद्याच्या स्वागताची अपूर्व तयारी केली होती. शहाजाद्यास आलिंगन देऊन त्यास दरबारांत राजसिंहासनाजवळ आसन दिलें. तास हजाराची मनसब देऊन शहाजान हा किताब दिला. शहाजाद्याबरोबर असलेल्या रणधुरंधर सरदारांनाही बादशहानें खाजगी मुलाखती देऊन त्यांना पोपाख, खिल्लत आणि इनामें देऊन त्यांचा गौरव केला. त्या सरदारांत खानजहां लोदी, अबदुल्लाखान, महाबतखान, शहानवाज खान, मोतबतखान बक्षी आणि मलिकंबरापासून फुटून आलेला उदाराम अशीं इतिहास प्रसिद्ध नांवें आहेत. पर्शिअन ग्रन्थाच्या आधारावर बेनीप्रसाद[1] यांनीं लिहिलेल्या जहांगीरच्या चरित्रांत ही हकीकत आहे. नामावर मुसलमान सरदारांच्या यादींत एक हिंदु सरदाराचे नांव पाहून साहजीकच कुतूहल उत्पन्न होतें.

या उदारामाच्या घराण्यासंबंधानें "वाशीमचे राजे उदाराम" शीर्षक एक निबंध वऱ्हाडचे प्रसिद्ध इतिहासकार श्री. यादव माधव काळे यांनीं भारत इतिहास संशोधक मंडळापुढें नवम सम्मेलनांत वाचला होता. तो मंडळाच्या त्रैमासिकांत वर्ष २ अंक १ ते ४ मध्यें पान ४४ वर छापिला आहे. शिवाय श्री. काळे यांनीं वऱ्हाडच्या इतिहासांत राजे उदारामांची हकीकत एका स्वतंत्र प्रकरणांत दिली आहे. या घराण्याची हकीकत उजेडांत

---

1 Beniprasrd -Jahangir page 351 & further.

आणण्याचें श्रेय सर्वस्वी वऱ्हाडचे सुप्रसिद्ध इतिहासकार श्री. या. मा. काळे यांनाच आहे.

या वार्षिकांत ज्यांचें छायाचित्र दिलें आहे ते श्री. राजे जगजीवनराव बाबासाहेब उदाराम देशमुख हे उदाराम घराण्यांतील माहूरशाखेचे विद्यमान प्रमुख होत. ते शारदाश्रम, यवतमाळ संस्थेचे आश्रयदाते झाले असून त्यांच्याच उदार देणगीनें हा शारदाश्रम वार्षिक ग्रन्थ प्रसिद्ध होत आहे. त्या निमित्त वऱ्हाडांतील या इतिहास प्रसिद्ध ब्राम्हण घराण्याचा त्रोटक पण साधारण इतिहास देण्याचें आह्मी योजिलें. आहे.

या घराण्याचा मूळ संस्थापक उदाराम हाच होय. याचें मूळ नांव उध्दव रामजी परंतु पारशी ग्रन्थांत उदेराम अथवा उदाराम असें आलें आहे. उध्दव रामजी उध्दवराम–उधोराव–उदेराम शेवटीं उदाराम असा अपभ्रंश झाला. उदारामाच्या भाग्योदयाची हकीकत शारदाश्रम संग्रहांत असलेल्या भक्तरहस्य[१] नांवाच्या एका अप्रकाशित ओवीबद्ध ग्रन्थांत आली आहे. तो ग्रन्थ अनन्त नांवाच्या कवीनें लिहिला असून शारदाश्रमांतील प्रत शके १७११=इ. स. १७८९ मधील आहे. या ग्रन्थांतील उतारा शेवटीं दिला आहे. त्या ग्रन्थावरून खालील माहिती कळते. उदाराम हा वाशीम प्रगण्यामधील ( सावरगांव, चिहूर वगैरे ) गांवचा कुळकर्णी होता. स्थिती अत्यंत गरीबीची, पाटलाच्या येथून ताक आणवून व कोंटून तरी धान्य आणवून काळ क्रमणा करावी. एकदा पाटलाची बायको दुरूत्तरें बोलली त्यावरून संसाराला वैतागून उदाराम हा शिरपूर येथें पद्माजी नांवाचा वंजारी जातीचा सत्पुरुष होता त्याला शरण जाऊन त्याची भक्ति करूं लागला. पद्माजी प्रसन्न होऊन त्यानें त्याला शहराला जा ह्मणून आज्ञा दिली. हल्लीं जेथें औरंगाबाद शहर आहे तेथें मलिकंबरानें खडकी ह्मणून निजामशहाच्या राजधानीचें शहर वसविलें होते तेथें तो गेला. उदाराम हा उत्तम फारसीनवीस होता. तेथें एका अमीराच्या येथें नवसिंदा ( लेखक ) ह्मणून

---

१ अनन्तकवि कृत–भक्तरहस्य अ० ९ वा ओव्या १२५ ते १५०

राहिला. पुढें अमीरा बरोबर दिल्लीस गेला. तेथें बादशहानें सांगितलेली कामगिरी उत्कृष्ट रीतीनें पार पाडली ह्मणून बादशहानें उदारामास भेटीस बोलाविलें, आणि खुष होऊन त्यास माहूर पासून वाशीमपर्यंत ५२ महालाची देशमुखी व नौबत निशाण देऊन सनद करून दिली. हें संतकृपेचें फळ असें अनन्त कवीनें ह्मटलें आहे.

यावरून निष्कर्ष निघतो तो असा कीं निजामशाहीचा दिवाण मलिकंबर यानें खडकी वसविल्यावर उदाराम तेथें गेला व तेव्हां पासूनच त्याच्या भाग्योदयास सुरवात झाली. मोगलांच्या ताब्यांत वऱ्हाड गेल्यावर नंतर निजामशाहीची नौकरी सोडून मोगलांच्या नौकरींत उदाराम राहिला असावा. श्री. काळे यांनीं नवम सम्मेलनांत वाचिलेल्या निबंधावरून[१] उदाराम हा अकबराच्या कारकिर्दीत दिल्लीस गेला. तेथें त्यांचे मामा दिवाणी खात्यांत नौकर होते त्यामुळें सरकारी कामांत प्रवेश होऊन त्यांची हुशारी अकबराचे ध्यानांत येऊन वाढवीत वाढवीत अखेरीस त्यास ५ हजाराची मनसब हिजरी सन १००२ ह्मणजे सरासरी इ. स. १५९२ मध्यें दिली. लष्करी कामांतही उदारामानें फार बहादुरी दाखाविली ह्मणून वाशीम व माहूर हे सरकारनें त्यांचे ताब्यांत दिलें. शहाजहान बादशहानेही या दोन्ही सरकारांतील देशमुखी वतन आणि कांहीं जाहागिरी दिल्या व याप्रमाणें उदारामानें ४० वर्षे मोगलांची नौकरी करून हिजरी १०४२=इ. स. १६३२ मध्यें तो आपल्या वयाच्या ६६ व्या वर्षी मरण पावला.

अकबराच्या कारकीर्दीतील उदारामाची हकीकत अद्याप उपलब्ध नाहीं. फारशी ग्रन्थांचें संशोधन झाल्यास ती अवश्य मिळेल. मात्र जहांगीर-शहाजहान यांच्या कारकीर्दीतील हकीकत उपलब्ध आहे. खानखाना हा दक्षिणच्या सुभ्यावर असतांना शहाजादा खुर्रम हा दक्षिणेंत येऊन त्यानें इ. स. १६१७ मध्यें निजामशाही आणि आदीलशाही यांच्याशीं तह होई-पर्यंतच्या कारभारांत उदारामाचें बरेंच सहाय्य झालें असलें पाहिजे. व

१ भारत इतिहास सं. मंडळ त्रैमासिक पर्व २ अं. १ ते ४ पा. ४५

त्याचेंच फळ ह्मणून या लेखाच्या आरंभीं वर्णन केल्याप्रमाणें जहांगीर बादशहानें उदारामाला खास मुलाखतीचा मान दिला व त्याला खिल्लत देऊन त्याचा गौरव केला. त्या वेळीं उदाराम हा मोंगलाच्या प्रतिष्ठित सरदारांपैकीं दक्षिणेंतील एकटाच हिंदु सरदार होता असें दिसतें. वऱ्हाडांतील दुसरा प्रतिष्ठित सरदार लखुजी जाधवराव हा त्यानंतर ह्मणजे इ. स. १६२१ मध्यें खडागळयांच्या हत्तीवरून झालेल्या झगड्यानंतर निजामशाही सोडून मोंगलाकडे आला.

जहांगीर[1]विरुद्ध शाहाजादा शहाजाहननें जें बंड पुकारलें त्यांतही उदाराम आणि लुखजी जाधवराव यांचें प्रमुख अंग होतें. इ. स. १६२३ मध्यें मांडु येथें शहाजहाननें बंडास सुरवात केली. त्यास दक्षिण, गुजराथ व माळवा येथील प्रमुख सरदारांचें पाठबळ होतें. त्या सरदारांच्या यादींत उदाराम आणि जाधवराव यांचीं नांवें आहेत. शहाजहानाविरुद्ध बादशहानें शहाजादा परवीज व महाबतखान यास पाठविलें. बादशाही फौजेस रोकून धरण्याकरितां जाधवराव व उदाराम याच्या नेतृत्वाखालीं चपल असें मराठी घोडदळ पाठविलें. या सरदारांनीं मनसुरखान सरदाराच्या हाताखालील सैन्याचा पराभव केला पण ते बादशाही अगाढव्य सैन्याचा प्रतिकार करूं शकले नाहीं. शहाजहानच्या सरदारांपैकीं एक एक त्याला सोडून गेले व शेवटीं वऱ्हाडांतून गोवळकोंडा व तेथून ओरिसा बंगालकडे जाण्याचा त्यानें निश्चय केला. जाधवराव, उदाराम आणि आतमखान हे त्याला साह्य होते. बादशाही सैन्य त्याचे मागें होतेंच. तापी उतरून शहाजहान अकोट येथें आला. व जाधवराव शहाजहानाचे सामान राखण्याकरितां मागें राहिला व शहाजहान, आपली पत्नी प्रसिद्ध मुमताजमहाल व पुत्र दारा, सुजा औरंगजेब यांसह उदारामाबरोबर माहूर येथें उदारामाचे येथें आला त्यावेळीं औरंगजेब ६ वर्षाचा होता. कांहीं दिवस माहूर येथें राहून व त्याचेच जवळ हत्ती, खजीना व जड सामान ठेवून विश्वासु रजपूत सरदार राजा भीम यांसह गोवळकोंड्याकडे

1 Beniprasad -Jahangir page 351. & further

गेला. परराज्यांत शहाजहान गेला असें पाहून परवीज आणि माहाबतखान ही परत बऱ्हाणपुराकडे गेले. माहूरला असतांना शहाजहान कोठें उतरला होता त्या वाड्याचे अवशेष उदारामाचे वंशज अद्यापही दाखवितात.

महाबतखान देऊळगांवराज येथें असतांना अदीलशहा आणि मलिकंबर हे दोघेही एकमेकाविरुद्ध मोंगलांची मदत मागण्याची खटपट करीत होते. शहाजहान मोगलीराज्यांतून निघून गेल्यावर माहाबतखानानें अदीलशहास मदत देण्याचें ठरविलें. माहाबतखानाची अलाहाबादकडे रवानगी झाल्यावर सरबुलंदरखान याच्याकडे दक्षिणेचा कारभार आला. शहाजहान निघून गेल्यानंतर जाधवराव आणि उदाराम परत बादशाही तैनातीस आले परंतु दण्ड ह्मणून जाधवरावाला आपला मुलगा आणि उदारामाला आपला बन्धु यांना बादशहाकडे ओलीस द्यावे लागले. त्यांची नेमणूक बालाघाटच्या संरक्षणाकरितां झापर नगर येथें झाली. मोगलातर्फे सरदार मुल्लामहमद याची नेमणूक मलिकंबर आणि अदीलशाही यांच्या झगड्यांत अदिलशहास मदत करण्याकरितां झाली. मलिकंबराचें व अदिलशाहाचें युद्ध सन १६२४ मध्यें भातवडी येथें झालें. त्यांत मलिकंबरातर्फे शहाजी व शरीफजी लढले. या युद्धांत शरीफजी पडला. मोगलातर्फे जाधवराव आणि उदाराम हेहि अदीलशहाच्या वतीनें लढले. या युद्धाची हकीकत परमानन्दानें शिवभारतांत वर्णिली आहे. उभय सैन्यांत असलेल्या सरदारांची नांवें दिलीं आहेत त्यांत अनेक ब्राह्मण आणि क्षत्रिय मराठे सरदारांचीं नांवें आलीं आहेत. या लढाईत मोंगली सैन्याचा आणि अदिलशाही सैन्याचा मोड होऊन त्यांचें अनेक सरदार कैद केल्या केले. जाधवराव आणि उदाराम हे लढतां लढतां जेव्हां पराभव होण्याचा समय आला तेव्हां शत्रूच्या स्वाधीन न होतां लढाईतून परत निघून गेले. भातवडी हें गांव पैठण व अहमदनगर या शहराच्या दरम्यान आहे.

या प्रमाणें अनेक शौर्याचीं कामें करून आणि आपल्या घराण्यास वैभव शिखरावर पोहचवून उदाराम इ. स. १६३२ मध्यें मृत्युवश झाला.

उदारामाचे मागें त्याची स्त्री आणि अज्ञान पुत्र जगजीवनराव हे होते. उदारामाची देशमुखी, मनसबदारी जाहगीर वगैरे सर्व मानमरातब शहाजहान बादशहानें त्याच्या मुलाकडे चालविली. विठोजी[१] वकील याचे हस्तें खिल्लत व घोडा पाठवून बादशहानें सन १६३७ मध्यें वतनाची सनद जगजीवनरावांच्या नांवें करून दिली. उदारामाच्यापूर्वी माहूर प्रान्त मोंगला तर्फे हरचंदराय नांवाच्या रजपुताकडे होता. पण त्याच्या कारकिर्दीत प्रजेस त्रास होऊन तो मुलूख जवळ जवळ वैराण झाला होता. उदारामाच्या एका सनदेंत मुलखाची आबादानी करून शेतीच्या उस्तवारीस मदत करावी असा उल्लेख आहे. उदारामाच्या मृत्युनन्तर हरचंदरायानें पुन्हा उचल खाल्ली. परन्तु उदारामाची बायको ही कमी शूर नव्हती. तिनें आपले लोकांस "बहिणीची लज्जा राखा" असें उत्तेजन दिलें आणि निशाणास चोळी बांधून लष्कर उभें केलें. आणि हरचंदरायावर स्वारी करून त्यास कायमचें हाकून दिलें.

आपल्या शूर आईच्या शिकवणीनें जगजीवनरावही शूर आणि कर्तबगार निघाला, व त्याची योग्यता वाढून त्याचे अधिकारही वाढले. सन १६४२ व १६५२ मध्यें शहाजहान बादशहाच्यावेळीं दोन सनदा मिळून त्यास २ कोटी ७० लक्ष दामाचें उत्पन्न मनसबजागीरीबद्दल मिळालें व त्या प्रमाणांत लष्करही त्याचे हातांत राहिलें. माहूर वगैरे २३ महालाचे दिवाणी फौजदारी सर्व अधिकार त्यास मिळाले. औरंगजेब दक्षिणेंत आला असतां जगजीवनरावास मुद्दाम बऱ्हाणपुरास भेटीस बोलावून औरंगजेबानें त्याचा सन्मान केला. जगजीवनरावानें बऱ्हाणपुरास एक पुरा वसविला तो जगजीवन पुरा म्हणून अद्याप कायम आहे. या पुऱ्याचे बाबतीत मोआझिमची एक सनद आहे. जगजीवनराव माहूरचे किल्ल्यांत राहत असे त्यानें किल्ला दुरुस्त करून उत्तरेकडे चिनी दरवाजा म्हणून एक उत्कृष्ट रंगीत दरवाजा बांधला. जगजीवनरावास स. १६५८ मध्यें वीरोचित मरण आलें. तो

१ मा. इ. सं. मं. त्रै. वर्ष २ अं. १ ते ४ काळे यांचा लेख पा. ४८

प्रकार चिटणीसकृत सत्यप्रकरणात्मक शिवचरित्रांत असा वर्णिला आहे." सन १६५८ मध्यें "औरंगजेब[1] दरमजल निघोन दिल्लीस गेले. अलमगीर पादशाह बाप कैद करून डोळ्यांत सळ्या फिरविल्या आणि आपण तख्ता-वरि बसोन पादशाहात करूं लागले. या गलबलींत चार अमीर औरंगजेब यांचे, भाऊ होते, त्यांनीं लढाई केली. त्यांत उदाराम माहूरकर देशमुख होते ते युद्धी पडले. त्याची स्त्री इणें हिम्मत धरून, आपली सरदारी कायम करून युद्ध केलें. फत्ते पावलियावरि वर्तमान कळलें. त्याजवरून तिजवर संतोषी होऊन "रायबागीण" होय, ह्मणून किताब 'रायबागिण' असा औरंगजेबांनीं दिला. माहूरचे देशमुखीचें फरमान तिचें नांवे करून देऊन, कांहीं दिवशीं औरंगाबादचे सुभ्याचे निसबतीस चाकरीं करावी ह्मणोन पाठविली. मुरादबक्ष, व सुजातशाह व दाराशुक्र असे तिघे भाऊ होते ते औरंगजेबानी मारून आपणच पादशाही बळकावलीं." यावरून जगजीवनराव युद्धांत पडल्यावर आणि त्याच्या स्त्रीनें पराक्रम दाखविल्यावर तिला रायबागन हा किताब दिला असें दिसतें.

पण परमानन्दकृत शिवभारतांत शके १५८२=इ. १६६० ची घटना दिली आहे तींत रामबागन उर्फ राजव्याघ्री ही उदारामाची बायको व जगजीवनरावची माता असें म्हटलें आहे. त्या कथा प्रसंगाचें सुरस वर्णन परमानन्दानें दिलें आहे त्याचा सारांश असा आहे.

शके १५८२=स. १६६० मध्यें शिवाजीचा उत्कर्ष व आपला अपकर्ष झालेला पाहून आदिलशहानें दिल्लीपतीचे ह्मणजे औरंगजेबाचें सहाय्य मागितलें असतां त्यानें आपला मामा पाहिस्तेखान याच्या आधिपत्याखालीं दौलताबाद येथें असलल्या आपल्या सैन्यास त्याच्या मदतीस जाण्याची आज्ञा दिली. पाहिस्तेखानाच्या मदतीस अनेक सरदार पाठविले. त्यांची यादी परमानन्दानें शिवभारतांत दिली आहे. तीमध्यें जाधव राजे दत्ताजी व रुस्तुमराव यांचीं नांवें असून शिवाय

---

१ चिटणीस—सतप्रकरणात्मक शिवचरित्र पा. ७५

"[1]जायामुदयरामस्य जगज्जीवनमातरम्।
राजव्याघ्रीति यां प्राहुर्युधि व्याघ्रीमिवोद्धुराम्॥
सा प्रतापेन महता वृता प्रतिहतायुधा। "
कृष्णराज प्रचंडाद्यैः सहितास्तमसनाभिभिः॥

ह्मणजे युद्धामध्यें वाघिणीप्रमाणें निर्भय असी जी उदयरामा (उदाराम) ची बायको व जगजीवनाची आई 'रायबागीण' ह्मणून ख्यात आहे ती, मोठ्या प्रतापामुळें अप्रतिहतगति स्त्री व तिचे कृष्णराज, प्रचंड इत्यादि भाऊ वगैरे यांसह–

या प्रमाणें[2] शाहिस्तेखानानें चढाइ करून चाकण व पुणें घेतलें व त्यानें पुण्यास तळ दिला व तेथून त्यानें करतलबखानास सह्याद्रि उतरून चौल वगैरे भाग घेण्यास आज्ञा दिली. करतलबखानाबरोबर जे सरदार आपापलें सैन्य घेऊन होते त्यांत रायबागीण होती. सह्याद्रीवरून हें सैन्य खाली उतरून गेल्यावर शिवाजीनें त्या सैन्यास उमरखिंडीच्या घाटांत अडवून धरलें (हा घाट पुणें जिल्हा व भोर संस्थान या मधून कुलाबा जिल्ह्यांत पेणच्या बाजूकडे जातांना लागतो.) उमरखिंडींत आल्यावर शिवाजी जवळ आला असें त्यास (करतलबखानास) आढळून आलें. मराठ्यांच्या सैन्यानें वेढलेल्या, वारा मुळींच नसणाऱ्या अशा अरण्यामध्यें सगळें सैन्य दुःखी होऊन धीर सोडतांना पाहून मदोद्धता अशी रायबागीण करतलबखानास म्हणाली. शिवाजीरूपी सिंहाच्या आश्रयाखाली असलेल्या वनांत सैन्यासह तूं प्रवेश केला हें वाईट काम केलें. दिल्लीपतीचें सैन्य त्वां गर्विष्ठानें सिंहाच्या जबड्यांत आणून सोडलें, ही दुःखाची गोष्ट होय. आजपर्यंत दिल्लीपतीनें जें यश मिळविलें तें सारें यश तूं या अरण्यांत बुडविलेंस. आतां तूं आज लगेच त्या राजास शरण जाऊन आपल्या सैन्यास मृत्युपाशांतून सोडीव. या प्रमाणें रायबागिणीनें

---

१ परमानन्द–शिवभारत अ० २५ श्लो. ५२, ५३.

२ परमानन्द–शिवभारत अ. २८ श्लोक ५५ व ६१ आणि अ. २९ श्लोक १ ते १३.

त्या महाशूर व साहसी यवनास तेथें जागे केल्यावर तो युद्धापासून परावृत्त झाला. नन्तर त्यानें नम्रभाव स्वीकारून शिवाजीकडे दूत पाठविला. त्यानें शिवाजीस करतलबखानाचा निरोप सांगितला कीं, मी आपलें सर्वस्व आपणास अर्पण करून आपल्या अपराधाचें क्षालण करूं इच्छितो; व जिवंत जाऊं इच्छितों म्हणून या प्रदेशांतून बाहेर पडण्याची मला आज्ञा द्यावी. शिवाजीनें शरण आला असें पाहून, या प्रदेशांतून आपल्या सेनेसह परत जा म्हणून आज्ञा दिली व अभय वचन दिलें. करतलबखान खंडणी देऊन निघून गेला. यांत शिवाजीच्या सैन्यास बरीच लूट मिळाली.

वरील उंबरखिंडीची घटना परमानन्दाच्यामतें शाहिस्तेखानाच्या स्वारींत सन १६५८ मध्यें घडल्याचें वर्णितो पण सप्तप्रकरणात्मक[1] चरित्रांत आणि मराठी[2] दप्तर या पुस्तकांत ती घटना सन १६७० मध्यें सुरतच्या दुसऱ्या लुटीनन्तर घडल्याचें नमूद आहे. सप्तप्रकरणात्मक चरित्रांत मजकूर आहे तो असाः— सुरतेवरि स्वारी महाराजांची गेली हे औरंगाबादेस कळल्यावरि (तेथील सुभेदार) यांनी मोहबतखान दाऊतखान आठदहा हजार फौजेनसी सुरतेचे कुमकेस पाठविले. उदाराम माहूरकर याची स्त्री रायबागीण व त्याचे लेंक जगजीवन हेहि चारपांच हजार फौजेनसी दुसरें मार्गें आले. ऐशा दोन्ही फौजा दो वाटांनीं चालून आल्या असतां त्याजवरून महाराजांनीं सारे लोक पुढें गेले होतेच, आपण सडे होऊन फौजेचे तोंडावरी गेले. त्यांत रायबागीण जात होती त्या मार्गें करून बोरटीकर देशमुख, राज पाटील व यशवंतराव रामजी, विश्वासराव हतनूरकर व दिनकरराव बागराव यांस हुकूम केला जे, "रायबागीण उमरखिंडीतून जाऊं न द्यावी, बुडवावी." ऐसें सांगून रवाना केले. त्यांणीं जाऊन वाट बंद कली आपण मोहबतखानावरि गेले. खंडासे ह्मणून शहर आहे त्या नजीक गांठ पडली. युद्ध दोन प्रहर-पर्यंत होऊन मोंगली फौज घोडीं घालून मोडली. चार हजार घोडे, दाहा

---

१ सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र पा. १५०. २ मराठी दप्तर,, रुमाल १ ला पा. ६४.

हत्ती पाडाव केले. लूट ही फार सांपडली. कांहीं लोक पळून गेले त्यांचा पाठलाग न करितां सुरतेची लूट निभावून जाणें, रायबागीण आली तिचें पारिपत्य करणें म्हणून तसेच चालून आले. बागराव वगैरे सरदार यांनीं मानें यांचे तळ्यावरि जाऊन तेथून रायबागीण येतां खिंडींत अडविली होती, तो महाराज येऊन पावले. आणि वेढा देऊन कांहीं लढाई देऊन तिजला बुडविली. दोन तीन हजार घोडीं, पांच हत्ती पाडाव केले. रायबागीण व तिचा लेंक जगजीवन धरिलीं. ती शरण आली. या प्रमाणें महाराजांनीं सुरतेची स्वारी करून, दोन्ही फौजा लुटून, यश घेऊन, शत्रूवरि दहशद घालून लूट सुद्धां सुरक्षित रायगडास घेऊन पावले. मार्गी येतां रामनगरही पारिलें. रायबागीण हीस बहूमान देऊन सोडून दिली.”

शिवभारत, सप्तप्रकरणात्मक चरित्र व मराठी दफ्तर या तिन्ही ग्रन्थांत रायबागण हिला उदारामाची पत्नी व जगजीवनरावची माता म्हटलें आहे. नवम संम्मेलनांतील लेखांत श्री. काळे यांचेंहिं तसेंच मत दिसून येतें पण वऱ्हाडच्या इतिहासांत रायबागन ही जगजीवनरावची पत्नी असें म्हटलें आहे. पण त्याला आधार दिला नाहीं. ज्या वेळेला स. १६६० ची अथवा सन १६७० ची घटना झाली त्या वेळेला जगजीवन जिवन्त नव्हता. कारण तो पूर्वीच म्हणजे सन १६५८ मध्यें मरण पावला होता, जगजीवनराव हाहि कर्तबगार निघाल्यामुळें त्याच्या मृत्युनन्तर त्याची आई जिवन्त राहून तिनें सन १६६० अगर १६७० मध्यें पराक्रम गाजविणें आणि कर्तबगार मुलगा जगजीवनराव याची आई म्हणून तिचा गौरव करणें असम्भवनीय नाहीं. दुसरें उदाराम आपल्या वयाच्या ६६ व्या वर्षी सन १६३२ मध्यें वारला असें श्री. काळे लिहितात व हा सन बरोबर असावा असें जगजीवन-रावास सन १६३७ मध्यें मिळालेल्या सनदेवरून दिसतें. रायबागीण दीर्घजीवी असल्यास सन १६३२ मध्यें नवरा मेल्यावर २८ वर्षांनीं अथवा ३८ वर्षांनींही लढाईंत भाग घेणें असंभवनीय नाहीं. उंबरखिंडीचें युद्ध सुरतच्या दुसऱ्या लुटी नन्तर सन १६७० मध्यें होण्यापेक्षां शाहिस्तेखानाच्या स्वारीच्या वेळींच शिवभारतांत सांगितल्या प्रमाणें सन १६६० मध्यें झालें



श्री. राजे व्यंकटराव उर्फ भाऊसाहेब उदाराम देशमुख.
( श्री. राजे बाबासाहेब यांचे जेष्ठ चिरंजीव )

शंकररावानंतर त्यांचे पुत्र उद्धवराव मालक झाले त्यांना ६ पुत्र होते. उद्धवरावानंतर या उदाराम घराण्यानें राजकारणांत कांहीं भाग घेतल्याचें दिसत नाहीं. ते आपलें वतन संभाळून असत. उद्धवरावांच्या ६ पुत्रांमध्यें सन १८०३ मध्यें वाटण्या झाल्या. व तेव्हांपासून ते आपापल्या वाटणीचा उपभोग घेत निरनिराळ्या स्थळीं राहात या कारणामुळें या सहा शाखा झाल्या त्या येणें प्रमाणें:—

| शाखा | गांवें |
| --- | --- |
| १ जगजीवनराव | वाशीम, मालेगांव व शिरपूर |
| २ खंडेराव | कळमनुरी ( मोगलाई ) |
| ३ त्रिंबकराव | पुसद, भोजले व गुंज |
| ४ जगदीशराव | वारि व अनसिंग |
| ५ रघुनाथराव | उमरखेड |
| ६ नारायणराव | माहूर |

जगजीवनराव यांचे शाखेपैकीं विद्यमान प्रमुख पुरुष राजे गोपाळराव उदाराम असून ते मालेगांव येथें राहतात. त्यांचेकडे मालेगांव जाहगीर आहे. त्या गांवाबद्दल हल्लीं त्या शाखेंतील हक्कदारामध्यें दिवाणी दावा सुरू आहे. हीच शाखा राजे उदाराम घराण्यामध्यें वडील आहे. तिसरी शाखा खंडेराव यांची—या शाखेंत पुसद येथे भोजलेकरापैकीं प्रमुख पुरुष आप्पासाहेब राजे उदाराम हे ऑ. माजिस्ट्रेट असून त्यांचे धाकटे बंधु पुसद येथेंच वकिली करितात ते राजे वकील ह्मणून प्रसिद्ध आहेत. पुसद येथील दुसरी उपशाखा भाऊसाहेब राजे उदाराम यांची असून त्यांचे पुत्र हल्लीं कारभारी असून सुस्थितींत आहेत. तिसऱ्या, चौथ्या व पांचव्या शाखेंत नमूद करण्यासारखे कोणी कर्तबगार गृहस्थ दिसून येत नाहींत.

धाकट्या आणि शेवटच्या शाखेंत हल्लींचे विद्यमान पुरुष राजे जगजीवनराव नारायणराव उदाराम देशमुख आणि त्यांचे बंधु राजे संतोकराव नानासाहेब उदाराम देशमुख हे आहेत. या शाखेनें राजे उदाराम घराण्याचें

वैभव थोड्या अधिक प्रमाणांत कायम ठेविलें आहे. या शाखेंत तुळशी, मजरे मट, वानोळे पानोळें हीं निजामच्या राज्यांत आणि दराडी, पुसद तालुक्यांत जहागिरीचीं गांवें त्यांच्या वहिवाटींत आहेत. त्यांच्या वाडवडिलांनी समरंगणावर रक्त सांडून मिळविलेल्या वतनाचा आणि वैभवाचा थोड्या अंशानें कां होईना अद्याप ते उपभोग घेत आहेत. आपल्या वाडवडिलांनीं कमाविलेल्या नांवलौकिकाची जाणीव या शाखेंतील पुरुषांना असून तो नांवलौकिक आणि मोठेपणा राखण्यासाठीं ते सदैव तत्पर असतात. श्री. राजे जगजीवनराव बाबासाहेब यांचे छायाचित्र सोबत दिले आहे. यांचें वय ६५ वर्षांचें असून त्यांचा काळ पूजापाठ इत्यादि सत्कार्यांत जात असतो. त्यांची ब्राम्हणावर श्रद्धा असून त्यांची दान दक्षिणा, ब्राम्हणसंतर्पण इत्यादिकासंबंधानें फार लौकिक आहे. यांचें जेष्ठ चिरंजीव राजे व्यंकटराव उर्फ भाऊसाहेब उदाराम हे नवीन पिढींतील तरुण असून फार उत्साही आणि बहुश्रुत आहेत. यांना वाङ्मयेतिहासाची आवड असून वाचनाची गोडी आहे. यांना ग्रंथसंग्रहाचीहि फार आवड आहे. विद्वत्तेची अभिरुचि असून शिवाय आनुवंशिक शौर्याबद्दलही ते प्रसिद्ध आहेत यांना शिकारीचा फार नाद असून खंदे शिकारीहि जवळ आश्रयानें ठेविले आहेत. समोरासमोर मोठमोठ्या पटाईत वाघांच्या शिकारी केल्याबद्दलच्या त्यांच्या शौर्याच्या गोष्टी सर्वश्रुत आहेत. श्री. भाऊसाहेबांच्याकडे वाड्यांत कोणी सभ्य भेटावयास आल्यास आपल्या शिकारीचीं विजय चिन्हें मोठ्या हौसेनें दाखवितात.

असा हा वऱ्हाडांतील एका थोर ब्राह्मण घराण्याचा त्रोटक इतिहास आहे. फारसी प्रसिद्ध अप्रसिद्ध तत्कालीन ग्रन्थांचें आणि निरनिराळ्या शाखेंत असलेल्या प्राचीन कागदपत्राचें शोधन केल्यास या घराण्याचा आणखी इतिहास उजेडांत येऊन त्यामुळे तत्कालीन इतिहासावरही प्रकाश पडेल. श्री. राजे भाऊसाहेब यांसारख्या, या घराण्यांतील उत्साही आणि विद्वान तरुणांनीं या कार्याकडे लक्ष दिल्यास तें सहज साध्य होण्यासारखें आहे. त्यांचें उदाहरण

सिंदखेडकर जाधवराव, नागपूरकर भोसले इत्यादि वऱ्हाडांतील अनेक लहानमोठ्या इतिहासप्रसिद्ध घराण्यांना आदर्शभूत होईल. लखुजीराव जाधवराव, जगदेवराव, राजे उदाराम, रायबागन, राजे रघुजी भोसले, सरदार भवानी काळु इत्यादि थोर इतिहासप्रसिद्ध पुरुष केवळ आपल्याच घराण्यांतील पुरुषांना आदर्शभूत नसून त्यांचे उज्ज्वल चारित्र्य प्रत्येक उदयोन्मुख तरुणास भवितव्यतेमधील उन्नतीचा मार्ग चोखाळण्यास स्फूर्ति आणि प्रकाश देईल यांत तिळमात्र शंका नाहीं.



# परिशिष्ट अ.

# ( राजे उदाराम घराणें )



**अनंत कविकृत भक्तरहस्य**

## अध्याय नववा

यांतील

### राये उदाजीराम यांची हकीकत;

कीर्त जालीसे चहुदेसी ।। कुळकर्णी गेलासे ग्रामासी ।। तो कीतीयेका जान दीवसी ।। श्रुत उदाजीस पै जाले ।।१२५।। तो खेडे वासीम परगानी याचे ।। तेथील कुळकर्णी नाव उदाजी त्याचे ।। परी दळीद्र संगी पूर्व पापाचे ।। वचन तयांच न मानीती ।।२६।। कोंडे मेळवूनी काही कन ।। कन्याभाकरी तेही करन ।। तक्र पाटलाचे घरीहून ।। आनोनी भोजन कराने ।।२७।। ऐसे प्रतही आनीता ताकासी ।। काकी मावसी म्हने तीयेसी ।। पुढे ठेउनी तांबीयासी ।। तो क्रोध तीयेसी पै आला ।।२७।। तो तांब्या हानीतला तयासी ।। प्रती दीनी मागतोसी ताकासी ।। रांडलेका काही करी उदमासी ।। कुटुंब उपवासी मरतसे ।।२९।। म्हने त्राहे त्राहे देवा हरी ।। काये घातलसे संसारी ।। नीर्धन प्रानी तृन तुल्ये जरी ।। असोनी संसारी प्रेतरूप ।।३०।। तानवीसी दप्तर मनी पुन सुलक्षनी ।। पारसीनवीसी न तर्कज्ञानी ।। समयो उचीत प्रश्नकरनी ।। कर्म साहे ज्ञान नसेची ।।३१।। बहुते केलसे रोजगार ।। बजाजीचा करी यावर ।। परी जये नाही तीळभर ।। अन्नवस्त्र न मीळेची ।।३२।। स्त्रीपुत्र भोगीती वीपति ।। दैन्य वानी सदा दीसति ।। परी विचित्र प्रालब्ध गति ।। मरमर म्हनती सर्व लोक ।।३३।। काळ वीन्मुख जालीया पाहे ।। मग कोन्ही कोनाचे नोहे ।। आप्त वर्ग सोडीति पाहे ।। तया यये कोन्ही न देति ।।३४।। ऐसे दळाद्रे तो पीडिला ।। म्हने वीश्वर कैसा कोपला ।। जरी प्रान द्यावा वहीला ।। तरी आत्महत्या

घडतसे ॥१३५॥ ऐसा जीवे त्रास घेतला ॥ तो फीरत फीरत सीरपुराव आला ॥ तव पद्माजीस शेरन जाला ॥ वरे संतसेवेला तऱ्ही घडो ॥३६॥ तो मनोभावें सेवा करी ॥ अैसे तो जाले दीवस बहुती ॥ तव कृपा उपजली पद्माजीसी ॥ म्हने उठ शहरा जाये वेगी ॥३७॥ म्हने जाउनी करू काये ॥ उठ साळ्या येथुनी जाये ॥ भग वंदोनीया पाये ॥ येता होये अवरंगाबादेस ॥१३८॥ तो येक अमीराचा दीवान होता ॥ टहलटीकोरी चाकरी जाला करीता ॥ तव नवीसींदा देखोनी तत्वता ॥ भाव चीतांत बैसला ॥३९॥ वस्त्र भुषनें देउनी त्यास ॥ तो तैसाच आला दीलीस ॥ जाउन भेटला बाछायास ॥ तो कामगीरीस सांगीतले ॥४०॥ तो पद्माजी प्रसादे करूनी ॥ तो कामगीरी आली साधुनी ॥ नाव लोकीक जालास तेनी ॥ बाछा कारण सांगति ॥१४१॥ बाछा अैकोनी बोल्ती ॥ कोन उदाराम आहे येथी ॥ तो आनुन भेटवा आम्हासी ॥ पाचारोनी तेथ आनीला ॥४२॥ तसलीम कुरणीशात करोनी ॥ पुढे उभा जोडोनी पानी ॥ अर्जी मर्जींत पाहोनी ॥ मृदु वचनी बोलतसे ॥४३॥ तव प्रालब्ध जालें उदीत ॥ देखोनी प्रभुसी आनंदभरीत ॥ सन्नद करोनी तयासी देत ॥ सवाई देसमुखी त्यात लिहीलीं ॥४४॥ माहोर सरकार ते वासीम जाना ॥ बावन माहालाचे प्रमान करून ॥ मुद्रा पातशाहानें करोनीं जान ॥ नौबती नीशान दीधले ॥१४५॥ हे संतकृपेनें देत असे ॥ ते अद्यापी वरी चालतसे ॥ पद्माजीची वरदे कृपा असे ॥ अैकोनी संतोशा श्रोतया ॥१४६॥ श्रोते म्हनति वक्तोयाप्रति ॥ संतमहीमा अगाध कीर्ति ॥ जे नींजरा ना हो प्राप्त ॥ तेची करीती योगीराज ॥४७॥ पुढे पद्माजीचे कथन ॥ तेची आम्हा करा नीरोपन ॥ वक्ता म्हने सावधान ॥ करा श्रवन सांगतो ॥४७॥ कीर्ती जाली चहुदेसी ॥ उदाराम येउनी वंदी पायासी ॥ तो पद्माजी येउनी दोनदासी ॥ जेन नवसासी पाहावया ॥४९॥ पाळने लेकराचे नवसी ॥ जन मीळाले बहुवसी ॥ पद्माजी उडी घाली डोहासीं ॥ गेला पाताळास दीसेना ॥१५०॥

---

भूयात् भारतपंकजं कालिमलप्रध्वंसिनः श्रेयसे

# महाभारत शतसाहस्रीसंहिता

## बुद्धपूर्वकालीन कीं बुद्धोत्तरकालीन

### यासंबंधीं कांही विचार



( लेः-श्री. **माधव श्रीहरी अणे** यवतमाळ. )

महाभारत हा सर्व हिंदुमात्राचा एक अत्यंत पूज्य राष्ट्रीय ग्रंथ आहे. त्यांतील श्रीमद्भगवद्गीता ही आज सर्व जगतांतील तत्ववेत्त्यांच्या आदरास पात्र झाली असून वैदिक आर्य तर ब्रम्हविद्येवरील तो एक अत्यंत श्रेष्ठ प्रमाणग्रंथ आहे असें मानतात. प्रस्थानत्रयींत गीतेचा समावेश करण्यांत येतो या एका गोष्टीवरूनही त्या ग्रंथाची योग्यता कोणाच्याही लक्षांत येण्यासारखी आहे. श्रीमहाभारत हा आमच्या ब्रम्हविद्येचा आणि ' हिंदुसंस्कृति ' या शब्दानें वाच्य असणाऱ्या सर्व तत्वांचा, सदाचाराचा, चारित्र्याचा व ध्येयाचा अखंडप्रवाही असा सुधासिंधु आहे. कोट्यवधि आर्यांनीं हजारो वर्षे या सुधासिंधूत अवगाहन करून व त्यांतील निर्मलामृताचें आकंठ पान करून आपल्या संसारदावाग्निदग्ध मनास शांति मिळवून दिली आहे, आपली ज्ञानपिपासा पुरवून घेतली आहे व एकंदर आपल्या जीविताची सार्थकताही सिद्ध करून घेतली आहे. सध्याच्या भौतिक शास्त्रोत्कर्षाच्या काळांत देखील या सुधास्यंदि निर्झराचे रसांचे माधुरींत कांहींही न्यूनता येत नाही, या ग्रंथाचा अभ्यास करण्यासाठीं गेल्या शतकांत आधुनिक विद्वानांचे जे करून प्रयत्न सुरू आहेत त्यांवरून हें सिद्ध होण्यासारखें आहे.

या विद्वानांच्या परिश्रमानेंच महाभारताच्या कालनिर्णयास उपयुक्त अशी बरीच माहिती आतां प्रसिद्ध झालेली आहे. तथापि या सर्व माहितीचा समन्वय करून महाभारतासंबंधीं सर्वमान्य असें कालनिर्णयरूप सिद्धांतवचन अजून ठरविण्यांत आलेलें नाहीं.

लौकिकदृष्टया भारतीय युद्ध हा कलीयुगाचा आरंभ मानण्यांत येतो. ह्मणजे तें युद्ध खिस्तपूर्व ३१०१ या वर्षी झालें असा त्याचा अर्थ आहे. ‘ प्राप्तं कलियुगं विद्धि ’ हें भीमानें शल्यपर्वांत दुर्योधनास जो लत्ताप्रहार केला त्याचें समर्थनार्थ कारण ह्मणून भगवान् श्रीकृष्णानें सांगितलें आहे. प्राचीन ज्योतिषकार वराहमिहिर व राजतरंगिणीचा कर्ता विल्हण हे भारतीय युद्ध कलियुग सुरूं झाल्यानंतर ६५३ वर्षांनीं झालें असें मानतात. कलियुगाला प्रारंभ भारतीय युद्धाचे पूर्वीच झाला होता या मताला कांहीं अंशीं वनपर्वां-तील खालील वचनानें पुष्टि मिळते. युधिष्ठिराचा मार्केडेयास भविष्यासंबंधानें प्रश्न आहे तो असाः अस्मिन् कलियुगे घोरे त्वस्ति पुनःकौतूहलं मम। समाकुलेषु धर्मेषु किंतु शेषं भविष्यति॥ व. प. अ. १९०-३. ‘ अस्मिन् कलियुगे ’ असा शब्दप्रयोग युधिष्ठिराचे प्रश्नांत आला असल्यामुळें प्रश्न करण्याचे वेळी कलियुग प्रवृत्त झालें होतें हें स्पष्ट आहे. भारतीय युद्ध याचे नंतर १४ वर्षांनीं झालेलें आहे. याशिवाय वनपर्वांतच जें नलोपाख्यान आहे त्यांत कलीच्या प्रादुर्भावाचा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हां वराहमिहिर व राजतरंगिणी-कार हे कलियुगारंभ युद्धाचे पूर्वी ६५० वर्षे मानतात हें महाभारतांतील वाक्यास विसंगत आहे असें दिसत नाहीं. रमेशचंद्र दत्त प्रभृति पंडितांच्या मतानें या युद्धाचा काळ खिस्तपूर्व १४०० असावा. मद्रासी पंडित वेलांडी अय्यर यांनीं भारतीय युद्ध हें इ. स. पूर्व ११९४ आक्टोबर रोजीं झालें असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आहे. नागपूरचे विद्वद्रत्न केशवराव दफ्तरी यांनीं भारतीययुद्धकाळ शकापूर्वी १२७५-३ वर्षे इसवी सनापूर्वी ११९७ वर्षे व विक्रम संवतापूर्वी ११४० वर्षे हा होय असा आपला ठाम निर्णय प्रसिद्ध केलेला आहे. तेव्हां या सर्व पंडितांच्या मतें भारतीययुद्ध हें इ. स. पूर्वी १२ व्या शतकाच्या उत्तरार्धाचे पूर्वी झालें आहे एवढी गोष्ट निर्विवाद मानण्यास कांहीं हरकत नाहीं.

भारतीय युद्ध व महाभारतग्रंथ यांमध्यें भारतग्रंथाचे कर्ते श्रीवेदव्यास यांच्या मतानें फक्त तीन वर्षांचें वडीलधाकुटपण आहे हें आदिपर्वांतील

त्रिणि वर्षैः सदोत्थायी कृष्णद्वैपायनो मुनिः । महाभारतमाख्यानं कृतवान् महदद्भुतम् ॥ आ. प. अ. ६२. ५.

या वचनावरून दिसून येतें. भारतीय युद्धानंतर तीन वर्षेंपर्यंत सतत उद्योग करून वेदव्यासांनीं आपला अद्भुत ग्रंथ निर्माण केला व तो आपल्या शुक सुमंतु, जैमिनि, वैशंपायन व पैल या शिष्यांस बदरिकाश्रमांत शिकवून तद्वारा त्याची प्रसिद्धि केली असा इतिहास महाभारतांत व्यासांनींच सांगितलेला आहे. अर्थात् या वचनानुसार शांतिपर्वानंतरचीं पर्वें श्रीव्यासकृत मूल भारतांत नव्हतीं असें ह्मणणें प्राप्त होतें. तीं मागाहून कथापूर्ततेस्तव त्यांच्या शिष्यांनीं घातलीं असावीं हें उघड आहे. वेदव्यासांनीं भारतग्रंथाची रचना केली त्यापूर्वीं ह्मणजे 'जय' संज्ञक भारतग्रंथाचे पूर्वीही एखादा 'भारतकथा' नामक लहानमोठा ग्रंथ असावा असें अनुशासन पर्व अध्याय १५० श्लो. ८० त खालील वाक्य भीष्मपितामहाचे भाषणांत आलें आहे त्यावरून दिसून येतें.

यो गोशतं कनकशृंगमयम् ददाति । विप्राय वेदविदुषे च बहुश्रुताय ॥
दिव्यां च भारतकथां कथयेच्च नित्यं । तुल्यं कुलं भवति तस्यच तस्यचैव ॥८०॥

भीष्माचे अवलोकनांत कोणती 'दिव्य भारतकथा' होती हें आतां समजणें शक्य नाहीं. तथापि विशेष मंगल प्रसंगीं या दिव्यभारत कथेचें पठण व श्रवण करण्याचा परिपाठ भारतकालीं होता हें भीष्मवचनावरून उघड आहे. कदाचित् हीं वचनें प्रक्षिप्त असण्याचाही संभव आहे.

एकदां व्यासकृत महाभारत ग्रंथांत कांहीं प्राक्षिप्त भाग आहेत असें मानलें व हें मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असें माझें स्पष्ट मत आहे. ह्मणजे मग आजच्या महाभारतग्रंथाच्या रचनेचा काल हा व्यासकृत भारताच्या कालावरून भिन्न आहे हें ओघानेंच प्राप्त होतें. ही गोष्ट कैलासवासी लोकमान्य टिळक, रा. ब. वैद्य प्रभृति पंडितांनींही प्रांजलपणें मान्य केली व नंतरच त्यांनीं प्रचलित महाभारतरचनेच्या कालासंबंधानें वरील चर्चा केलेली आहे. आज सौतिकृत महाभारत

एकलक्षात्मक ग्रंथ आहे असें समजण्यांत येतें. परंतु महाभारताचे एकलक्ष ग्रंथाची पूर्तता हरिवंशांतील १२५०० साडेबारा हजार ग्रंथाचा समावेश केल्याशिवाय होत नाही. तेव्हां एकलक्ष महाभारताचा कालनिर्णय करतांना हरिवंशाकडे दुर्लक्ष करून चालणें शक्य नाहीं. सौतिकृतमहाभारतकाल-निर्णयास साहाय्यक अशी महत्वाची गोष्ट ह्मणजे त्या ग्रंथांत सर्वत्र कालगणना नक्षत्रांनीं करण्यांत येते. मेषवृषभ या राशींच्या नांवांनीं करण्यांत येत नाहीं. अर्थात् राशीची गणनापद्धति सुरूं होण्यापूर्वीच या सौतिग्रथित समग्र एक लक्ष ग्रंथाची रचना झाली असावी असें अनुमान सयुक्तिकपणें काढण्यास हरकत नाहीं. तथापि वनपर्व अध्याय १९० यांतील खालील श्लोकांत 'राशि' शब्दाचा स्पष्ट उल्लेख आहे.

द्विजातिपूर्वको लोकः युगेण प्रभविष्यति ततः कालान्तरेऽन्यास्मिन् पुनर्लोकविवृद्धये ॥८९॥ भविष्यति पुनर्दैवमनुकूलं यदृच्छया। यदा सूर्यश्च चंद्रश्च तथा तिष्यबृहस्पती ॥९०॥ **एकराशौ** समेष्यंति प्रपत्स्यति तदा कृतम् कालवर्षीच पर्जन्यो नक्षत्राणि शुभानि च ॥९१॥ या श्लोकांतून कलियुग संपून कृतयुग केव्हां लागल हें सांगितलेलें आहे.

नीलकंठ चतुर्धर या प्रख्यात महाभारतव्याख्याकारानें "यदेति। यदा गुरुसूर्यचंद्राः यदा युगपत् पुष्यनक्षत्रमेष्यंति तदा कृतयुगप्रवृत्ति रित्यर्थः।" अशी वरील ९० व ९१ श्लोकांतील अनुक्रमे उत्तर पाद व पूर्वपाद भाषाव्याख्या केलेली आहे. परंतु 'युगपत् पुष्यनक्षत्र मेष्यंति' ह्मणजे सूर्य, चंद्र व गुरु हे एके काळीं पुष्यनक्षत्रांत येतील हा 'एकराशौ समेष्यंति' या पदांचा सरलार्थ होऊं शकत नाहीं. मूळांत तिष्य बृहस्पती असे द्विवचनांत सामासिक पद आहे. तेव्हां सूर्य, चंद्र, तिष्य व बृहस्पती हे जेव्हां एका राशींत येतील तेव्हां कृतयुगाचा प्रारंभ होईल. असा योग केव्हां येईल हें काढतां येणें शक्य नाहीं असें रा. ब. वैद्य प्रभृति ज्योतिषशास्त्रज्ञांचें मत आहे. सर्व महाभारतांत ज्या अर्थी कोठेंही मेषादि राशींचा उल्लेख आला नाहीं या अर्थी येथें राशीचा कांहीं तरी निराळाच अर्थ अभिप्रेत असला

पाहिजे. 'एकराशौ' हा अपपाठ असून त्याऐवजीं शुद्ध पाठ कांहीं तरी निराळा असला पाहिजे. 'समेष्यंति' हें गत्यर्थक क्रियापद असल्यामुळें व्यासानें 'एकराशौ' असा सप्तम्यन्त पदाचा उपयोग न करतां 'एकराशिम्' असा द्वितियान्त व्याकरणशुद्ध पदाचा उपयोग केला असता. यावरूनही हा अपपाठ असावा या तर्कास कांहीं अंशीं बळकटी मिळते. निरनिराळ्या वस्तु एकत्र ठेवल्या म्हणजे त्यांची राशि होते. रा. ब. वैद्य राशी म्हणजे युति असा अर्थ असावा असा तर्क करतात; पण हा युतियोग अशक्य आहे असा त्याच-बरोबर शेरा मारतात. म्हणजे त्यांनीं दिलेल्या अर्थानें श्लोक नीट लागत नाहीं अशीच पर्यायानें त्यांनीं कबुली दिली आहे. वरील राशि शब्दांनीं मेष, वृषभ इत्यादि राशींचा उल्लेख येथें अभिप्रेत नाहीं एवढें मात्र निश्चितपणें गृहीत धरावयास कांहीं हरकत दिसत नाहीं.

ज्याप्रमाणें राशींचा उल्लेख भारतांत आला नाहीं त्याचप्रमाणें सात वारांचीं नांवेंही आलेलीं नाहींत व कालगणनेंत त्यांचा कोठेंही उपयोग केलेला आढळून येत नाहीं. शांतिपर्वात व इतरत्र भारतकालीन कालगणना-पद्धतीचें सूक्ष्म वर्णन आहे तें असें. काष्ठा निमेषा दशपंच चैव त्रिंशत्तु काष्ठाम् गणयेत्कलां ताम् । त्रिंशत्कलाश्चापि भवेन्मुहूर्तो भागः कला पादशयश्च यःस्यात् ॥१२॥ त्रिंशन्मुहूर्तश्च भवेदहश्च रात्रिश्च संख्या मुनिभिः प्रणीता ॥ मासः स्मृतो रात्र्यहनीच त्रिंशत् संवत्सरो द्वादशमास उक्तः ॥१३॥ संवत्सरं द्वे त्वयने वदंति संख्याविदो दक्षिणमुत्तरंच ॥ इ.

इतरत्र 'पांच वर्षाच्या' युगाचा उल्लेख आलेला आहे. अर्धमास अथवा शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यांचाही कालगणनेंत उपयोग केलेला आहे. परंतु 'सप्ताहा' चा उल्लेख कोठेंच आढळून येत नाहीं. वाराचीं नांवें व 'सप्ताह' या कल्पना आर्यज्योतिषांत बाहेरून आलेल्या आहेत ही गोष्ट आतां सर्व ज्योतिर्विदांस मान्य आहे. 'राशि, वार व सप्ताह' या तीन नवीन गोष्टींना आर्यांच्या कालगणनापद्धतींत मान्यता मिळण्यापूर्वी एकलक्ष महाभारत ग्रंथाची रचना झाली होती असें अनुमान वरील विवेचनावरून

आपोआप निघतें. वर महाभारतांत वारांचीं नांवें आलीं नाहींत त्याचप्रमाणे 'सप्ताह' कल्पनेचा कालगणनेंत निर्देश नाहीं हें दाखविलें आहे. परंतु भीष्मपर्व अध्याय ३ मध्यें युद्धसूचक अरिष्टांचें वर्णन करतांना खालील श्लोक आलेला आहे.

चंद्रादित्या बुधौ ग्रस्तौ एकान्हाहि त्रयोदशीम्। अपर्वाणि ग्रहं यातौ प्रजासंक्षय मिच्छतः ॥३८॥

यांतील 'एकान्हा' या पदाचा अर्थ माझे व्यासंगी मित्र नागपूरचे विद्वद्रत्न केशवरावजी दफ्तरी यांनीं 'एकाच वारीं' असा केला आहे. वाराची माहिति महाभारतकालीं अशक्य नव्हती असें दाखविण्याकरितां 'अथर्वज्योतिषांत वार सांगितले आहेत' असें विधान त्यांनीं कै. शंकर बाळकृष्ण दीक्षितकृत भारतीय ज्योतिषाच्या इतिहास पान ९९ च्या आधारें केलें आहे.

महाभारताच्या कर्त्यास वारांची माहिति होती किंवा नव्हती हें सिद्ध करण्यास अथर्वज्योतिषाचा आधार घेण्याचें मला कांहींच प्रयोजन दिसत नाहीं. त्यांना वाराची माहिति असती तर जेव्हां जेव्हां स्पष्ट कालनिर्देश करण्याचा प्रसंग उत्पन्न झाला तेव्हां द्वैपायन व्यासांनीं अथवा वैशंपायन किंवा सौति यांनीं वाराचा स्पष्ट उल्लेख केलाच असता. भारतीय युद्धाचा दिवस पांडववनवासाचा दिवस, विराटनगरांत पांडव प्रकट होण्याचा दिवस, भीष्मनिधनाचा दिवस, श्रीकृष्णनिर्याणाचा दिवस इत्यादि अनेक महत्वाचे दिवस भारतांत आलेले आहेत व त्या त्या वेळच्या नक्षत्रांची स्थिति शक्य तितकी तपशीलवार व सूक्ष्म ग्रंथकर्त्यानें दिलेली आहे. वारांचाच तेवढा उल्लेख केलेला आढळून येत नाहीं. किंबहुना सप्ताहाची कल्पना काल-गणनेंत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कोठेंही असल्याचें कोणतेंही प्रमाण मत्र ग्रंथांत कोठेंही दृष्टीस पडत नाहीं. अशा स्थितींत 'एकान्हा' याचा 'एकाच वारीं' असा अर्थ करणें सयुक्तिक नाहीं. माझ्या मतें हा श्लोक चुकून येथें पडलेला आहे. ही चूक लक्षांत येण्याकरितां भीष्मपर्वातील अशुभ

सूचक ग्रहस्थितीच्या वर्णनाचे श्लोक २६ पासून ३३ पर्यंतचे खालीं देत आहे. त्यावरून वर उद्धृत केलेला २८ वा श्लोक हा ३३ व्या श्लोकाची निवळ पुनरुक्ति आहे हें वाचकाच्या लक्षांत सहज येईल.

सप्तर्षीणामुदाराणाम् समवच्छाद्यते प्रभा ॥ २६ ॥ संवत्सरस्थायिनौच ग्रहौ प्रज्वलितावुभौ ॥ विशाखाया: समीपस्थौ बृहस्पति शनैश्चरौ ॥ २७ ॥ चंद्रादित्यावुभौ ग्रस्तावेकान्हा हि त्रयोदशीम ॥ अपर्वणि ग्रहं यातौ प्रजासंक्षयमिच्छत : ॥ २८ ॥ कृतिकां पीडयंतस्तीक्ष्णौ नक्षत्रं पृथिवीपते ॥ अभीक्ष्णवाता वायन्ते धूमकेतुमवस्थिता : ॥ २९ ॥ विषमंजनयन्त्येत दाक्रंदजननं महत् ॥ त्रिषु सर्वेषु नक्षत्रं नक्षत्रेषु विशांपते ॥ ३० ॥ गृध्र: संपतंत शीर्षे जनयन भयमुत्तमम् ॥ ३१ ॥ चतुर्दशीं पंचदशीं भूतपूर्वांच षोडशीम ॥ इमां तु नाभिजानेहिममावास्यां त्रयोदशीम् ॥ ३२ ॥ चंद्रसूर्या-वुभौग्रस्तावेकमासीं त्रयोदशीम ॥ अपर्वणि ग्रहणैतौ प्रजा: संक्षिपयिष्यत: ॥ ३३ ॥ मांसवर्षे पुनस्तीत्तमासीत्कृष्णचतुर्दशीम् ॥ शोणितै र्वक्रसंपूर्णा अतृप्तास्तत्र राक्षसा : ॥ ३४ ॥

२८ वा श्लोक व ३३ वा श्लोक हे दोन्ही बहुतेक शब्दश: एकच आहेत हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. या पुनरुक्तीचें कांहींच प्रयोजन दृष्टीस पडत नाहीं लेखकाचे हस्तदोषानें दोंपैकीं कोणता तरी एक श्लोक पुनरुक्त झालेला आहे. व एकदां ही पुनरुक्ति पाठांत शिरल्यानंतर अव्युत्पन्न लेखकांनीं दोन श्लोकांच्या पाठांत किंचित भेद उत्पन्न केले असाव असें दिसतें. ३३ व्या श्लोकांत जो ‘ एकमासीम् त्रयोदशीम् ’ असा पाठ आहे त्यांतच ‘ एकान्हा त्रयोदशीम ’ असा लहानसा फरक करून २८ व्यांत घातलेला आहे. हा फरक ज्या काळांत आला असेल त्या वेळी वारांचा प्रचार रूढ झाला असावा व त्या मुळेंच या द्विरुक्तीला कांहीं तरी साभिप्रायत्व आणण्यासाठीं एकमासीम्च्या ऐवजीं एकान्हा असा पाठ घातला असावा. या शिवाय एकाच महिन्यांत शुक्लपक्ष व कृष्णपक्ष या प्रत्येक पक्षांत दोन तिथीचा क्षय या बद्दल आश्चर्य व विस्मय दाखविणारें वचन हें ३२ श्लोकांत आलेलें आहे. येथें ही माझ्या मतें

श्लोकांचा अनुक्रम बदलावयास पाहिजे. ३३ वा श्लोक हा ३२ वा व ३२ वा हा ३३ च्या स्थानीं असायला पाहिजे परंतु २९–३० व ३१ हे श्लोक २७ पुढें ओघानें येऊं शकतात. व त्यानंतर चंद्रसूर्याला पर्वकाळ नसतां त्रयोदशीला एकाच महिन्यांत ग्रहणें लागलीं हें विधान करून नंतर असा अशुभ सूचक उत्पात पूर्वी आमचे पाहण्यांत केव्हांही आला नाहीं असें म्हटलें आहे. तें सरळ दिसतें व नंतर ओघानेंच कृष्णचतुर्दशीस मांसवृष्टि झाल्याचें वर्णन केलेलें आहे. तेव्हां वर्णन संदर्भानें देखील २८ वा श्लोक हा त्या स्थळीं अनाठायीं दिसतो. माझ्यामतें मूळ पाठ ३३ व्या श्लोकांत दिलेला आहे. म्हणजे 'एकमासीम् त्रयोदशीम्' हाच पाठ बरोबर आहे. 'एकान्हा त्रयोदशीम्' हा पाठ बरोबर नाहीं. भारतीय युद्धाचे वेळीं जे उत्पात झाले तेच उत्पात श्रीभगवान् श्रीकृष्णनिर्याणाचा भीषण प्रसंग उत्पन्न झाला त्या वेळीं दिसावयास लागले असा मौसलपर्वांत अध्याय २ मध्ये स्पष्ट उल्लेख आहे.

एवं पश्यन् हृषीकेशः संप्राप्तं कालपर्ययम् त्रयोदश्याममावास्यां तान् दृष्ट्वा प्राब्रवीदिदम् ॥१८॥ चतुर्दशी पंचदशी कृतेयं राहुणा पुनः ॥ प्राप्ते वै भारते युद्धे प्राप्ता चाद्यक्षयत्यनः ॥१९॥ विमृशन्नेव कालं तं परिचिंत्य जनार्दनः। मेने प्राप्तं स षष्ट्त्रिंशम् वर्षं वै केशिसूदनः ॥२०॥ जर मूळांतच 'एकान्हा हि त्रयोदशीम्' असा पाठ असलेला श्लोक असतां तर मौसलपर्वांत भारत-युद्धकालीन भयानक उत्पातांचा उल्लेख करतांना 'एकान्हा' या गोष्टीचा निर्देश खात्रीनें केला असतां. तेव्हां २८ वा श्लोक हा एकाद्या लेखकाच्या दृष्टिदोषामुळे व हस्तदोषामुळें प्रथमतः आला व नंतर त्यांत अपपाठांचा प्रवेश झाला हें उघड आहे. त्यामुळें त्या श्लोकावरील 'एकान्हा' या पदावर 'एकाच वारी' ही रा. दफ्तरी यांनीं केलेली व्याख्या कोशदृष्ट्या बरोबर असली तरी ग्रंथसंदर्भदृष्ट्या योग्य नाहीं असेंच मला वाटतें व या एकाच संशयित पदाच्या पायावर भारतरचनाकालीं 'वारांची' माहिति होती अशा तर्कांची प्रतिष्ठा सुस्थित होणार नाहीं. अथर्ववेदांगज्योतिषांत योग, करण, वार यांची

माहिती दिली आहे पण 'राशी' चा उल्लेख नाहीं. त्यावरून हा ग्रंथ महाभारतरचनाकालानंतर परंतु ग्रीकांचा संबंध येण्यापूर्वीच्या कालांत अस्तित्वांत आला असावा असा तर्क होतो. लगधकृत वेदांगज्योतिष किंवा कृष्णयजुर्वेदीय वेदांगज्योतिष या ग्रंथाइतका अथर्व वेदांगज्योतिष प्राचीन नाहीं हें रा. व. वैद्य यांनीं 'वैदिकवाङ्मयाचा इतिहास' या नवीन प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांत स्पष्टपणें म्हटलें आहे हें स्वाभाविक आहे.

या सर्व विवेचनाचा निष्कर्ष इतकाच कीं एकलक्ष महाभारतग्रंथ-रचनेचा काल आर्यज्योतिषांत राशि, वार व सप्ताह यांचा प्रवेश होण्या-पूर्वीचा असला पाहिजे.

ज्योतिषशास्त्रावरील सूर्यसिद्धांतासारखे प्रमुख ग्रंथ इ. स. ३०० च्या नंतरचे आहेत व या ग्रंथांतून ग्रहस्थितीचा निर्देश करण्याकरितां नक्षत्राऐवजीं राशींचाच उपयोग केलेला आहे. प्रख्यात जगज्जेता ग्रीसचा बादशहा शिकंदर यानें हिंदुस्थानावर खि. श. पूर्व ३२३ सालीं स्वारी केली व त्या नंतरच ग्रीक संस्कृतीचा व शास्त्रीयज्ञानाचा भरतखंडवासी आर्यलोकांस परिचय झाला. तेव्हां ग्रीक लोकांचा भारतवासीयांस परिचय होण्यापूर्वी महाभारताची रचना पूर्ण झाली असावी. महाभारतचा काल इ. स. पूर्वी निदान ३०० चे पलीकडील आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

याचे ही मागें महाभारतरचनेचा काल नेतां येईल कीं नाहीं हें आपणांस पाहावयाचें आहे. इ. स. पूर्व ४८० या वर्षी भगवान् गौतमबुद्ध यांचें देहावसान झालें ही गोष्ट आतां सर्व प्राच्य शास्त्रज्ञांना संमत झाली आहे असें समजावयास कांहीं हरकत दिसत नाहीं. देहपाताचे समयीं त्यांचे वय ८० वर्षांचें होतें असें 'अश्वघोषकृत बुद्धचरित्र' प्रभृति ग्रंथावरून समजतें. इ. स. पूर्व ५६० चे सुमारास गौतमबुद्धाचा जन्म झाला. त्यांनी आपले वयाच्या उत्तरार्धापासून बौद्धधर्माचा प्रसार करावयास सुरुवात केली असें मानलें तर निदान इ. स. पूर्व ५२५ पासून तो इ. स. पू. ४८० पर्यंत त्यानें हें कार्य केलें असें म्हणावयास हरकत नाहीं. इ. स. पूर्व ५२५ पासून

बौद्धधर्म या देशांत सरासरी इ. स. ५०० पर्यंत म्हणजे १००० वर्षे कम अधिक प्रमाणांत नांदत होता. त्यानंतर बुद्धधर्माचा र्‍हास व्हावया लागला व इ. सनाचे ७ व ८ वे शतकांत कुमारिलभट्ट व श्री. म . शंकराचा यांनीं प्रज्वलित केलेल्या ज्ञानकुंडांत त्याचे उरलेले अवशेष भस्मसात् झाले

महाभारतांत दशावताराचा उल्लेख अनेक ठिकाणीं आलेला आ पण ' गौतमबुध्दा ' चा निर्देश त्यांत मुळीच नाहीं. यावरून गौतमबुध्दाच धर्मसंस्थापक ईश्वर अवतार म्हणून मान्यता मिळण्याचे पूर्वीच महाभार ग्रंथाची रचना पूर्ण झाली असावी असें सरळ अनुमान निघतें. शांतिप अध्याय ३३९ मध्यें खालील श्लोकांतून दशावतारांचीं नांवें दिलेली आहेत

हंसः कूर्मश्च मत्स्यश्च प्रादुर्भावाद्द्विजोत्तम ॥ ३ ॥ वराहो नरसिंहश्च वामनो राम एवच ॥ रामो दाशरथिश्चैव सात्वत : कल्किरेवच ॥४॥

यांत ' हंस ' हा पहिला अवतार व दाशरथि राम, कृष्ण व कल्कि अनुक्रमें ८ वा ९ वा व १० वा अवतार आहेत.

' महाभारत ग्रंथांत जीं ज्योतिर्विषयक वचनें आहेत त्यांच्या आधा गणित करून आणि चिनी प्रवेशांनीं आपल्या प्रवासवृत्तांत दिलेल्या माहि तीच्या आधारें आणि पुराणांतील राजांच्या वंशावळी इत्यादिकांच्या आधा पुष्कळ पंडितांनीं भारतीय युद्धाचा काल ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे परंतु एकलक्ष महाभारत ग्रंथरचना ही व्यासकृत भारतानंतर बर्‍याच काळा झाली असली पाहिजे ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे गणिताने व इतर रीतीं सिद्ध होणार्‍या काळाचा या कामीं फारसा उपयोग होत नाहीं.

तथापि प्राचीन बौद्धग्रंथांतून ' आख्याना ' ( आख्यान पाठ )च उल्लेख येतो व त्याचा अर्थ रामायण—महाभारतादिकांचे पठण असाच सांप्रदायिक बौद्ध टीकाकारांनीं केलेला आहे असें र्‍हीस डेव्हिड्स हा आपल्या ' बुद्धिस्टइंडिया ' या ग्रंथांत नमूद करतो. ' र्‍हीस डेव्हिड ' या ग्रंथकाराचें स्वतःचें मत जरी रामायण व महाभारत हे ग्रंथरूपांत ख्रिस्ती शकानंतर अ

किंवा ४ थ्या शतकांत अस्तित्वांत आले असावे असें आहे. तथापि वरील ख्रिस्तिशकाच्या ५ व्या शतकांत असलेला बौद्ध सांप्रदायिक टीकाकार हा महाभारत ग्रंथ अत्यंत प्राचीन बौद्धवाङ्मयांत उल्लेखिलेला आहे अशी स्पष्ट कबुली देतो हें भारतरचनेच्या कालनिर्णयाचे दृष्टीनें फार महत्वाचें आहे.

कौटिल्यकृत अर्थशास्त्र हा ग्रंथ थोडे वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेला आहे. आर्य चाणाक्य यानें नव नन्दाचा अंत करून मौर्यचंद्रगुप्ताला इ. स. पूर्व ३२२ अथवा ३२५ च्या सुमारास गादीवर बसविलें. त्यांनीं रचलेल्या कौटिलीय अर्थशास्त्रग्रंथाचे ६ व्या इंद्रियजय नामक अध्यायांत इंद्रियजयाच्या महत्व-सिद्धीकरितां जीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत तीं पैकीं सर्व उदाहरणें महाभारत या ग्रंथांतील आख्यानांतूनच घेतलेलीं आहेत. महाभारतांतील अनुशासन पर्वांमधील सहस्त्रार्जुनाला सांगितलेला ब्राम्हणप्रशंसापर अध्याय १५०-५१-५२-५३ इत्यादि ग्रंथकारानें समोर ठेऊन आपल्या ग्रंथाचा हा ६ वा अध्याय लिहिला असावा अशी शंका येण्यासारखें साम्य या दोन ग्रंथांतील या विशिष्ट भागांत दिसून येते. विशेषतः अध्याय १५३ श्लो. ११ दंडकानाम् महद्राज्यं ब्राम्हणेन विनाशितम् ॥ तालजंघ महाक्षत्रमौर्वेणैकेन नाशितम् ॥ ११ ॥ हा श्लोक व कौटिलीय अर्थशास्त्र अध्याय ६ मधील यथा दाण्डक्यो नाम भोज: कामात् ब्राम्हणकन्यामभिमन्यमानस्स बंधुराष्ट्रो विननाश। ......। तालजंघश्च भृगुषु. ॥ हे वाक्य यांत केंवढें साम्य आहे. दाण्डक्य भोज, कराल वैदेह, जनमेजय, तालजंघ ऐल सौवीर अजबिंदु, रावण दुर्योधन हैहयार्जुन, वातापि वृष्णिसंघ यांचा उल्लेख कौटिल्यानें केलेला आहे व त्या सर्वांच्या विनाशाच्या कथा महाभारतांत दिल्या आहेत. याच्या उलट जितेंद्रियत्वामुळें अक्षय्य मही भोगणाऱ्या नाभाग अंबरीषाचें उदाहरण दिलें तें देखील भारतांतूनच घेतलें आहे. तेव्हां महाभारत हा ग्रंथ मान्य व प्रमाणग्रंथ म्हणून याचे अगोदर निदान दोनतीन शतकें तरी भरतखंडांत प्रसिद्ध असल्याशिवाय कौटिल्यासारख्या स्वतंत्र ग्रंथकृत् पंडितानें त्यांतील आख्यानकें स्वमतपुष्ट्यर्थ आपल्या ग्रंथांत उध्दृत केली नसतीं.

खिस्तापूर्वी निदान ५ व्या शतकांत तरी महाभारतग्रंथरचना ही पूर्ण झाली होती असें मानण्यास हरकत नाहीं.

परंतु या मताविरुद्ध कित्येक पंडित असा आक्षेप घेतात कीं महाभारतांत बौद्ध मतानिदर्शक असे उल्लेख कधीं प्रकट आणि कधीं प्रच्छन्न अशा रीतीनें केलेले आढळतात. या तऱ्हेचें मत केवळ आधुनिक विद्वानांचेंच आहे असें नाहीं. तर महाभारताचे प्रख्यात टीकाकार नीळकंठ चतुर्धर यांनी आपल्या भारतभावदीपिकेंत अष्टावक्र व बंदी यांच्या संवादावर टीका करतांना 'बंदी' हा बौद्धमताचा पुरस्कार करीत आहे व अष्टावक्र त्याचें खंडन करीत आहे अशी टीप देऊन नंतर त्या ग्रंथावर व्याख्या केलेली आहे. परंतु नीलकंठ चतुर्धराला बंदीच्या पूर्वपक्षांतून बौद्धमतसिद्धांताचें दिग्दर्शन करण्यांत यत्किंचित् देखील यश आलें नाहीं हें ती टीका वाचून पाहणाऱ्यास सहज कळून येईल असें मला वाटतें. आधुनिक विद्वानांपैकीं कित्येकांना शांतिपर्व व अनुशासनपर्व यांतील पुष्कळशा विवेचनांत कांहीं अंशी तरी बौध्दमताची छाप पडल्याचा भास होतो. इतकेंच नाहीं तर कित्येक ठिकाणीं बुध्द, प्रतिबुध्द इत्यादि शब्दांचा प्रत्यक्ष उपयोग केलेला आहे.

शांतिपर्व अ. २२७.११०. नाहमेतादृशं बुध्दं हन्तुमिच्छामि बंधनं असे इंद्रानें बलीच्या प्रशंसापर उद्गार काढले आहेत. त्याचप्रमाणें शांतिपर्व अध्याय ३०८ यांत श्लो. २२ पर्यंत बुध्दमान अबुध्दमान इ. परिभाषा स्पष्टीकरण व बुध्दलक्षण विचार सांगितलेला आहे. शांतिपर्वांतील आपध्दर्मपर्वांत अध्याय १६७ मध्यें षड्जगीताध्याय आहे. त्यांतील युधिष्ठिराचे भाषणांतील अखेरचें कांहीं श्लोकांतील विचार व विशेषत: 'बुध्दा:निर्वाणपरा:' इत्यादि उल्लेख बौद्धमतानुवादी भासतात. शांतिपर्व अध्याय १९८, श्लोक ५९ मध्यें 'एतद्बुध्दा भवद्बुध्द: किमन्यत् बुद्धलक्षणम' असें एक वाक्य आहे. यावर कै. लोकमान्य टिळक यांनीं आपला अभिप्राय दिला आहे कीं या शब्दांचा त्याठिकाणीं ज्ञानी जाणता किंवा स्थितप्रज्ञ पुरुष एवढाच अर्थ उद्दिष्ट आहे. बौद्धधर्मांतून तो शब्द घेतलेला दिसत नाहीं. किंबहुना

बौद्धांनींच हे शब्द वैदिक धर्मांतून घेतले असावेत असें मानण्यास सबळ कारण आहे. (गी. र. १ मा आवृत्ति ५५६.)

अतएव महाभारतरचेनचा काल बुद्धपूर्व आहे असें मानण्यास वरील उल्लेख बाधक नाहींत. परंतु वनपर्वांत अध्याय १९० मध्यें कलिवर्णनांत कांहीं श्लोकांतून 'एडूका' चा उल्लेख आलेला आहे. त्यावरून 'लक्षग्रंथात्मक' महाभारत रचनाकाल हा बौद्धानंतरचा परंतु गौतमबुद्धाचा दशावतारांत समावेश होण्याच्या पूर्वीचा असा मानणें योग्य होईल असें मत कै. लोकमान्य टिळक यांनीं दिलें आहे. (गी. र. ५५६) रा. ब. वैद्य यांचेंही मत जवळ जवळ असेंच आहे. 'एडूक' ह्मणजे ज्याला पालींत डागावा अथवा डागोबा ह्मणतात अशा बौद्धस्तूपांचा वाचक तो शब्द आहे. ह्या शब्दाचा हा एकच अर्थ सदोदित होता कीं काय याची किंचित चर्चा करणें अवश्य आहे.

या चर्चेस आरंभ करण्यापूर्वी वनपर्वांतील ज्या श्लोकांतून 'एडूक' शब्द आलेला आहे ते श्लोक पूर्णपणें उद्धृत केल्याशिवाय वाचकांस पुढील विवेचन समजणें सुलभ जाणार नाहीं.

विपरीतश्च लोकोऽयं भविष्यत्यधरोत्तर **एडूकान् पूजयिष्यंति** वर्णयिष्यंति देवताः ॥ ६५ ॥ शूद्राः परिचरिष्यंति न द्विजान् युगसंक्षये आश्रमेषु महर्षीणाम् ब्राम्हणावसथेषुच ॥ ६६ ॥ देवस्थानेषु चैत्येषु नागानामालयेषुच **एडूकचिन्हा पृथिवी न देवगृहभूषिता** ॥ ६७ ॥ **भविष्यति** युगे क्षीणे तद्युगांतस्य लक्षणम् ॥ ६८ ॥

कलींत लोक देवतांचा अव्हेर करतील व **एडूकांना भजतील.** जेव्हां कलीयुगाचा अंत होण्याचा समय येईल तेव्हां ऋषींच्या आश्रमांतून, ब्राह्मणाच्या घरांतून, देवालयांतून चैत्यातून किंवा नागमंदिरांतून सुद्धां शुद्र हे द्विजांची परिचर्या करणार नाहींत. तें युग संपण्याच्या सुमारास तर सर्व **पृथिवी एडूकचिन्हयुक्त होईल.** देवालयांनीं भूषित राहणार नाहीं व तेच त्या कलियुगाचें अंताचें लक्षण समजावें.

एडूक शब्दाचा अमरकोशांतून जो अर्थ दिलेला आहे तो असाः—

‘ भित्ति : स्त्री कुड्यमडूकं यदंतर्न्यस्तकीकसम् ’

नीलकंठानें वरील श्लोकावरील आपले व्याख्येंत हें व अमरकोशांतील वाक्य एडूक शब्दाची व्याख्या करतांना उद्धृत केलेलें आहे. ज्या मृण्मय-भिंतीचें आंत ( आस्थि ) हाड ठेवलेलें असतें त्या भिंतीला ‘ एडूक ’ संज्ञा आहे असा अमरकोशांतील वाक्यांचा अर्थ आहे.

आतां बौद्धधर्माच्या बुद्धांच्या मुख्य आचारविचारांचा ज्यांना थोडासा तरी परिचय असेल त्यांस ही गोष्ट पूर्णपणें अवगत असली पाहिजे कीं बुद्धाच्या भस्मीभूत देहाची राख, अस्थि,दांत इत्यादिकांवर एक तऱ्हेच्या मातीचे मनोरे बांधण्याचा संप्रदाय बौद्ध धर्मीयांनीं सुरू केला होता. या मातीच्या ऊंचवट्यास स्तूप असें ह्मणत. सांची, भरहत वगैरे ठिकाणीं असे स्तूप आज आहेत. व त्या जागा बौद्ध लोकांत फार पूज्य व पवित्र मानल्या जातात. पुढें पुढें बौद्धधर्मीय कोणत्याही थोर पुरुषाच्या मृतदेहाच्या अवशेषांवर असे स्तूप बांधण्याचा परिपाठ पडला ही गोष्टही बौद्ध धर्माच्या इतिहासावरून दिसतें. अमरकोशांत जें एडूकाचें लक्षण दिलेलें आहे तें वरील स्तूपाच्या विशेष लक्षणाशीं तंतोतंत असल्यामुळें एडक ह्मणजे बौद्ध स्तूप ज्याला सिंहली भाषेंत डागावा अथवा डागोबा ह्मणतात त्याचाच संस्कृत पर्याय शब्द आहे असें वाटणें स्वाभाविक आहे. द्विरूप कोशांत ‘ भवेदेडोकमेडुकंच ’ एडोक, एडूक व एडुक अशीं या एका शब्दांचीं तीन रूपें असल्याचें लिहिलें आहे हें भानुजी दीक्षितानें आपल्या अमरकोशावरील व्याख्येंत जें त्या कोशांतील अवतरण दिलेलें आहे त्यावरून दिसून येतें.

डागवा अथवा डागोबा हा सिंहली शब्द संस्कृत ‘ धातुगर्भ ’ या शब्दावरून बनलेला आहे. असा कै० लोकमान्य टिळकांचा तर्क आहे. व तो तर्क बरोबर आहे हें काशी विद्यापिठांतील प्राचीनसंस्कृतीशास्त्राचे अध्यापक माझे मित्र प्रो० अळतेकर यांनीं मी त्यांना प्रश्न विचारल्यावरून पत्रद्वारा लिहून कळविलेलें आहे. तेव्हां वास्तविक पाहतां ‘ डागोबां’चा

वाचक संस्कृतपर्याय शब्द 'धातुगर्भ' हाच आहे. व जर डागोबाचा निर्देश करावयाचा असला तर संस्कृतज्ञ 'एडूक' असा एक नवीन शब्द न बनवितां ज्या संस्कृत शब्दाचा डागोबा हा अपभ्रंश आहे त्याच शब्दाचा उपयोग त्यांनीं केला असता. कारण पाली ही संस्कृतजन्य भाषा कांहीं अशी कृत्रिम ह्मणजे प्रचारांतील प्राकृत मागधीहून थोडीशी भिन्न असल्याचें बौद्ध धर्माभिमानी पाश्चात्य पंडित मान्य करतात. ज्या काळांत बुद्धाचे डागोबा चोहींकडे दिसावयास लागले त्या काळांत संस्कृत ही कांहीं लोकांच्या नित्य प्रचारांतील भाषा होती असें दिसत नाहीं. तेव्हां डागोबाला वाचक असा शब्द त्यांनीं नवीन न बनवितां भाषेंत पूर्वीपासून क्षुद्र पूज्यवस्तुनिदर्शनार्थ रूढ असलेल्या शब्दाचाच या कामीं उपयोग केला असणें अधिक संभवनीय आहे. तेव्हां 'एडूक' शब्द 'डागबा' याचा वाचक होण्यापूर्वी दुसऱ्या कोणत्या तरी अर्थात् संस्कृत भाषेंत रूढ असला पाहिजे किंवा 'डागबा' ची कल्पना आहे अशाच तऱ्हेचा कांहीं प्रकार बौद्धाचे पूर्वीपासून भरतखंडांत असून त्याचा वाचक ह्मणूनही 'एडूक' शब्द रूढ असला पाहिजे असा तर्क संभवतो.

'उलूकादयश्च' (४४१) या उणादिसूत्रानें 'उकण्' प्रत्यय लागून 'ईडस्तुतौ' या धातूपासून 'एडूक' शब्द व्याकरणदृष्ट्या सिध्द होतो असें भट्टोजी दीक्षित या विख्यात वैयाकरणाचें मत आहे. याचा अर्थ उलूकादि शब्दगणांत 'एडूक' या शब्दाचा समावेश आहे असें दीक्षितांचें मत आहे व यासंबंधानें आणखी एक विशेष नियम लक्षांत ठेवण्यासारखा आहे तो असा कीं:—हा ऊक अथवा ऊकण् प्रत्यय लागून जितके शब्द बनलेले आहेत त्यांचा मध्यस्वर विकल्पानें ऱ्हस्व देखील होतो. असा एक नियम सिद्धांत कौमुदीवरील तत्वबोधिनी टीकेंत स्पष्टपणें नमूद केलेला आहे.

बाहुलकादु प्रत्यये ऱ्हस्वमध्योपि। जम्बूकं जम्बुकम् प्राहुः शम्बूकमपि शम्बुकम्' इति द्विरूपकोशः। जम्बूकधूकादयोऽप्यत्रैव द्रष्टव्याः

तेव्हां उलूकादि किंवा वधूकादि गणांत 'एडूक' शब्द समाविष्ट आहे असें मानण्यास बौद्धांच्या 'डागोबा' अस्तित्वांत येण्यापूर्वीच 'एडूक' शब्द कांहीं विशेष अर्थी संस्कृत भाषेत प्रचलित होता असें ह्मणावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं. या ऊक अथवा ऊकण् प्रत्ययाचा उपयोग कांहीं तरी न्यूनता, व्यंग्य किंवा दोष दाखविण्याकरितां कित्येक धातुसाधित शब्दांपुढें केला जात होता. निदान या प्रत्ययानें बनलेला शब्द प्राणिवाचक असो वा इतर असो त्यामध्यें कांहीं तरी न्यूनार्थबोधकत्व असावें असें दिसतें. उदाहरणार्थ मरूको मृग : काणूक : काक : उलूक : पक्षिविशेष : वावदूक : भल्लूक : शम्बूक : मण्डूक : इ० हा प्रत्यय किंचित् क्षुल्लकत्व किंवा तिरस्कारदर्शित्व व्यक्त करतो. तेव्हां 'एडूक' 'ईडस्तुतो' या धातुपासून झाला असें मानलें तरी त्याचा उपयोग ज्याची पूजा शिष्ट आर्यांस मान्य नाहीं किंवा प्रशस्त नाहीं अशा कोणत्या तरी पूजनीय वस्तूला उद्देशून करण्यांत येत असला पाहिजे. निवळ व्याकरणव्युत्पत्तिदृष्ट्या विचार केला असतां वरीलप्रमाणें तर्क संभवतो व ह्मणूनच जेव्हां डागोबाची स्थापना व्हावयास लागली तेव्हां त्याला हा 'एडूक' शब्द ओघानेंच लावण्यांत आला असावा.

डागोबा अथवा डागोबा संबंधानें ऱ्हिस डेव्हिड या ग्रंथकारानें खालील विधानें आपल्या 'बुद्धिस्ट इंडिया' या ग्रंथांत केलेलीं आहेत.

Some-times Dagabas or topes were erected in these cemetries. But more usually they were put up in the suburbs, either in private grounds or in cases of special honour at some place where four cross-roads meet. We are accustomed to think of them as especially Budhist monuments. They were in fact pre-Budhistic; and indeed a slight modification of a worldwide custom. The use of barrows or cairns to mark a place of internment was not universal. but it was certainly very frequent in Ancient times. And marked differences in their shape or size were rightly held to be evidence of race.

The Aryans in India still used the round form. And the only curious point is that in India at the period under discussion, certain sections of the community were beginning to make their solid brick-structures instead of heaps of earth or of stones covered with earth

as had been the custom in more ancient times. This was done more especially by those who had thrown off their allegeince to the priests and were desirous to honour the memory of their teachers who were leaders of thought or reformers or philosophers.

Rhys Daird Budhist India. pages, 90-92.

ज्यांना पुढें 'डागबा' हें पाली नांव देण्यांत आलें असे मूणमयस्तूप विशिष्ट पाखंडवादी मतप्रसारकाचे स्मृत्यर्थ उभारण्याची ही चाल भरतखंडांत वेदकालापासून रूढ होती याबद्दल ऱ्हिस डेविड यांनीं शुक्लयजुर्वेद अध्याय ३५ याचा आधार दाखविला आहे.

बौद्धकालांत डागोबा स्थापणें हा प्रचार अधिक प्रचलित व सार्वत्रिक झाला असेल तरी तो प्रकार बौद्धकालापूर्वींही हिंदुस्थानांत चालू होता, हें यावरून सिद्ध आहे. एवढी गोष्ट एकदां सिद्ध धरली म्हणजे 'एडूक चिन्हान्विता' या पदामुळें महाभारतग्रंथरचना बुद्धोत्तरकाळांत झाली असली पाहिजे असें अनुमान करण्याचें कांहींच कारण राहत नाहीं.

माझ्या मतें 'एडूक' शब्द महाभारतरचनाकालीं कशाचा वाचक होता हें समजावून घेण्यास अमरकोश किंवा द्विरूपकोश इत्यादि बुद्धोत्तर-कालीन कोशांकडे पाहण्याची मुळींच जरुरी नाहीं. प्रत्यक्ष महाभारतांतच इतरत्र असलेल्या एकदोन शब्दांवरून 'एडूक' या पदाच्या खऱ्या अर्थावर बराच प्रकाश पडण्यासारखा आहे.

गदापर्वांतील अध्याय ४६ मध्यें मातृकांची म्हणजे अवैदिक व अनार्यपूज्य शुद्र देवतांची लांबलचक नामावळी दिलेली आहे. तीमधील श्लोक १३

धनदा सुप्रसादाच भवदाच जलेश्वरी । एडी भेडी समेडीच वेताल-जननी तथा ॥ ग. प. अ. ४६,१३

'एडी, भेडी, समेडी' या नांवाच्या अनार्यांना पूज्य असलेल्या क्षुद्र देवता होत्या. त्यांचा उल्लेख वेतालजननी बरोबर केलेला आहे यावरूनही त्या 'एडी भेडी समेडी' यांचे स्वरूपाची वाचकांस कल्पना करतां येण्यासारखी आहे. त्यांच्या स्वभावाचें, निवासस्थानाचें व गुणधर्मांचें बरेच विस्तृत वर्णन या

अध्यायांत आलेलें आहे. परंतु मी यांतून एकदोन श्लोकच तेवढे वाचकांस त्याची थोडीतरी कल्पना यावी ह्मणून उतरून घेतों.

अचिंत्यबलवीर्याश्च तथाऽचिंत्यपराक्रमाः वृक्षचत्वरवासिन्यश्चतुष्प–थनिकेतनाः ॥४१॥ गुहास्मशानवासिन्यः शैलप्रस्त्रवणालयाः ॥४२॥

ग. प. अध्याय ४६

मोठ्या झाडांचे पार, चौरस्ते, दऱ्या, स्मशान पर्वत व नदी हीं त्यांचीं निवासस्थानें मानलीं जात होतीं; व त्या त्या ठिकाणीं त्यांना पूज्य मानणारे लोक कांहींतरी विशेष तऱ्हेचे स्तूप चिन्हें वगैरे करीत. या श्लोकांतील चतुष्पथनिकेतनाः स्मशानवासिन्यः हीं विशेषणें ऱ्हिस डेव्हिडच्या ग्रंथांतील वर दिलेल्या अवतरणांतील in the cemetries. or where the four cross-roads meet या डागवा स्थापण्याकरितां प्रशस्त मानलेल्या स्थलवर्णनाशीं तंतोतंत जुळतात हें चाणाक्ष वाचकांच्या चटकन् लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. अशा एडी, भेडी, समेडी प्रभृति देवतांच्या पूजनीय स्थानांचा आर्यलोक तिरस्कारानें 'एडूक' ह्मणून निर्देश करीत असावे, हें उघड आहे. अथवा हे आर्यसंस्कृतिप्रवेशेच्छु अनार्यसंघ कदाचित आपल्या–भाषेंत असलेल्या स्थानांचा 'एडूक' वगैरे शब्दांनींच बोध करीत असतील व तोच शब्द आर्यलोकांनींही उचलला असेल व याचमुळें या शब्दाचें 'एडूक' हेंच एक निश्चितरूप न समजतां एडुक व एडोक अशीं हीं रूपें विकल्पानें मानण्यांत आलीं असावीं.

महाभारतांत अशा एडूकांचें ह्मणजे गर्ह्यदेवतांचें स्तोम कलींत माजेल व वैदिक देवता व देवस्थानें हीं मागें पडतील असें भविष्य कलीचें भयावहत्व दाखविण्यासाठीं कथन केलें आहे. त्यांत बौद्धांच्या 'डागोबा' चा उल्लेख आहे असें मानण्यास कोणतेंच सयुक्तिक कारण मला दृष्टीस पडत नाहीं. वरील तऱ्हेचे स्तूप हे केवळ बौद्धोत्तरकालीन आहेत ही समज भ्रांतिमूलक आहे असें ऱ्हिस डेव्हिड या बौद्धधर्मविशारद आंग्ल पंडितांचें मत वर दिलेलेंच आहे. परंतु ते बुद्धोत्तर कालीन् आहेत असा चुकीचा समज बऱ्याच विद्वानांत

पसरला आहे. या व्हिस डेव्हिडच्या विधानाचा प्रत्यक्ष प्रत्यय, कै. लोकमान्य टिळक व रा. ब. वैद्य यांचीही अशीच समजूत आहे यावरून येतो व याच गैरसमजामुळें महाभारतरचनाकाळ ग्रीकांची स्वारी व गौतमबुद्धाचें निर्याण यांच्या दरम्यानच्या काळांत पडतो असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. पण वरील विवेचनावरून ही समजूत चुकीची आहे हें वाचकांच्या लक्षांत येण्यास कांहीं तरी मदत होईल अशी मला उमेद आहे.

महाभारत हा बुद्धोत्तरकालीन ग्रंथ आहे असें सिद्ध करण्याकरितां इतर कांहीं रीतिरिवाज, भाषा वगैरेंचीं कारणें पाश्चात्य विद्वानांनीं विशेषतः बौद्धसंप्रदायाभिमानी व्हिस डेव्हिड वगैरे लेखकांनीं पुढें मांडलेलीं आहेत. त्यांचें परीक्षण या लहानशा लेखांत करतां येणें शक्य नाहीं. परंतु मला तीं प्रमाणें मोठीशीं बलवत्तर वाटत नाहींत. उलट त्यांत सुप्रतिष्ठित तर्कापेक्षां पूर्वग्रहदूषित स्वकपोलकल्पित कल्पनातरंगांचें स्वैर व अनियंत्रित तांडवनृत्य दृष्टीस पडतें असेंच मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें.

तेव्हां महाभारताची शतसाहस्रीसंहिता ही निदान इ. स. पूर्वी ५ व्या किंवा ४ थ्या शतकांचे अगोदर संपूर्ण होऊन हिंदुस्थानांतील हिंदु-जनतेस ती प्रमाण व पूज्य ग्रंथ ह्मणून मान्य झाली होती असें विधान करण्यास कांहींही हरकत दिसत नाहीं. 'एडूका'च्या उल्लेखामुळें आमच्यां-तील कांहीं पंडितांस जो संशय उत्पन्न झाला होता त्याचें अंशतः तरी निराकरण करण्याचा प्रयत्न करावा या हेतूनेंच मुख्यतः हा लेख लिहिला असल्यामुळेंच अधिक विस्तार न करतां येथेंच

'नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्
देवीम् सरस्वतीम् व्यासं ततो जयमुदीरयेत

या भारतमंगलाचें उच्चारपूर्वक स्मरण करून हा लेख संपवितों.



# BRIEF SUMMARY OF THE MARATHI ARTICLES

ART. No. 1--' **Determination of the period of the Vedas** ' by Mr. K. L. Daftari B. A. B. L. of Nagpur. The orion of Lokmanya Tilak is the principal work on the subject of the determination of the period of the Vedas. The period arrived at in the orion is approximate. There is possibility of a difference of about 1000 or even 2000 years. Besides the period given in the orion belongs to one mantra only while all the mantras were compiled in various different periods. The writer has thereafter dealt with various data given in orion & tried to explain the mistakes there in. There after the writer gave his own data & putforth his own reasonings and concluded that the Veda & Mantras were being compiled from 3180 before Shake era to 1400 before Shaka era.

ART. No. 2--**Words Bhratruvya & Sapatna** ' i. e. Brotherly relation & relation arising out of cowives, by Mr. Krishna Shastri Ghule of Nagpur. Literal meanings of the words are shown above but the words now carry quite contrary meanings. The writer has very ably dealt with this subject basing his views on the extracts from the Vedas. upanishads & other ancient works.

ART. No, 3--**New light on the life of Ramgupta** by Prof. V. V, Mirashi M, A. of Nagpur. Late Prof, Rakhaldas Banerji delivered lecture on 1924 in Benaras University and Dr. A. S. Altekar wrote on Ramgupta in 1928-29 in the journal of Behar & Orisa. He utilized for it Harshacharit, Natya darpan, Shringar Prakash, Kavya Mimansa, Sanjan copper plate of Amoghvarsha and Majimal Tawarikh. Dr. Deodatta Bhandarkar & K. P. Jayaswal also supported Dr. Altekar in his views.

Still there is not Consensus of opinion about the name of the person who defeated Ramgupta & at what place he was defeated, There is reference in the extracts of Devi Chandragupta drama in

Shringarprakash. But it is to be found out from other evidence, The writer has tried to prove from an example given in Kavya mimansa & from the evidence that Ramgupta was defeated by a Kushan king near about Jalalabad.

ART. No. 4--**Gunadhya poet & Watsa-gulma** by Mr. Laxman Shastri Gadge of Basim. The writer first dealt with the literary of the ancient Berar and then tried to show that Gunadhya the Paishachi poet was born at Basim in Berar. He has found out the basis for his conclusion from Katha Saritsagar a work compiled from the Brahat katha of Gunadhya.

ARI. No, 5--**Durbhaga prameya** by Mr. H. N. Nene M. A. L. T, of Nagpur. In the Mahanubhao literature the founder of the sect has used several Drishtantas in his discourse to his disciples, subsequent authors collected those Drishtantas & some of them added explanatory notes to them. These explanatory notes are called Prameyas. Durbhaga is one of the Drishtantas & Parashram Vyas has compiled a Prameya on this Drishtanta. Durbhaga means unlucky woman. The writer has very ably led a discourse on this prameya.

ART. No. 6--**Determination of the age of Shri Chakradhar** by Pt, Balkrishna Shastri of Mahur. Shri Chakradhar was the founder of the Mahanubhava sect. There are various incorrect notions about the life & age of his. The writer has tried to fix the age and give the life of Shri Chakradhar meaning on the basis of Lila Charitra the ancient life of Shri Chakradhar and various other sources such as Sanskrit works & stone inscriptions recently found. The writer has proved that Shri Chakradhar was a Brahmin & he belonged to the family of the minister of Broach. He proved that Shri Chakradhar was born at Broach in 1116, left for Ramtek in Shaka 1144 & left for Badarikashram in 1194.

ART. No. 7-- **Appasahib & Manbhat** by Mr. Y. M. Kale, author of the History ot Berar. The writer has given the history of Appasahib from the newly available sources.

He has tried to show that great misunderstanding prevailed about the characters of Appasahib Bhonsla & Manbhat, He tried to explain their characters in the light of the new materials. He has shown that Manbhat did not turn traitor & he was loyal to the Bhonslas to the last.

ART. No. 8--**Shindkhed Raja, the Home of Jijabai's parents** by Mr. D. B. Mahjan B. A. of Mehkar. From the known sources the writer has given history of the Jadhawas of Shindkhed, he described all the old buildings, tanks, & other remains there. He has copiously illustrated his article by the photos of the buildings & other ruins.

ART. No. 9--**The family of Raja Udaram** by Mr. Y, K. Deshpande Secretary of Sharadashram, The writer has given the history of the family from various Marathi, Sanskrit & Persian books. Udaram the fonnder of the family was a mere patwari of few villages near Basim. By the advise of a saint he went to Khirki & got himself enganged at the time of Malikambar. He then went to Delhi, his services were appreciated by the Mughal emperor & was raised to the rank of Mansabdar. Himself & his son & grand son distinguished themselves in battles on the side of the Mughals. They got Deshmukhi vatan & Jaghirs in several perganahs. The family got the heriditary title of Rajah. The family still enjoys the title & few of the Jahgir villages.

ART. No. 9--**Whether the hundred thousand text of Mahabharat was compiled before the Budha or after?** by Lok Nayak M. S. Aney Yeotmal. The writer expresses that there are interpolations in the text as was compiled by Shri Vyasa. But the Mahabharat text as brought down by Souti was one hundred thousand shlokas. He lays down that Souti's Mahabharata was complete before Rashis were introduced in India & before the names of seven days of a week were common. There things were introduced by the Greeks & hence the texts of Souti must have been complete before their advent in India. Hence this text must have been complete some time before 300 B. C. In Mahabharat Budha has not been

included in the ten awataras. Hansa has been mentioned as first Avatar, so the Mahabharat must have been completed before the birth of Budha. There are some words which, according to some, lead to the conclusion that the text was completed after Budha. But Lokmanya Tilak & Mr. Vaidya state that these words can be explained otherwise. But one word Eduka which means Dagoba can not be explained otherwise according to Tilak & Waidya. They however opine that the hundred thousand text was compiled after the birth of Budha but before he was introduced in ten Avataras. The present writer has very ably tried to explain the word Eduka, quoting basis from various books for his support. According to him the word was used before the birth of I udha. He has quoted verse from the Mahabharat itself for the support of his view.

---

# शारदाश्रम, यवतमाळ.

## ता. ७-५-३३ रोजीं भरलेल्या वार्षिक सभेचा

# अहवाल.

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें ता. ७-५-३३ रोजीं सकाळीं ८ वाजतां यवतमाळ ज्युबिली लायब्ररीच्या हॉलमध्यें शारदाश्रमाच्या सभासदांची वार्षिक सभा भरली. संस्थेचे अध्यक्ष लो. ना. माधव श्रीहरी अणे हे काँग्रेसचे अध्यक्ष असल्यामुळें, आणि महात्मागान्धी यांनीं उपवासारंभ केल्यामुळें त्यांना अनपेक्षितपणें पुण्यास जावें लागलें व ह्मणून सभेस हजर राहतां आलें नाहीं. संस्थेचे उपाध्यक्ष डॉ. भा. म. टेंबे यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें. सभेकरितां बाहेर गांवाहूनही कांहीं सभासद आले होते. संस्थेचे सन्मान्य सभासद रा. ब. हीरालाल बी. ए. यांचे यशश्चिन्तनपर पत्र आलें होतें.

संस्थेचा शके १८५४ चा वार्षिक अहवाल चिटणीस श्री. य. खु. देशपांडे यांनीं वाचून दाखविला. श्री. म. दा. भाटे यांनीं सूचना आणिली व त्यास श्री. गोविंदराव पांडे वकील यांनीं अनुमती दिल्यावर अहवाल आणि हिशेबाचा खर्डा मंजूर करण्यांत आला. त्या नंतर श्री. पी. आर. देशमुख वकील यांनीं सूचना आणिली व त्यास श्री. गोपाळराव कुंटे वकील, यांनीं अनुमोदन दिल्यावर सर्वानुमतें शके १८५५ करितां खालील प्रमाणें कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

अध्यक्षः— **लो. ना. माधव श्रीहरी अणे** बी. ए. बी. ए.

उपाध्यक्षः— **डॉ. भा. म. टेंबे** एल्. आर. सी. पी. एस्.

चिटणीसः— **श्री. य. खु. देशपांडे** एम्. ए. एल्. एल्. बी.

,, **पु. गो. देशपांडे** बी. ए. एल्. एल्. बी.

सभासद:- प्रो. वि. भि. कोलते एम्. ए एल्. एल्. बी.
श्री. ग. न. पंडित बी. ए. एल्. एल्. बी.
,, म. दा माठे एम्. ए. एल्. टी.
,, वा. ना. देशपांडे
,, ग. गं. शेरे बी. ए.

हिशेबतपासनीस:-श्री. रा ना. कुल्लरवार एम्. ए. एल्. एल्. बी.

कार्यकारी मंडळामध्यें एक स्त्री सभासद घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास याच ठरावाने देण्यांत आला.

संस्थेच्या नियम १७(२) मध्यें सभासदांना शारदाश्रम वार्षिक फुकट-द्यावें असें आहे. परंतु दुसरा वर्ग सभासदाचा वार्षिक वर्गणी १ रु. असून वार्षिकाची किंमत १॥ रु. आहे तेव्हां दुसऱ्यावर्गाच्या सभासदांना वार्षिक निमे किंमतीस द्यावें अशी सूचना श्री. य. खु. देशपांडे यांनीं आणिली, त्यावर चर्चा होऊन वार्षिक सर्व सभासदांना मोफतच देण्यांत यावे असें सर्व सभासदांचें मत पडल्यामुळें श्री. देशपांडे यांनीं आपली सूचना मागें घेतली. त्या नंतर दुसऱ्या वर्गाची वर्गणी १॥ रुपया करावी अशी एक सूचना आली, परन्तु नियम २० प्रा. या सूचनेची योग्य नोटीस नसल्यामुळें तिचा विचार संस्थेच्या सभासदांची जादा सभा भरवून करावा असें ठरलें.

संस्थेस आर्थिक स्थैर्य येतांच संस्था कायदेशीर रीतीनें नोंदण्यांत यावी असा ठराव अध्यक्षनें पुढें मांडला. यावर बोलतांना श्री. य. खु. देशपांडे यांनीं खुलासा केला कीं, निदान वीस तहहयात सभासद झालें म्हणजे संस्थेस आर्थिक स्थैर्य आलें असें म्हणतां येईल. हा ठरावही सर्वानुमतें पसार झाला. चालू वर्षाचें अंदाज पत्रक कार्यकारी मंडळानें तयार करावें असें ठरलें. शारदाश्रम वार्षिक शके १८९९ हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें.

ह्या नन्तर श्री. म. दा. साठे यांनी अकोट येथें स्थापन झालेल्या शारदाश्रम शाखेच्या कार्याचा वृत्तान्त सभेपुढें मांडला. नंतर सभेचे अध्यक्ष डॉ० टेंबे यांनी समरोपा दाखल भाषण करून शारदाश्रमाच्या कार्याकडे विशेष लक्ष घालण्यांस आणि शारदाश्रमाचे समासद वाढविण्यास उपस्थित सभासदांना विनन्ती केली

शेवटीं श्री. य. खु. देशपांडे यांनी अध्यक्षाचे आभार मानले आणि नन्तर शारदाश्रम संग्रहातील ऐतिहासिक कागद पत्रें, हस्त लिखित ग्रंथ, नाणीं, शिलालेखांचे छाप वगैरे वस्तुंचें छोटेसें प्रदर्शन मांडलें होतें, ह्यांतील वस्तुंच्या विशेषाबद्दल माहिती सांगितली व नंतर सभा बरखास्त झाली

येणे प्रमाणें सभेचा त्रोटक अहवाल आहे.

# शारदाश्रम, यवतमाळ.

## शके १८५४ चा अहवाल

### (१) कार्यकारी मंडळ



अध्यक्षः— **लो. ना. माधव श्रीहरी अणे**, बी. ए. बी. एल्.

उपाध्यक्षः— **डॉ. भास्कर महादेव टेंबे**, एल्. आर. सी. पी एस्.

चिटनीसः— **श्री. यशवन्त खुशाल देशपांडे**, एम्. ए. एल्. एल् बी.

,, **महादेव दामोदर साठे**, एम्. ए. एल्. टी.

कार्यकारी मंडळः— **श्री. रामचंद्र हरी मलुरकर**, एम्. ए.

**श्री. सौ. बकुलाबाई अभ्यंकर**, बी. ए. बी. टी.

**प्रो. विष्णु भिकाजी कोलते**, एम्. ए. एल्. एल्. बी.

**श्री. गजानन नरहर पंडित** बी. ए. एल्. एल्. बी.

**श्री. वामन नारायण देशपांडे**

हिशेब तपासनीसः—**रामचन्द्र नागोराव कुल्लरवार** एम्. ए. एल्. एल्. बी.

ऐतिहासिक आणि वाङ्मय विषयक साधनांचें संशोधन, संरक्षण आणि प्रकाशन करण्या करितां यवतमाळांतील साहित्य प्रेमी गृहस्थांच्या

**२ पूर्वेतिहास**

प्रोत्साहनानें सन १९२६ सालीं शारदाश्रम नांवाची संस्था स्थापन करण्यांत आली संस्थेच्या कार्याचा व्याप जसजसा वाढत चालला आणि शारदाश्रमानें अल्पस्वल्प केलेली वाङ्मयविषयक आणि इतिहास विषयक सेवा महाराष्ट्रांतील साहित्य प्रेमी विद्वानांच्या निदर्शनास येऊन त्यांनीं त्या सेवेबद्दल समाधान व्यक्त केलें, त्यामुळें शारदाश्रमांत कार्य करणाऱ्या साहित्य सेवकांस उत्तेजन मिळालें. व या पुढें शारदाश्रमाचें कार्य सुसंघटित होऊन संस्था चिरस्थायी व्हावी आणि संस्थेस महाराष्ट्र जनतेचा आश्रय मिळून कायमनिधि व्हावा म्हणून शारदाश्रम

या संस्थेस नियमबद्ध घटना तयार करून ता. १८-४-३२ पासुन नवीन घटनेप्रमाणें कार्याचा आरंभ करण्यांत आला व शिरोभागीं दर्शविल्याप्रमाणें कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

संस्थेचे एक उत्साही चिटणीस श्री. मा. दा. साठे यांची यवतमाळी, हून आकोट येथें बदली झाल्यामुळें चिटणीसाचे कामांचा बोजा एका चिटणीसा-वरच पडला.श्री. साठे यांच्या बदलीमुळें या संस्थेचा एक उत्साही कार्यकर्ता दुरावला. त्यांच्या प्रयत्नानें अकोट येथें एक साहित्य [शाखा] संस्था स्थापन करण्यांत आली.

३ प्रचारक

समासद मिळविण्याकरितां कांहीं दिवस श्री. व्ही. बी. पराडकर यांना प्रचारक नेमले होते. वर्षअखेर या संस्थेस १ तहाहयात सभासद, ६ सन्मान्य सभासद; १९ पहिलावर्ग सभासद ४२ दुसरावर्ग सभासद असे एकूण ६८ सभासद झाले आहेत. याशिवाय संस्थेच्या प्रकाशन विभागामध्यें ४८ नोंदलेलें कायम ग्राहक आहेत. संस्थेचा चिरस्थायीपणा तहाहयात सभासदांच्या संख्येवरच अवलंबून असल्यामुळें तहाहयात सभासदांची संख्या वाढविणें अवश्य आहे.

आय व्यय

अहवालाचे वर्षी पहिल्या वर्गास ३० रु. दुसऱ्या वर्गास ३४ रु., कायम ग्राहक रु. ४८ एकूण ११२ रु. जमा झाले. सभासदांच्या वर्गणी पकीं ८२ रु. येणे आहेत. सुरवातीचा छपाई खर्च रु. ४२, स्टेशनरी १३।।।=, स्टॉक ३।।।- व प्रचारक कमीशन रु. १४। एकुण ७२।।।≈ खर्च झाला असुन संस्थेजवळ वर्ष अखेर ३८८- शिल्लक आहेत.

५ वार्षिक

नियमांत ठरल्या प्रमाणें या वर्षी 'शारदाश्रम वार्षिक' काढण्याची वाट पट करण्यांत आली. परंतु तें वार्षीक शके १८९९ चें म्हणून समजल्या जाईल. संस्थेजवळ निधि नसल्यामुळें वार्षिक छापण्यांस लागणाऱ्या खर्चा करतां माहुरकर राजे उदाराम यांच्याकडून रु. ३०० ची देणगी देण्याचे अभिवचन आलें आहे. शारदाश्रम वार्षिक निमित्त पत्र-व्यवहारास व टपाल खर्चास २९ रु. झालेला खर्च आणि छापखान्यास

दिलेला अडवान्स रु. १०० हा खर्च संस्थेचे चिटणीस श्री य. खु. देशपांडे यांनीं आपल्या खाजगीतून केला आहे. शारदाश्रम वार्षिकाचा होणारा खर्च वार्षिकाच्या विक्रीतून होईल अशी उमेद आहे.

अहवालाच्या वर्षाच्या अनुभवावरून संस्थेच्या सभासदाची संख्या वाढविण्यावर संस्थेची स्थिरता अवलंबून आहे व सभासदांची संख्या वाढविण्यास प्रचारकाची योजना करणें अवश्य आहे. त्याच बरोबर संस्थेच्या खर्चानें प्रचारक पाठविण्यापेक्षां कमिशनवर प्रचारकाची योजना केली तरच श्रेयस्कर आहे. संस्थेनें प्रकाशित केलेले ग्रंथ विकण्यासहि प्रचारकाचा उपयोग होतो.

**६ शिक्षण मंत्री**

कळविण्यांस आनंद वाटतो की अहवालाच्या वर्षी वऱ्हाड मध्यप्रन्ताचे शिक्षण मंत्री डॉ. पंजाबराव देशमुख यांनीं संस्थेस भेट दिली व शारदाश्रमाच्या कार्याबद्दलसमाधान प्रदर्शित करून संस्थेचे ते तहाहयात सभासद झाले कोल्हापुर येथें साहित्य संम्मेलन प्रसंगीं ग्रंथांचें प्रदर्शन उघडण्यांच्या वेळीं केलेल्या भाषणांतही शारदाश्रमाच्या कार्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे ,ही संस्था कायदेशीर रीतीनें नोंदल्यास सदरहु वाङ्मयेतिहास संशोधक संस्थेस सरकारकडूनही आश्रय मिळण्याचा संभव आहे, असें त्यांनीं सुचविलें. पहिला वर्ग आणि दुसरा वर्ग सभासदांची दरवर्षास नियमितपणें वर्गणी आली तरच ते सभासद राहूं शकतील परंतु एकदां ५० रु. दिले तर त्यांनां तहाहयात सभासद समजले जाऊन त्यामुळें सस्थेस स्थैर्य येण्यास मदत होईल ह्मणून आमच्या मतें निदान २० तहाहयात सभासद मिळाले ह्मणजे संस्था कायदेशीर रीतीनें नोंदली जावी.

**७ वांङ्मय विषयक कामगिरी.**

अहवालाच्या सालीं शारदाश्रम वार्षीक हा ग्रन्थ छापण्यास घेतला आहेच याशिवाय 'श्री चक्रपाणी चरित्र' हा प्राचीन गद्य ग्रंथही छापिला आहे. हे दोन्ही ग्रन्थ श्री. य. खु. देशपांडे यांनीं संपादिले आहेत. याशिवाय वृध्दाचार आणि हंसाचा स्वयंवर ही अनुक्रमें श्री.

वा. ना. देशपांडे आणि श्री. य. खु. देशपांडे यांनीं संपादिले असून हे तिन्ही ग्रन्थ प्राचीन मराठी वाङ्मयखंड ह्मणून प्रसिद्ध करण्यांत येतील.

संस्थेचे अध्यक्ष लो० ना० बापुजी अणे हे कांग्रेसचे अध्यक्ष असल्यामुळें, त्यांना राजकारणामुळें क्षणाचीही फुरसत नाहीं पण तशाही स्थितींत त्यांनीं वेळांत वेळ काढून वार्षिका करितां, अभ्यास करून, एक उत्कृष्ट लेख लिहिला आहे. हें त्यांच्या वाङ्मयावरील प्रेमाचें द्योतक आहे.

संस्थेचे एक सभासद श्री. बाळकृष्ण शास्त्री यांनी श्री. चक्रधर स्वामीच्या काल निर्णया संबंधानें संशोधन पूर्वक अभ्यास करून विविधज्ञान विस्तार मध्यें त्या विषयावर एक विस्तृत लेखमाला हिन्दीतून प्रसिद्ध करीत आहेत.

श्री. य. खु. देशपांडे यांनीं मगध देशांत प्रवास करून मगध-विहार ह्मणून ऐतिहासिक प्रवास वृत्तांत वागीश्वरी मधून खण्डशः प्रसिद्ध केली. श्री. बाळकृष्ण शास्त्री यांच्या सहकार्यानें लीला चरित्राच्या एकांक भागाची प्रेस-कॉपी तयार करून त्यावर टीका लिहिणें सुरू आहे.

प्रो. कोलते यांनीं शिशुपालवध आणि भास्कर कवीश्वर यांचा संशोधनात्मक अभ्यास करून त्यावर विविध ज्ञान विस्तारांत एक विचिकित्सात्मक लेखमाला प्रकाशित केली आहे. हल्लीं ते शारदाश्रमांतील संग्रहित हस्तलिखित ग्रन्थ " भास्करकृत एकादशस्कंद " याच्या ५ । ६ प्रतिवरून प्रेसकॉपी तयार करीत आहेत. व त्यांचा विचार एकादशस्कंद अभ्यास पूर्वक प्रकाशित करण्याचा आहे.

श्री. वा. ना. देशपांडे परशरामकृत नागदेवाचार्य या गद्य ग्रन्थाच्या अनेक हस्तलिखीत प्रती जमवून प्रेसकॉपी तयार करित आहेत.

शारदाश्रमाचे आणखी एक सभासद श्री. नरहरशास्त्री खरशीकर हे विष्णुदास कवींच्या कविता जुळवून विष्णुदासांच्या कवितांचा दुसरा भाग तयार करण्याच्या उद्योगांत आहेत. चालु वर्षांतच तो तयार होऊन शारदाश्रमांतून प्रकाशित होईल. आणखी एक सभासद श्री. द. म. महाजन विष्णुदासाच्या कवितांचे सह–

संपादक हे मेहकर येथें नायबतहसीलदार आहेत, त्यांनीं गोसावी नंदन यांच्या कविता आणि कविसंबंधीं माहिती श्री. विष्णुपंत कविमंडण वकील मेहकर यांच्या सहकार्यानेंगोळा केली आहे, त्या कविता लवकरच प्रकाशीत करण्याचा त्यांचा विचार आहे. या शिवाय शिंदखेडकर जाधव यांच्या संबंधीं कागद पत्रांचा शोध आणि त्यांचें संशोधन चालविलें आहे. त्या कामांत त्यांना बरेंच यश आलें असून लवकरच जाधवांचा सुसंबद्ध इतिहास लिहिण्याचा त्यांचा विचार आहे.

शारदाश्रम संस्थेचे उपाध्यक्ष डॉ. टेंबे यांनीं बापूजी वाङ्मय मंडळाच्या विद्यमानें लो. ना. बापूजी अणे यांचे लेख व व्याख्यानें प्रसिद्ध केलीं आहेत. तसेंच त्यांच्या प्रोत्साहनानें श्री. स. ह. मल्हाळ यांनीं बापूजीचें चरित्र प्रकाशित केलें आहे तसेंच डॉ. साहेबांनी या वर्षी अन्न आणि शरीर हें पुस्तक तयार केलें आहे.

श्री. ग. न. पंडीत विदर्भवीणेचे संपादक हे टागोर यांच्या गार्डनर मधील स्फुट कविता मराठी काव्यांत तयार करीत आहेत.

**८ लेखकांचे आभार** शारदाश्रम वार्षिकामध्यें मध्यप्रान्त वऱ्हाडांतील निरनिराळ्या विषयात संशोधन करणाऱ्या अनेक प्रसिद्ध विद्वानांनीं निबंध लिहून सहाय्य केलें आहे. या सहकार्या बद्दल संस्था त्या विद्वानांचे व्यक्तिशः आभार मानतें वार्षिकांतील लेखकांच्या यादीवरून दिसून येईल कीं, शारदा मंदिरांत धर्म जाति, सरकारी, बिनसरकारी श्रीमंत, गरीब अथवा मता मतांतरें यांस मुळींच वाव नाहीं.

**९ ग्रंथ संग्रह** या वर्षी शारदाश्रमांतील हस्त लिखित ग्रन्थांची सूचि करण्याचें कार्य संस्थेचे सभासद श्री. रंगराव साकळे यांच्या सहकार्यानें करावयास सुरुवात केली आहे लवकरच ती तयार होईल. अशी उमेद आहे. यंदाच्या वर्षी श्री य. खु. देशपांडे यानी नेर येथून हस्त लिखित ग्रन्थसंग्रहांत बरीच भर टाकली आहे

**१० व्याख्यान माला** या वर्षीही शारदाश्रम व्याख्यानमाला करविण्यांत आली होती त्या संबंधीं श्री. पी. जी देशपांडे

यांनाच श्रेय आहे या वर्षी श्री. हरिहर वामन देशपांडे आणि डॉ. कोकर्डेकर या विद्वानांनीं ही माला गुंफली होती, या बद्दल या विद्वानांची ही संस्था आभारी आहे.

**११ वार्षिक देणगी** शारदाश्रम वार्षिकाकरितां राजे उदाराम बाबासाहेब देशमुख माहूरकर यांनी ३०० रु. देणगी दिल्याबद्दल ही संस्था त्यांची आभारी आहे. मध्यप्रान्त वऱ्हाड मधील साहित्य प्रेमी आणि धनिक रसिकांनीं त्यांचें अनुकरण करून वाङ्मय सेवेस सहाय्य करावे अशी विनंती आहे.

**१२ शेवटीं** शेवटीं शारदाश्रमाकडून भरीव साहित्यसेवा व्हावी आणि तिला महाराष्ट्रीय रसिकांकडून आर्थिक सहाय्य मिळावें अशी शारदादेवीची प्रार्थना करून हा अहवाल संपवितों.

**यशवन्त खुशाल देशपांडे**
चिटणीस शारदाश्रम, यवतमाळ

आज रोजीं ता. १२-२-३३ पर्यंतचा हिशेब पाहिला,

**रा. ना. कुळकर्णी**
हिशेब तपासणीस शारदाश्रम, यवतमाळ

# संस्थेनें चालविलेल्या कार्यासंबंधीं कांहीं अभिप्राय.

(1) Sir Yadunath Sarkar, R, S. G S. Sardesai and Mr. Y. M. Kale the three renowned Historians state-

We visited Sharadashram and were very much pleased to see the arrangements made for saving old Sanskrit & marathi manuscripts and Histroical records from destruction. Such an institution is a national asset at a centre like Yeotmal and we wish it success

From the Secretary, Indian Historical Records Commission 3, Govt. place, West Calcutta:—

On behalf of the Indian Historical Records Commission I beg to offer you our Sincere thanks for your kindness in sending your exhibits for the Historical exhibition held at Patna in connection with the 13th Session of the Commision I need hardly add that these exhibits contributed materially to the success of the exhibition.

(3) The Hon'ble Dr. Punjab Rao Deshmukh M. A. Ph. D. the Minister for Education C. P. & Berar States on 12-12-32:—

I had much pleasure in paying visit to the Sharadashram Yeotmal. Mr. Y. K. Deshpande showed me the rare mss, and impressions on stone & copper plates which date back to 11th and 12th centuries. It is one of the aims of the body to collect rare historical documents & articles of Historical value. The Ashram has also begun publication of ancient marathi verse, some of which have been prescribed as text books for nniversity Examinations Mr. Deshpande has got together a fine band of research scholars & anthors whose works promise to be valuable to Marathi literature and history. This is the only instution of its kind in the province of C. P. & Berar & deserves encouragement.

(४) कै० चिंतामण गंगाधर भानु पुणें:—

शारदाश्रमांत १०—१२ वाङ्मय प्रेमी व इतिहासप्रेमी सहकाऱ्यांच्या साह्यानें हें संग्राहक व संशोधक कार्य धीरेंधीरें चाललें आहे.

(५) सुप्रसिद्ध रामदासी वाङ्मय संशोधक श्री. शंकर श्रीकृष्ण देव धुळें:—

पुणें, धुळें, उमरावती व यवतमाळ अशा चार ठिकाणीं आपल्या महाराष्ट्रांत संशोधकार्य चालू आहे. वऱ्हाड ही सत्पुरुषांची भूमि आहे व या भूमींत प्राचीन मराठी वाङ्मय विपुल आहे, असें या प्रांतात जें मी किंचित डोकावून पाहिलें त्या वरून मला वाटतें.

(६) कै० बाळकृष्ण अनंत भिडे बी. ए. मुरुड, मराठी वाङ्मयाचे एक सुप्रसिद्ध चिकित्सक:—

ऐतिहासिक सत्य लक्षांत घेतलें, म्हणजे आज जरी वऱ्हाड महाराष्ट्रा पासून निराळा मानण्यांत येतो, तरी महाराष्ट्राचें मूळ वऱ्हाडांतच आहे आणि मराठी भाषेचें जतन व संगोपन पूर्वकालीं वऱ्हाडांतच झालें, हें मान्य केल्या वाचून गत्यंतर राहत नाहीं, आणि शारदाश्रमाच्या प्रस्तुतच्या वाङ्मय सेवेनें मराठीच्या प्राचीन इतिहासाचें केंद्र ही वऱ्हाडच ठरणार यांत संदेह नको.

(७) साहित्य सम्राट श्री. नरसिंह चिंतामण केळकर बी.ए. एल्. एल्. बी. पुणें:—

वऱ्हाड व गोदावरी तटाक हाच मूळ किंवा प्राचीन महाराष्ट्र, तेव्हां या भागांतच प्राचीन मराठी वाङ्मय अधिक सांपडणार हें उघड आहे व तें शोधून काढून प्रसिद्ध करण्याचें भाग्य तुमच्या संस्थेला ( शारदाश्रम, यवतमाळ ) लाभणार म्हणून अभिनंदन करणें अवश्य आहे.

या शिवाय महाराष्ट्र साहित्य सम्मेलनाच्या अधिवेशनांचे अध्यक्ष प्रो० शि० म० परांजपे, श्री. श्री. कृ. कोल्हटकर, श्री. वा. म. जोशी इत्यादिकांनीं शारदाश्रमाच्या कार्याचा गौरव केला आहे.

### साहित्येतिहास प्रेमी यांना

# अभ्यर्थना.

साहित्य आणि इतिहास या विपयाच्या संशोधन, संरक्षण आणि अभिवृद्धि यांस वाहिलेल्या या शारदाश्रम संस्थेस खालील प्रमाणें सहाय्य करता येईल.

१ ज्यांस परमेश्वरानें अनुकुलता दिली असेल त्यांनीं मोठ्या रकमेचा ट्रस्ट करून ठेविल्यास त्याच्या व्याजांतून या कार्यास मदत होईल.

२ संस्थेस शंभर अथवा शंभरहून ज्यास्त रकम देऊन आश्रयदाते होतां येईल. अथवा निदान पन्नास रुपये देऊन संस्थेचे तहाहयात सभासद व्हावे. तहाहयात सभासदांचीं वर्गणीं आणि आश्रयदात्यानीं दिलेल्या देणग्या कायम निधि म्हणून राहतील व त्याच्या व्याजातून संस्थेचें कार्य होईल.

३ वार्षिक वर्गणी तीन रुपये, निदान एक रुपया देऊन पहिला व दुसरा वर्ग सभासद होणें सर्वांस सुलभ आहे. शारदाश्रमानें प्रसिद्ध केलेले ग्रंथ विकत घेऊनही संस्थेस मदत होईल.

४ शिलालेख, ताम्रपट आणि हस्तलिखित ग्रंथ या संबंधानें माहिती संस्थेच्या चिटणीसास देऊन ते मिळवून देण्याची खटपट करावी.

५ जे विद्वान गृहस्थ साहित्य आणि इतिहास या क्षेत्रांत वैयक्तिक संशोधन कार्य करीत आहेत त्यांनीं संस्थेशी सहकार्य केल्यास संघशक्तीनें कार्यास उत्तेजन येईल.

चिटणीस,
शारदाश्रम, यवतमाळ

---

विश्वहितेच्छु छापखाना, यवतमाळ